


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

# अनुक्रमणिका



**हा तों साहित्यकुसुमांचा आस्वादु**





**मुद्रक-प्रकाशक** प्रमुख कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद,
टिळक रोड, पुणे ४११ ०३०.

**मुद्रणस्थळ** : जंगम ऑफसेट प्रा. लि., २५/१० नांदेड फाटा, पुणे ४११ ०३०.

**अक्षरजुळणी** : यशश्री एंटरप्रायझेस, २४, ईशदान सोसायटी, अभ्यंकर स्टीलजवळ,
पौड फाटा, कोथरूड, पुणे ४११ ०२९. फोन : ५४६०६०२.

**मूल्य** : रुपये ३०/- **वार्षिक वर्गणी संस्थांसाठी :** रु. १००/-

**आजीव सदस्य शुल्क** : रुपये १०००/- **वार्षिक सदस्य शुल्क :** रु. १००/-

**अंक क्र. ३००** : जानेवारी २००२ ते मार्च २००२

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र



# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक ३००

जानेवारी-फेब्रुवारी-मार्च २००२



संपादक
प्रा. डॉ. अरविंद वामन कुळकर्णी



**महाराष्ट्र साहित्य परिषद**
टिळक रोड, पुणे ४११ ०३०.
दूरध्वनी : ४४७५९६३

अनुक्रमणिका

## संपादकीय

❑

म. सा. प. पुणे या सस्थेचे अध्यक्ष आणि सुप्रसिद्ध कथाकार श्री. राजेंद्र बनहट्टी यांची चालू वर्षारंभीच्या अध्यक्षपदी निवड झाली. हे अमृतमहोत्सवी अ. भा. मराठी साहित्यसंमेलन दि. १८, १९, २० जानेवारी २००२ या दिवशी पुणे येथे संपन्न झाले. श्री. बनहट्टी यांच्या अध्यक्षीय भाषणातील काही भाग 'पत्रिके'च्या या अंकात प्रसिद्ध करताना आम्हाला आनंद होत आहे.

तसेच पुणे येथील ख्यातनाम समीक्षक व भाषातज्ज्ञ डॉ. अशोक केळकर यांना २६ जानेवारीच्या प्रजासत्ताक दिनाच्या निमित्ताने भारत सरकारने 'पद्मश्री' बहाल केली आहे. भारत देशात 'पद्मश्री' दिली जाणारे ते दुसरे भाषातज्ज्ञ आहेत. यामुळे मराठी भाषेची मानही उंचावलेली आहे. आम्ही डॉ. केळकर यांचे मन:पूर्वक अभिनंदन करतो आहोत.

३०० क्रमाकांचा 'पत्रिके'चा हा ताजा अंक वाचनीय व संग्राह्य व्हावा, याची सर्वतोपरी काळजी घेतलेली आहे. ख्यातनाम कवयित्री कै. बहिणाबाई चौधरी यांचे देहावसान ३ डिसेंबर १९५१ रोजी झाले होते. त्यांच्या स्मृतिदिनाची पन्नाशी प्रस्तुत अंकात श्रीमती नंदा सुर्वे यांनी खास लेख लिहून जागविली आहे. तसेच जागतिक कीर्तीचे दोन वेदाभ्यासक डॉ. दांडेकर आणि डॉ. तारळेकर यांच्या कार्याचे समालोचन करणारा एक कृतज्ञतापर लेख डॉ. धडफळे यांनी 'पत्रिके'साठी मुद्दाम लिहिला आहे. हे व या अंकातील इतर लेखन वाचकांना आवडेल, असा भरवसा वाटतो.

गेला अंक प्रसिद्ध झाल्यानंतर महाराष्ट्रातील काही नामवंतांचे निधन झाले. बालसाहित्यकार रा. वा. शेवडे गुरुजी (कोल्हापूर), भाषाशास्त्रज्ञ सु. बा. कुलकर्णी (नागपूर), प्रा. सदाशिव आठवले (पुणे), श्रेष्ठ हिंदी अभिनेता अशोक कुमार (मुंबई), प्राच्यविद्यापंडित डॉ. रा. ना. दांडेकर आणि श्री. वा. सोहनी (पुणे), सामवेदज्ञ डॉ. ग. ह. तारळेकर (धुळे), डॉ. एस्. व्ही. भावे (पुणे), समाजसेविका प्रमिला दंडवते (मुंबई), पंडित सी. आर. व्यास (मुंबई), लोकनाट्य कलावती विठाबाई नारायणगावकर, 'अंटार्क्टिकावीर' डॉ. अरुण परुळेकर (सावंतवाडी), नाट्यकर्मी अनंत मोरेश्वर ओक (पुणे), जुन्या पिढीतील अभिनेत्री माई पेंढारकर (कोल्हापूर), हिंदी चित्रपट अभिनेते मा. भगवान, 'अभिरुची'कार पु. आ. चित्रे (मुंबई), नट व दलित रंगभूमीचे पहिले अध्यक्ष नाटककार अविनाश आंबेडकर (पुणे), 'सुहृद' संस्थेच्या कमलाबाई गोखले (पुणे), नाटककार रमेश पवार ही त्यांतील काही ठळक नावे. म. सा. पत्रिका यांच्या निधनाबद्दल तीव्र शोक व्यक्त करते आहे.

१२ डिसेंबर २००१ हा मुंबई साहित्य संघ आणि मराठी नाट्यविश्व नव्याने उभे करणाऱ्या डॉ. अ. ना. भालेराव यांच्या जन्मशताब्दीचा दिवस. 'पत्रिका' डॉ. भालेराव यांच्या पुण्यस्मृतीस अभिवादन करते आहे. अस्तु. इति लेखनसीमा

अरविंद वामन कुळकर्णी
१४, स्वयंसिद्धा सोसायटी, पौड रस्ता, पुणे ३८. फोन : ५४३६१२९.



अनुक्रमणिका








## अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष श्री. राजेंद्र बनहट्टी यांनी मराठी साहित्यरसिकांना उद्देशून केलेल्या भाषणातील काही ठळक मुद्दे

❑

जीवनाच्या सर्वच क्षेत्रांत आज इंग्रजीचे वर्चस्व प्रस्थापित झालेले आहे. मग ते उद्योग-व्यवसायाचे क्षेत्र असो, शासकीय कामकाज असो, सार्वजनिक उलाढाल असो, कोर्टकचेऱ्यांतली कारवाई असो, सगळीकडे इंग्रजीचे बस्तान बसलेले आहे. एकदा कोर्टात गेलो होतो. एक खटला चालला होता. साक्षीदार किंवा आरोपी जो कोणी होता, त्याला इंग्रजी येत नसावे. तो विचारा कशीवशी मराठीत उत्तरे देत होता. जज्जमहाशय त्याचे इंग्रजीत भाषांतर करून कोर्टाच्या कारकुनाला सांगत होते. म्हणजे सगळे दप्तर किंवा कागदपत्रं इंग्रजीत. शेवटी वकील महोदयांचा युक्तिवादही इंग्रजीत. एका ओळखीच्या वकिलाला विचारले, ''का हो इंग्रजीत हा युक्तिवाद करता ?'' तर म्हणाले, ''अहो, आमचे कायद्याचे शिक्षण सगळे इंग्रजीत झाले आहे. तेव्हा मराठीत नीट बोलता येत नाही. 'आर्ग्युमेंट' करता येत नाही. शिवाय इंग्रजीत बोलले तर जज्ज 'इंप्रेस' होतात.'' म्हणजे एकंदरीत इंग्रजीत बोलले, इंग्रजीत लिहिले की 'इंप्रेशन' पडते, प्रतिष्ठा वाढते, ही आपली मनोधारणा पक्की झालेली आहे. कारण तसा आपला नित्याचा आणि हमखास अनुभव आहे आणि तो सुद्धा पुण्यासारख्या शहरात नेहमी येणारा.

वास्तविक पुणे हे तर अस्सल मराठी शहर. मराठीचा हा बालेकिल्ला. पण इथेसुद्धा 'इये मराठीचिये नगरी आंग्लविद्येचा सुकाळू करी' अशी परिस्थिती, तर मुंबईसारख्या बहुभाषिक महानगराबद्दल बोलायलाच नको. तिथे तर पाय ठेवल्यापासून पदोपदी इंग्रजी नाही तर हिंदी. पण ही परिस्थिती पुणे-मुंबईसारख्या मोठ्या शहरांपुरतीच मर्यादित राहिलेली नाही. ग्रामीण परिसरातही थोड्याबहुत फरकाने इंग्रजीधार्जिणेपणाचे हेच चित्र आढळते.

ग्रामीण मराठी भाषेतही असंख्य इंग्रजी शब्द चपखलपणे शिरलेले असतात. ग्रामीण माणसे ते मोठ्या ऐटीत, सफाईने आणि सहजपणे म्हणत असतात. खेड्यापाड्यांत गेले की, ते अनायासे कानावर पडतात. सहज आठवणारे काही शब्द म्हणजे प्राफीट, मिस्टिक, करेट, टैम, शायडी, अपुटकेट, कंप्लेट,अर्जेंट, टिपिशन, टैट, बालिस्टर, फर्मिशन, आरगुमेंट. ग्रामीण लोक इंग्रजी शब्दांचा वाक्यात वापरसुद्धा सराईतपणे करतात.

म्हणजे इंग्रजी आले नाही तर आपण मागे राहतो, मागासलेले राहतो, ही मनोवृत्ती आहे. इंग्रजी येत नाही यात आपला कमीपणा आहे, हा न्यूनगंड आहे. कारण इंग्रजी लिहिता-बोलताना काही चुकले तर आपण शरमिंदे होतो. पण मराठी व्याकरण किंवा शुद्धलेखन चुकले तर आपल्याला जराही खंत वाटत नाही. वास्तविक इंग्रजी आले म्हणजे स्वर्गाला हात लागले, असे समजण्याचे कारण नाही. इंग्रजी आले म्हणजे कोणी हुषार होत नाही. तसे असते तर इंग्लंडमधला प्रत्येक माणूस हा सर्वज्ञ झाला असता नि आघाडीवर राहिला असता. उलट



अनुक्रमणिका







आपल्याकडे मराठी माध्यमातले विद्यार्थीच गुणवत्ता यादीत नेहमी अग्रक्रमाने येतात आणि जीवनातही पुढे जातात, ही वस्तुस्थिती आहे. शिवाय ग्रामीण भागातील विद्यार्थी मागे पडतात याचे कारण इंग्रजी येत नाही, हे नाही तर तेथील शिक्षणाची वाईट अवस्था, शिक्षणाबद्दलची अनास्था, चांगल्या शाळांचा, चांगल्या शिक्षकांचा, शैक्षणिक सुविधांचा अभाव आणि दारिद्र्य हे आहे. तिथे मराठीसुद्धा धड शिकवले जात नाही. पण हा युक्तिवाद फारसा कोणाला पटत नाही आणि इंग्रजीची आंधळी आसक्ती काही केल्या सुटत नाही. त्यामुळे ग्रामीण भागातला काय किंवा शहरातला काय हा इंग्रजीचा अनावर सोस कमी न होता उलट दिवसेंदिवस वाढतोच आहे.

वास्तविक हा भाषिक भ्रष्टाचार, हे भाषिक पारतंत्र्य आपण पोटार्थीपणाने नि कौटुंबिक सुखासाठी स्वीकारले आहे. पण ते आपल्या इतके अंगवळणी पडले आहे की, ते आपल्याला जाणवत नाही, ही सर्वांत दुर्दैवाची गोष्ट आहे. दिवसभरात आणि आयुष्यभरातही आपण इंग्रजीचा इतका अजाणता, सर्रास आणि बेधडक वापर करतो की माधव ज्यूलीयन यांची मराठी मायबोलीची कविता आता उलट म्हणायची पाळी आली आहे. ''मराठी **नसे** आमुची मायबोली जरी आज ती राजभाषा **असे**.'' ही इंग्रजी मानसिकता आपल्या इतकी सवयीची झाली आहे की, तिच्यात काही विचित्र आहे, गैर आहे, अस्वाभाविक आहे, अनाठायी आहे, याची शुद्धच आपण हरवून बसलो आहोत.

स्वातंत्र्य मिळाले तेव्हा प्रामुख्याने केवळ सत्तांतर झाले. इंग्रज गेले पण त्यांची प्रशासन-व्यवस्था, त्यांची जीवनपद्धती, त्यांची संस्कृती अणि मुख्य म्हणजे त्यांची भाषा मागे ठेवून गेले. त्यामुळे इंग्रजांचे साम्राज्य गेले पण इंग्रजीचे साम्राज्य कायम राहिले. पारतंत्र्यात इंग्रजी ही जेत्यांची भाषा, राज्यकारभाराची भाषा, नोकरीची भाषा म्हणून मानगुटीवर बसली होती, तर स्वातंत्र्यात ती अर्थार्जनाची भाषा, नोकरशाहीची भाषा, ज्ञानविज्ञानाची भाषा नि आता संगणकयुगाची नि माहिती तंत्रज्ञानाची भाषा म्हणून आपल्या डोक्यावर मिरे वाटत आहे.

स्वातंत्र्याचा सुवर्ण महोत्सव मोठ्या थाटात आपण साजरा केला, पण आपली भाषिक गुलामगिरी संपलेली नाही. परभाषेच्या बेड्या अजून गळून पडलेल्या नाहीत. त्या शासनाच्या कारभारातूनच नव्हे, तर आपल्या लिहिण्या-बोलण्यातूनही अजून खळखळत आहेत. म्हणून एकीकडे शासनाची अनास्था आणि दुसरीकडे जनतेची म्हणजे आपली उदासीनता यांच्या परस्परपूरक अशा कात्रीत सापडल्यामुळे महाराष्ट्रात मराठीचे खच्चीकरण होत आहे.

प्रश्न असा आहे की, मराठीवर आपणच करीत असलेला अन्याय मराठी माणूस दूर करणार आहे की नाही ? स्वत:ची इंग्रजी मानसिकता तो नाहीशी करणार आहे की नाही ? इंग्रजीचे वाढते प्रस्थ तो कमी करणार आहे की नाही ? वास्तविक राजकीय स्वातंत्र्य मिळाल्यानंतर इंग्रजीचे प्रस्थ कमी होईल आणि मराठीचा प्रभाव वाढेल अशी अपेक्षा होती. पण ती फोल ठरली. भाषा ही सर्व व्यवहाराच्या केंद्रस्थानी आवश्यक असते. म्हणून भाषा हे मुख्य सत्र धरून भाषावार प्रांतरचना झाली. १९६० साली संयुक्त महाराष्ट्र स्थापन झाला आणि मराठी भाषिक राज्य अस्तित्वात आले. १९६४ साली मराठी ही महाराष्ट्राची अधिकृत राजभाषा

झाली, पण ती केवळ कागदोपत्री. जीवनाच्या सर्व क्षेत्रांत तर सोडाच, पण राज्यकारभारात सुद्धा तिचा सर्वाधिकार प्रस्थापित झाला नाही. कुसुमाग्रजांनी म्हटल्याप्रमाणे, ''डोक्यावर सोनेरी मुगुट पण अंगात मात्र फाटके कपडे अशा अवस्थेत ती मंत्रालयाच्या दाराशी उभी राहिली.''

अलीकडच्या काळात मराठी ही राज्यकारभाराची आणि ज्ञानाची भाषा व्हावी, याची जाणीव महाराष्ट्राचे पहिले मुख्यमंत्री यशवंतराव चव्हाण यांना होती. म्हणूनच लोकभाषा या ज्ञानभाषा झाल्या पाहिजेत, असे ते म्हणत असत. त्या दृष्टीनेच त्यांनी मराठी विश्वकोश निर्माण करण्याची यंत्रणा उभारली. महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाची स्थापना केली. त्याचप्रमाणे भाषा संचालनालयामार्फत वेगवेगळ्या विषयांच्या पारिभाषिक संज्ञा तयार करण्याचे कार्य हाती घेतले आणि तज्ज्ञांच्या समित्या नेमून 'पदनामकोश', 'शासन व्यवहार कोश' आणि प्रशासन वाक्यप्रयोग कोश' यासारखे ग्रंथ तयार केले.

केवळ राज्यकारभाराचे मराठीकरण करून चालणार नाही. शिक्षणाचेही संपूर्ण मराठीकरण करणे आवश्यक आहे. त्यासाठी सर्व ज्ञानशाखांमध्ये, सर्व स्तरांवर मराठी हीच शिक्षणाची अनिवार्य भाषा होणे अपरिहार्य आहे. याचाच अर्थ पदवी आणि पदव्युत्तर शिक्षणातही सर्व विद्याशाखांमध्ये, सर्व विषयांसाठी मराठी माध्यम अनिवार्य हवे.

मराठी ही जनसामान्यांची भाषा असल्यामुळे ती जर सर्वत्र शिक्षणाची भाषा केली तरच बहुजन समाजाची शैक्षणिक प्रगती होणार आहे. कारण मराठीतून शिकणे आणि शिकवणे हे केव्हाही सोपे जाणार आहे. दुसरे असे की, इंग्रजी माध्यमामुळे आणि भाषेमुळे समाजात जे वर्ग-विभाजन झाले आहे, समाजाचे जे विघटन झाले आहे, ते नाहीसे होणार आहे.

एकात्म मराठी समाज निर्माण होण्यासाठी केवळ मराठी माध्यम सक्तीचे करणे पुरेसे नाही तर मराठी साहित्य हा विषय देखील सक्तीचा करायला हवा. म्हणजे शिक्षणाच्या सर्व शाखांमध्ये, सर्व स्तरांवर शेवटच्या पदवी परीक्षेपर्यंत मराठी साहित्य हा विषय म्हणून आणि मराठी भाषा हे माध्यम म्हणून अनिवार्य हवे. मराठी साहित्य यासाठी की ते मराठी संस्कृतीचे वाहन आहे. ती मराठी माणसावर संस्कार करणारी, त्याला सुसंस्कृत करणारी प्रभावी शक्ती आहे. मराठी भाषा अशासाठी की मातृभाषेतील शिक्षण हे नैसर्गिक शिक्षण आहे. मातृभाषेतून शिकणे तसेच शिकवणे सोपे आणि साहजिक आहे. कारण ते मातेने केलेल्या संगोपनासारखे आहे. म्हणून मराठी साहित्य हा विषय आणि मराठी भाषा हे माध्यम शिक्षणात अथपासून इतिपर्यंत सक्तीचे हवे.

आज संगणकाचे ठिकठिकाणी मराठीकरण होत आहे. अनेक शाळांमध्ये, संस्थांमध्ये जे संगणकीकरण झालेले आहे, ते मराठीमध्ये झालेले आहे आणि संगणकीय तंत्रज्ञानाचे हे मराठीकरण यापुढे सगळीकडे झपाट्याने होत राहणार आहे. कारण ती मराठी माणसाची गरज आहे.

रयत शिक्षण संस्थेच्या दोनशे माध्यमिक शाळांमध्ये तर संगणकांचे शिक्षण गेल्या तीन वर्षांपासून मराठीतून दिले जात आहे. तेव्हा संगणक युगात अगदी पहिलीपासून इंग्रजी शिकणे अपरिहार्य आहे हे म्हणणे तितकेसे खरे नाही. आज विज्ञानात, संगणकीय आणि माहिती











तंत्रज्ञानात जे शेकडो, हजारो भारतीय तज्ज्ञ आहेत ते पहिलीपासून इंग्रजी शिकले आहेत काय? उलट मराठी माध्यमात शिक्षण घेतलेले अनेक विद्यार्थीच विज्ञान-तंत्रज्ञान क्षेत्रात मोठ्या पदांवर पोचलेले आहेत. इतकेच नव्हे, तर परदेशात जाऊनही त्यांनी नेत्रदीपक यश मिळवलेले आहे, ही वस्तुस्थिती आहे. जयंत नारळीकर, सुखात्मे, माशेलकर, गोवारीकर ही नावे आपल्या डोळ्यांसमोर आहेतच. जयंत नारळीकरांनी तर म्हटलेच आहे, ''मातृभाषेतून विज्ञान शिकवणे सोपे जाईल. विज्ञान हा विचार करायला लावणारा विषय आहे. विद्यार्थी ज्या भाषेत विचार करतो ती भाषा विज्ञान-शिक्षणाला उपयुक्त ठरते.''

सुरुवातीपासून इंग्रजी आल्याशिवाय मुलाची जीवनात, विशेषत: विज्ञान-तंत्रज्ञानात, प्रगती होणार नाही. पण ही समजूत चुकीची आहे. जगामध्ये चीन, रशिया, जपान, कोरिया, फ्रान्स, जर्मनी, इटली, पोलंड, स्पेन, हॉलंड, बेल्जियम, पोर्तुगाल असे कितीतरी देश आहे की, जे विज्ञान-तंत्रज्ञानात अतिशय प्रगत झालेले आहेत. पण या सगळ्या देशांमध्ये इंग्रजी सक्तीचे नाही.

यांपैकी बहुतेक देशांमध्ये इंग्रजीला प्रमुख विषय म्हणून देखील मान्यता नाही. पूर्वी ब्रिटिश साम्राज्यात असलेले देश सोडले तर इंग्रजीचे प्रस्थ कुठल्याही देशात नाही. त्यामुळे इंग्रजी ही जागतिक भाषा आहे, हा पुन्हा एक भ्रमच आहे. इंग्रजी ही सगळ्या जगात बोलली जाते हे सुद्धा एक अर्धसत्य आहे, याचा तिकडे प्रवासाला गेले की अनुभव येतो.

खरे तर सर्व विषयांचे कला, वाणिज्य, विज्ञान, तंत्रज्ञान यांचे उच्च आणि अत्युच्च शिक्षण मराठीतून देणारे मराठी विद्यापीठ आतापर्यंत महाराष्ट्रात स्थापन व्हायला हवे होते. वास्तविक १९४९ साली पुणे विद्यापीठाची स्थापना कला, वाणिज्य, विज्ञान हे सर्व विषय मराठीतून शिकवायचे याच उद्देशाने झाली होती, पण आज अर्धशतक लोटले तरी पुणे विद्यापीठात मराठी सोडले तर इतर कोणत्याही विषयाचे शिक्षण मराठीतून दिले जात नाही. नागपूर विद्यापीठाचे माजी कुलगुरू डॉ. कोलते यांनी आपल्या १९८३ साली दिलेल्या ७३ व्या दीक्षान्त समारंभाच्या भाषणात शिक्षाणच्या सर्व स्तरांवर, सर्व विषयांचे जनसामान्यांच्या मातृभाषेतून म्हणजेच मराठीतून शिक्षण देणाऱ्या मराठी विद्यापीठाची अशीच संकल्पना सविस्तरपणे मांडलेली होती.

मराठी ही ज्ञानभाषा झाली तरी ती जेव्हा सर्वार्थाने व्यवहारभाषा होईल, तेव्हाच ती इंग्रजीला पर्याय म्हणून व्यवहारात इंग्रजीची जागा घेईल. म्हणून महाराष्ट्रातल्या जीवनव्यवहाराचे मराठीकरण होणं आवश्यक आहे.

एकवेळ तुम्ही मंत्र्यांशी मराठीत बोलू शकाल, पण हॉटेलातल्या वेटरशी किंवा दुकानातल्या विक्रेत्याशी इंग्रजीत बोलावं लागतं. हा हाडीमासी खिळलेला, रक्ताच्या अणुरेणूंतून भिनलेला इंग्रजीधार्जिणेपणा, ही मानसिकता बदलली तरच जीवनव्यवहाराचे मराठीकरण होणार आहे. ही मानसिकता भिनायला पारतंत्र्याची दीडशे वर्षे लागली. ती नष्ट करायला कदाचित स्वातंत्र्याची शंभर, दीडशे, किंवा दोनशे वर्षे लागतील. पण केव्हा तरी सुरुवात करायला हवी.

मराठी ही काही सुखासुखी मरणारी भाषा नाही. माहिती तंत्रज्ञानाचा पर्याय निर्माण झाला

तरी तो न पचविण्याइतकी ती लेचीपेची नाही. अखेरीला मराठी ही दहा कोटी लोकांची मातृभाषा आहे. जगातली दहाव्या क्रमांकाची भाषा आहे. तिला हजार-बाराशे वर्षांचा वैभवशाली आणि समृद्ध इतिहास आहे. या इतिहासात मराठीला काही कमी पर्याय निर्माण झाले नाहीत. मराठीवर काही कमी आक्रमणे झाली नाहीत. फारसी, अरेबिक, उर्दू अशी अनेक आक्रमणे झाली. पण ती मराठीने पचवली आहेत. इतकेच नव्हे तर इंग्रजीसारख्या बलवत्तर भाषेचं आक्रमणही तिने आतापर्यंत पचविले आहे.

पण इतकी आक्रमणे पचवून मराठी भाषा जगली आहे, जगते आहे. ती कोणामुळे ? भाषा काही शासनामुळे जगत नाही. केवळ शिक्षक-प्राध्यापकांमुळे जगत नाही. अखेरीला भाषा जगते ती साहित्यामुळे. नुसती जगत नाही, तर ती उमलते, फुलते, बहरते, आशयसमृद्ध होते, संस्कारसंपन्न होते ती साहित्यामुळे. ज्या भाषेत नवं नवं सकस साहित्य सतत निर्माण होत असतं ती भाषा कधीच मरत नाही. ज्या भाषेतलं साहित्य अमर, ती भाषा अमर. साहित्य हा भाषेचा प्राण आहे. आज संस्कृत जरी वापरात नसली तरी जिवंत आहे, ती कालिदासाच्या शाकुन्तलामुळे, मेघदूतामुळे, भवभूतीच्या उत्तर रामचरितामुळे, बाणभट्टाच्या कादंबरीमुळे. भाषा जगवण्याची जबाबदारी ही काही शासकीय अधिकाऱ्यांची नाही, राजकारणी नेत्यांची नाही. ते फक्त भाषेचा वापर करत असतात. भाषेची निर्मिती करत नसतात. भाषा निर्माण करतात ते साहित्यिक, कवी, लेखक, विचारवंत. म्हाईंभट, मुकुंदराज, ज्ञानेश्वर, नामदेव, तुकाराम, चिपळूणकर, आगरकर, टिळक, फुले, कर्मवीर शिंदे, आंबेडकर, केशवसुत, गडकरी, बालकवी, मर्ढेकर यांच्यासारखे साहित्यिक साहित्य निर्माण करून भाषा जगवतात नि आपल्यासारखे साहित्यप्रेमी रसिक हे साहित्याचा आस्वाद घेऊन साहित्य जगवतात.

ज्या भाषेत सदोदित उत्तमोत्तम साहित्य निर्माण होते नि साहित्यरसिकांच्या प्रतिसादामुळे ते जगते, फुलते, विकसित होते, ती भाषा कधीच मरत नाही. तिला मरण नाही. म्हणून भाषा जगवण्याची जबाबदारी साहित्यिकांची आहे अणि साहित्य जगवण्याची जबाबदारी साहित्यप्रेमी रसिकांची आहे.

— श्री. राजेंद्र बनहट्टी

■

---

**श्रीमती शकुंतला क्षीरसागर यांच्याकडून ग्रंथालयास सप्रेम भेट**

**समाजविकास :** श्री. के. क्षीरसागर
**वाङ्मयीन मूल्ये :** श्री. के. क्षीरसागर
**सुवर्णतुला :** श्री. के. क्षीरसागर
**आधुनिक राष्ट्रकवी / रवींद्रनाथ ठाकुर :** श्री. के. क्षीरसागर
**वाङ्मयीन लेखसंग्रह :** श्री. के. क्षीरसागर.
**स्त्री जीवन व विवाहविषयक लेखसंग्रह :** श्री. के. क्षीरसागर
**बायका :** श्री. के. क्षीरसागर, संपादक व. दि. कुलकर्णी.

## हीं तों कृतज्ञतेचीं वचनें । स्वीकारा जी ॥

# वेदविदां वरिष्ठौ !

❑

### डॉ. मो. गो. धडफळे

❑

वेदवेत्त्यांमधील दोन सर्वोच्च श्रेणीतील (वेदविदां वरिष्ठौ) संशोधक दृष्ट लागल्यासारखे एकामागून एक या जगाचा निरोप घेऊन गेले भागवत शुद्ध एकादशीला (११ डिसेंबर २००१) संध्याकाळी प्रा. रा. ना. दांडेकर यांचे देहावसान झाले आणि त्याच रात्री प्रा. ग. ह. तारळेकर हेही कालवश झाले. दोघांच्या जाण्यात काही तासांचेच अंतर, पण पाश्चात्य दिनदर्शिकेनुसार तारीख उलटून ११ ची १२ झाली.

इतक्या कमी अंतराने या दोघांचे निधन झाले नसते, तर कदाचित त्यांच्या जीवनकार्यातील साम्य-भेदाचा साकल्याने विचार करणे आपल्याला सुचले नसते. आता तो विचार मनात येतो.

हे दोघेही जुन्या पिढीतले. ब्रिटिश अमदानीतील पाश्चात्य शिक्षण पद्धतीने शिकलेले; अतिशय अभ्यासू व म्हणूनच कमालीचे यशस्वी झालेले विद्यार्थी. परीक्षेसाठी असणारी बहुतेक सर्व पारितोषिके मिळवणारे. दोघांचाही मुख्य विषय संस्कृतच; पण दोघांपैकी कोणीच जुन्या पाठशाळा परंपरेतले नव्हते. भांडारकरांची पाठ्यपुस्तके व आपट्यांचे संस्कृत गाइड वाचूनच संस्कृत शिकलेले.

दांडेकर सर सातारचे, तर तारळेकर राधानगरीजवळील तारळ्याचे. सातारच्या दांडेकर घराण्यात काही खास अशी धार्मिक परंपरा नव्हती. तारळेकरांच्या कुळात मात्र समर्थांच्या खडावा व पताका यांचा वारसा होता व या कुळाचाराचा त्यांना सार्थ अभिमानही होता. संस्कृतचे हुशार विद्यार्थी म्हटल्यावर मग जगन्नाथ शंकरशेट शिष्यवृत्तीचे मानकरी का, असा प्रश्न मनात येणे अतिशय स्वाभाविक आहे; पण त्याला मात्र दोघांच्याही बाबतीत 'नाही' हेच उत्तर आहे. अर्थात् त्या पहिल्या क्रमांकाच्या गुणांकाच्या जवळपास दोघेही पोचलेले होते दोघांचीही अध्ययन-चर्या (करिअर) महाविद्यालयीन विद्यार्थीदशेत अधिक चमकदार झाली.

केवळ एखाद्या विषयात प्रबंध लिहून एकदा विद्यावाचस्पती ही पदवी मिळविली की, आभाळाला हात पोचले असे मानणारे हे दोघेही नव्हते. प्रा. दांडेकरांनी जर्मनीत हायडेलबर्ग येथे जाऊन शार्मण्य भाषेत स्वतःचा 'Vedische Mensch' हा प्रबंध सादर करून विद्यावाचस्पती ही पदवी प्राप्त केलीच, पण पुढे सातत्याने पन्नास वर्षांहून अधिक काळ त्याच मूळ वेद या विषयावर संशोधनकार्य केल्याने त्या विद्यापीठाच्या शिरस्त्याप्रमाणे त्या पदवीच्या नूतनीकरणाचा असामान्य सन्मानही प्राप्त करून घेतला. या प्रसंगी सत्काराला उत्तर देताना सर

अतिशय झोकदार शैलीत 'डॉइश'मध्ये बोलले. त्यावेळी समारंभाला योगायोगाने उपस्थित असलेल्या कै. प्रा. शं. गो. तुळपुळे यांनी ही हकीकत 'दै. सकाळ'मध्ये एक खास लेख लिहून दिली. महत्त्वाची बाब अशी की, संस्कृतबरोबरच त्याच्या अध्ययनास पूरक असणाऱ्या प्राचीन भारतीय संस्कृती व इतिहास या विषयातही (मुंबई विद्यापीठ, १९३३) एक दुसरी पदव्युत्तर पदवी दांडेकर सरांनी प्राप्त करून घेतली होती. गुप्तकालीन भारतवर्ष, सिंधू संस्कृती या व अशा विषयांवर प्रभूत लेखनही त्यांनी केले. तारळेकर सरांनीही बनारस हिंदू विद्यापीठाची 'हिंदी' या विषयातील पदव्युत्तर पदवी मिळवली होती व हा विषय जळगाव व धुळे येथे महाविद्यालयीन व पदव्युत्तर वर्गाच्या विद्यार्थ्यांना ते शिकवतही असत.

महाविद्यालयात संस्कृत शिकवताना ह्या दोन्ही प्राध्यापकांनी शांकरभाष्य, गीता, तर्कसंग्रह, काव्यशास्त्र, मेघदूत, रघुवंशादी काव्ये, संस्कृत नाटके हे जवळजवळ सर्व विषय कित्येक वर्षे शिकवले. प्रसंगी रमणबाग शाळेत शालेय विद्यार्थ्यांना शिकवून व फर्ग्युसन महाविद्यालयात पूर्ण १८ वर्षे प्राध्यापकी करून मगच डॉ. दांडेकर पुणे विद्यापीठाच्या स्थापनेपासून संस्कृत-प्राकृत विभागाचे पहिले विभागप्रमुख म्हणून दाखल झाले आणि निवृत्तीपर्यंत त्या पदावर राहिले. त्यांच्या कर्तृत्वाने या विभागात प्रपाठक-प्राध्यापक अशी पदे निर्माण झाली. पाली व अर्धमागधीसाठी व्याख्यातृपदे मिळाली आणि त्यांच्या वेदविषयातील जगन्मान्य संशोधन-कार्याने प्रभावित झालेल्या विद्यापीठ-अनुदान-आयोगाने 'वेद व व्याकरण' या विषयांसाठी एक प्रगत अध्ययन केंद्रही पुणे विद्यापीठाला बहाल केले. सर अर्थातच त्याचे पहिले निदेशक (Director) झाले. १९७४ साली जेव्हा ते या पदावरूनही (वयाच्या ६५ वर्षी) निवृत्त झाले, त्यावेळी पुणे विद्यापीठाने त्यांच्या कार्याची पावती म्हणून 'सन्मान्य आजीव प्राध्यापक' Professor Emeritus ही गौरवाची उपाधी त्यांना दिली. सहा विद्यापीठाच्या सन्मान्य डी. लिटस्, महामहोपाध्याय, साहित्य अकादमी व रॉयल एशियाटिक सोसायटी अशा मान्यवर संस्थांचे सन्मान्य सदस्यत्व, अनेक राज्यांकडून प्रत्येकी लाख रुपयांहून अधिक रकमेचे सन्मान हे व असे बरेच काही लाभूनही प्रा. दांडेकरांना अखेरपर्यंत पुणे विद्यापीठाने दिलेली 'आजीवन प्राध्यापक' ही एक उपाधीच फार मोलाची वाटत राहिली. या विद्यापीठातच प्रा. दांडेकरांची खरीखुरी घडण झाली. साताराची शाळा, सांगलीचे विलिंग्डन महाविद्यालय, पुण्यातील 'दाक्षिणात्य महाविद्यालय' (Deccan College) येथे त्यांचे विद्यार्थिजीवन संपन्न झाले. फर्ग्युसन महाविद्यालयात अध्यापनाचा समृद्ध अनुभव आलाच पण डे. ए. शिक्षणसंस्थेचे आजीव सदस्य व पुढे कार्यवाह या नात्याने प्रशासकीय अनुभवाचाही मोठा लाभ झाला. याच बळावर दांडेकर सरांनी पुणे विद्यापीठात केवळ विभाग-प्रमुख म्हणूनच नाही, तर कलाशाखेचे अधिष्ठाता, कार्यकारिणीचे सदस्य आणि प्रसंगी हंगामी कुलगुरू म्हणूनही मोठ्या मानाची व जबाबदारीची पदे भूषविली.

प्रा. तारळेकरांनीही आपल्या परीने महाविद्यालयीन विभाग प्रमुख, उपप्राचार्य, विद्यापीठात विषयविभाग सदस्य, कला शाखेचे सदस्य, माध्यमिक शालान्त संस्कृत विभाग मंडळाचे सर्वोच्च अधिकारी, अनेक गायन-संस्थांचे अध्यक्ष अशी कैक मानाची पदे आपल्या वैशिष्ट्यपूर्ण











सौजन्यशीलतेने भूषविली.

प्रा. दांडेकर व प्रा. तारळेकर या दोघांचेही मुख्य संशोधनक्षेत्र वेदसाहित्य हेच होते. पण त्याचबरोबर प्रा. तारळेकरांचे भरताच्या नाट्यशास्त्रावरील अमोल संशोधन हे लक्षात घ्यायला हवे. त्यांच्या प्रबंधाचा विषय भरताचे नाट्यशास्त्र हाच होता. यास पुढे अधिक पुस्ती देऊन त्यांनी लेखन केले आणि त्या लेखनावरील ऑक्सफर्ड विद्यापीठाच्या प्रकाशनाचा दर्जा गाठणारे त्यांचे ग्रंथ मोतीलाल बनारसीदास यांनी प्रकाशित केले. साहित्य-संस्कृती मंडळाने भारतीय-संगीत-शास्त्रावरील अधिकृत आकरग्रंथ (source-book) असलेल्या शार्ङ्गदेवाच्या 'संगीत रत्नाकराचे' संशोधित, सटीप, भाषांतरसहित तीन मोठे खंड (दुसऱ्या आवृत्तीचा मान लाभलेले) प्रकाशित केले. भारतीय संगीतशास्त्रावर (musicology) प्रा. तारळेकरांचा अनन्यसाधारण अधिकार होता. सुप्रसिद्ध गायिका मोगूबाई कुरडीकर यांच्या सुकन्या श्रीमती किशोरी अमोणकर संगीतात अधिक जाण प्राप्त करून घेण्यासाठी दीर्घकाळ प्रा. तारळेकरांच्या ज्ञानद सहवासाचा लाभ घेत असत. भारतीय संगीतशास्त्राला अभिप्रेत असलेली सर्व वाद्ये सर्व भारतभर हिंडून, पाहून, स्वत: वाजवून व छायाचित्रांसह त्यांची सविस्तर माहिती देऊन प्रा. तारळेकरांनी भारतीय वाद्यांवर अधिकृत संशोधनग्रंथ लिहिले.

प्रा. दांडेकर भारतभर हिंडले ते मुख्यत्वेकरून संस्कृत आयोगाचे काम करण्यासाठी. भारतातील कानाकोपऱ्यात विविध पाठशाळा व गुरुकुले यांतून कोणकोणत्या पद्धतीने अध्यापन केले जाते, याची माहिती प्रत्यक्ष भेटींनी घेऊन, त्याची विस्तृत टिपणे ठेवून, स्वत:च्या हाताने या सर्वांचा अतिशय विस्तृत अहवाल दांडेकर सरांनी लिहिला. आजही भांडारकर संस्थेत या मूळ लेखनाची हस्तलिखिते आढळतील.

प्रा. तारळेकरांची दुसरी भारतभ्रमंती सामवेदाच्या संशोधनकार्यासाठी झाली. केरळच्या खेड्यापाड्यांतून, नदीनाले पार करून, शेतातून चिखल तुडवीत, अनेक कुटींमध्ये राहणाऱ्या व आता अत्यंत दुर्मिळ होत जाणाऱ्या छंदोगांच्या व उद्गात्यांच्या गळ्यातून उतरलेले सामगान प्रा. तारळेकरांनी सर्व जागतिक विद्वानांसाठी ध्वनिफितीत कायमचे संगृहीत केले आहे. हे त्यांचे कार्य अजोड आहे. या कार्याची झलक प्रात्यक्षिकांसह कै. वामनराव देशपांडे यांच्या उपस्थितीत महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या माधवराव पटवर्धन सभागृहात प्रदीर्घ व्याख्यान देऊन प्रा. तारळेकरांनी दाखवली. त्यांच्या मृत्यूच्या काहीच काळ आधी इंदिरा गांधी कलाकेंद्राने 'सामवेदावरील पुष्पसूत्र' या नावाचा त्यांचा संशोधनग्रंथ स्वच्छ, गुळगुळीत, कलाकागदांवर मोहरेदार छपाईत छापून प्रसिद्ध केला. "हे अनन्यसदृश कार्य केवळ त्यांच्याकडूनच झाले असते, नव्हे; यासाठीच ते जिद्दीने जगले" असे त्यांच्याविषयीचे गौरवोद्गार दुसऱ्या तितक्याच वेद व संगीतावरील अधिकारी प्रा. चिं. ग. काशीकर यांनी काढले. इतर वेदांत केवळ तीनच स्वर येतात. उदात्त, अनुदात्त आणि स्वरित. सामवेदात 'सन्नतर' नावाचा एक चौथा स्वरही येतो.

केवळ भारतभरच नव्हे, तर जगात सर्वत्र वेदविद्येचे अधिकारी म्हणून अनेकवार हिंडून ज्यांनी व्याख्याने दिली आणि वेदविषयक चर्चासत्रात भाग घेतला, ते प्रा. दांडेकर हे तर 'वेद-

भांडारकर'च. ते चोपन्न वर्षे भांडारकर-प्राच्यविद्या मंदिराचे मानद सचिव होते, तितकीच वर्षे संशोधन-वार्षिकाचे संपादक होते व अखिल भारतीय प्राच्यविद्या परिषदेचे मानद सचिव होते, विश्वसंस्कृत सम्मेलनाचे चार वेळा अध्यक्ष व पुढे आजीवन सदस्य म्हणून गौरवले गेले होते, शल्य व अनुशासन पर्वाचे चिकित्सक संपादक होते, म्हणून मी हे म्हणतो आहे, असे नाही. दांडेकर सर यज्ञविधीवरील श्रौतकोषाचे आंग्ल भाषांतर सादर करणारे व मुख्यत्वे म्हणजे लुई रनू या फ्रेंच पंडिताने सुरू केलेली 'Bibliographie Vedique' या वैदिक संदर्भसूचीचे रनूंच्या मृत्यूमुळे खंडित झालेले कार्य आपल्या व्यासंगपूर्ण Vedic Bibliography याच्या बृहत्खंडांनी अखंड चालू ठेवणारे संशोधक-साहाय्यक-संपादक होते, म्हणून. आजवर प्रसिद्ध झालेल्या पाच खंडांमधून व बहुतांशी पूर्ण झालेल्या व सरांच्या निधनानंतर प्रकाशित होणाऱ्या सहाव्या खंडातून वेदाभ्यासकांना आजतागायत जगाच्या कानाकोपऱ्यातून, विविध भाषांतून, कालिकांतील लेख व स्वतंत्र पुस्तकांतून प्रसिद्ध झालेल्या लेखनाची माहिती प्राप्त होणार आहे. या सूचिग्रंथांना मी 'वेदभांडार' म्हणतो व सरांना 'वेदभांडारकर' म्हणून संबोधतो.

प्रा. तारळेकरांचाही भरतनाट्यशास्त्रातील २८ व्या प्रकरणावरील शोधग्रंथ त्यांच्या निधनोत्तर प्रकाशित होणारं आहे. हातात शस्त्र असताना सैनिकाला वीरमरण यावे, त्याप्रमाणे या दोन विभूतींना हातात संशोधनाची लेखणी असताना विद्वन्मरण प्राप्त झाले.

सामवेदावर संशोधन करण्यासाठी अत्यंत सखोल व सूक्ष्म असे संगीतशास्त्राचे ज्ञान असायला हवे. ते प्रा. तारळेकरांकडे होते व सर्वांना सामवेदाची खरी ओळख व्हावी, यासाठी त्यांनी सामवेदाच्याच अभ्यासाला पूर्णपणे वाहून घेतले. प्रा. दांडेकरांनी एकूण वेदसाहित्यात महत्त्वाचा असा जो विषय म्हणजे 'वैदिक दैवतशास्त्र' हा आपल्या संशोधनाचा प्रमुख विषय ठरवून त्याच्या अनुषंगाने सर्व भारतीय विचारप्रणाली व संस्कृती यांचे आलोडन केले.

'वैदिक दैवतशास्त्र' हे स्थिर झालेले दैवतशास्त्र नसून 'विकसनशील दैवतशास्त्र' ("Evolutionary Mythology') होते, हे त्यांनी इतर सर्व पाश्चात्यपंडितांच्या लेखनाचा साक्षेपी आढावा घेऊन आणि इंद्र, वरुण, विष्णू इत्यादी देवतांच्या बदलत्या स्वरूपांची चर्चा करून आपल्या 'वैदिक देवतांचे अभिनव दर्शन' या कौशिक व्याख्यानमालेत दिलेल्या व्याख्यानसंग्रह-पुस्तकातून पटवून दिले. आम्ही संस्कृतचे विद्यार्थी ज्ञानेश्वरीसारखी या पुस्तकाची पारायणे करत असू. आर्य हे मूळ किरगीझ प्रांतातून मध्य आशियाद्वारा भारतात सिंध-पंजाब प्रांतात दाखल झाले, हे त्यांचे सातत्याचे प्रतिपादन असायचे. या आर्यांचा धर्म अर्थातच मूलतः भारताला परकीयच होता. आर्यपूर्व सिंधुधर्म व आर्यधर्म यांच्या विशिष्ट रसायनाने हिंदुधर्माची निर्मिती झाली. या महान धर्मात अनेक 'अन्तर्विरोध' (paradoxes) ही आहेत. सर्व लोक धार्मिक व तात्त्विकदृष्ट्या समान आहेत, असे एकीकडे हिरीरीने सांगणारा हा धर्म त्याचवेळी एका निष्ठूर, अपरिवर्तनीय, उच्चावच समाजव्यवस्थेकडे केवळ कानाडोळा करतो, एवढेच नाही, तर तिचा सक्रिय पुरस्कारही करतो, हे सर्व सत्य परखडपणाने सरांनी नागपूर विद्यापीठाने प्रकाशित केलेल्या (''हिंदुधर्म - इतिहास आणि आशय'', नागपूर, १९६९) व्याख्यानसंग्रहात मांडले आहे. सत्यकथन हे आद्य कर्तव्य समजून वेदांचे हे थोर अभ्यासक म्हणतात,

''इतिहासपूर्व हिंदू धर्म वेदांचा कोणत्याही रीतीने ऋणी असणे संभवनीय नव्हते आणि वैदिक धर्माचा ऐतिहासिक हिंदुधर्मावरील प्रभाव केवळ औपचारिक व वरवरचा होता.''

''वेद हे अखिल भारतीय विचारपरंपरेचे व संस्कृतीचे मूळ उगमस्थान आहेत, हाही एक दावाच आहे; सत्य नाही.'' हिंदुधर्माबाबतचे हे मौलिक संशोधन सर्व उदारदृष्टीच्या प्रागतिक व जिज्ञासू हिंदूंनी व इतरांनी वाचायलाच हवे. गुप्तकाल, आर्यांचे मूलस्थान (Ur-heimat), मगध-विचार-संघर्ष (Magadhichen Gedankenkreise), आणि फर्ग्युसनच्या 'वार्षिकात' लिहिलेला 'Svapna-episode in the Svapnavasavadatta' ('स्वप्नवासवदत्तेतील स्वप्नदृश्य') किमान एवढे लेखन सर्वांनी वाचणे अगत्याचे आहे. आशयदृष्ट्या सामवेद हा स्वतंत्र वेद नाही. साम गानपद्धतीत ऋक् म्हणायची असते एवढेच! याचमुळे 'जी ऋचा तेच साम' (यर्क तत्साम). पण कदाचित 'छांदोग्य' हे सामवेदीय उपनिषद् असल्याने भगवंतांनी 'वेदानां सामवेदोऽस्मि' अशी स्वतःची विभूती सांगितली असेल. वेदांतील परस्परपूरक भागांचे मौलिक संशोधनकार्य करून ज्या दोन थोर विभूतींनी एकामागोमाग एक 'महाप्रस्थान' साधले, त्यांना ऋचेची अर्थसंपन्नता व सामाची मधुरता एकत्र करून वंदन करायला हवे!

कविवर्य भास्करराव तांबे यांच्या ओळी आठवतात -

*''कोणी आणू नका आसवे लोचनी।*
*छे! न ही शून्यता, पूर्णता, सद्‌गती।*
*आज वीणेवरी भगवती शारदा।*
*साममंत्रावली स्वैर आलापू ती॥''*

❑

## सखा तो रामचंद्राचा

भांडारकर-प्राच्य-विद्या संशोधन मंदिरात, संस्कृत-प्राकृतची पुस्तके वाचणारा मी 'रामकृष्ण' (भांडारकर) व 'रामचंद्र' (दांडेकर) यांच्या संस्थेचा पाईक. संस्थेतील माझ्या निवेदनाची सुरुवात न चुकता

''रामकृष्णं नमस्कृत्य, रामचन्द्रं ततः परम्।
वन्दित्वा भवतः सर्वानारभे वचनं मम॥''

या स्वरचित साध्या अनुष्टुभ रचनेने करणारा. पैकी सर रामकृष्ण भांडारकर यांविषयी एक एकवीस पानांचा प्रदीर्घ लेख मी 'महाराष्ट्राची मानचिन्हे' (मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई. संपादक प्रा. साखळकर व डॉ. सुभाष भेंडे, पृ. ४६-६७) या चरितलेखसंग्रहात लिहिला व डॉ. रा. ना. दांडेकर यांचेविषयी याच पत्रिकेत व इतरत्रही अनेक ठिकाणी लिहिले आहे.

माझ्या अभ्यासविषयांबाबत गुरुवर्य रामचंद्र दांडेकर यांचा जसा संबंध आहे, तसाच माझ्या अभ्यासेतर कलादी जीवनाशी दुसऱ्या एका 'रामचन्द्रां'चा संबंध आहे. हे म्हणजे कै. रामचंद्र चितळकर, अण्णा ऊर्फ सी. रामचंद्र. त्यांचे नाव उच्चारले की, संज्ञाप्रवाहाने

त्यांचा जिगरी दोस्त आठवतो. मास्टर 'भगवान'! वारकऱ्यांना पंढरीचे 'सावळे ब्रह्म' जेवढे प्रिय, कृष्ण भक्तांना 'बासरी वाजवणारे निळे ब्रह्म' जितके आवडते, तितकेच माझ्या पिढीतल्या तरुणाईला 'भगवानदादा' नावाचे बेहोष नाचणारे 'नाचरे परब्रह्म' प्यारे. हमारा यह प्यारा, हमारा यह लाल, 'अलबेला' का 'प्यारेलाल' हालही सचमुचमें भगवानको प्यारा हुआ ।

काळाची गत कोण रोखू शकतो ? आता आम्हाला काळजी लागून राहिली आहे ती मेनका-रम्भांची. ''रम्भा-सम्भा करुनि दमलो, दमलो रे भगुराया, दमलो रे भगुराया ॥'' असे म्हणण्याची त्यांच्यावर वेळ येणार !

''करी मनोरंजन जो मुलांचे जडेल नाते प्रभुशी तयाचे'' अशा वृत्तीच्या साने गुरुजींच्या कथा बालवयात झपाटल्यासारख्या वाचल्या. तरुणपणी 'एस. पी.'च्या समृद्ध ग्रंथालयात संस्कृत-प्राकृत वगैरे विषयांवरची पुस्तके जशी मन लावून वाचली, तसेच आम्ही सर्वजण 'आर्यन', 'श्रीकृष्ण', 'पॅरेमाउंट', 'विजय' या थेटरात भगवानदादांच्या नाचात मनाने सामील झालो. यात कुठे काही चूक केली, हलक्या थराला उतरलो, असे अजिबात वाटत नाही. ज्या वयात जे अनुभवायचे, ते अनुभवलेच पाहिजे, ही आमची धारणा. आपल्या भारतात जीवनापेक्षा 'मृत्यूत्तर स्थिती' (eschatology) यावर सर्वांत जास्त विचार. आयुष्याच्या अखेरीस आयुष्यच 'जगायचे' राहून गेले, हीच खंत अनेकांना वाटत असणार. असो. आयुष्यात हालअपेष्टा सहन करतानाही 'खिचडीकी मजा कभी नरम, कभी गरम' असे घासलेल्या भांड्यांच्या ठेक्यावर नाचत, 'आयुष्य रंगतपणे व रंगेलपणा जगा' असा संदेश देणारा तरुणांचा एक आगळा संतशिक्षक म्हणूनच आम्ही दादांकडे पाहत असू. म्हणतही असू,

''करी मनोरंजन युवा-मनांचे । 'भगवान' म्हणती जन त्यास साचे ।''

'ज्ञानदेव महाराज की जय' असे कीर्तन करताना टाळकरी जयघोष करतात. तसे आम्ही तरुण अण्णा चितळकरांच्या संगीतात रंगल्यावर एकमुखाने म्हणत असू ''बोला, 'भगवान' 'सी' रामचंद्र की जय !''

आणि म्हणूनच आमच्या या जीवनगुरुंच्या निधनानंतर त्यांनाही कृतज्ञतेने श्रद्धांजली अर्पण करणे कर्तव्याचे वाटते. सी. रामचंद्र व त्यांचा परमसखा यांची मायावी नगरीतल्या हिंदी चित्रसृष्टीत जी 'मराठी पाऊले' 'पुढती' पडली आहेत, त्याचा अभिमान मराठी मनाला सतत वाटत रहायला हवा. मा. लतादीदींच्या आवाजाला जी 'लोच' आहे, त्याचे श्रेय अण्णांना जात नाही काय ?

चित्रपटनिर्मितीच्या तंत्रातील बहुतांश भागांशी दादा संबंधित होते. नायक होते, उपनायक होते, नर्तक होते, फाइटमास्टर, डान्समास्टर होते, निर्माते होते अन् दिग्दर्शकही होते. दिग्दर्शकाकडे मोठमोठ्या कलाकारांकडून कौशल्याने हवी ती कामे करून घेण्याचे कौशल्य लागते. एका चित्रदृश्यात अशोककुमार थोडे उंचावरून उडी मारत आहेत, असे दृश्य होते. धोका नको म्हणून डमीचा वापर करावा, असे दादामुनींनी सुचवले. आता त्यांचे म्हणणे कोण अव्हेरणार ? पण यामुळे ते दृश्य थोडे कमी परिणामकारक झाले असते. दिग्दर्शक भगवानदादांनी मोठ्या जिद्दीने अशोकदांनाच उडी मारायला लावली. शॉट नुसता 'ओके'च नाही 'ए वन'











झाला. स्वत: दादामुनींनाही फार आवडला.

मराठी माणसात एवढे उत्तम कलागुण आणि तंत्रकौशल्य असतानाही अखेरीस मात्र व्यावहारिक, आर्थिक, लौकिक, भौतिक पातळीवर ही मराठी माणसे पूर्णपणे यशस्वी का होऊ शकत नाहीत, हे एक कोडेच आहे. कोडे जरी सुटले तरी खेद हा उरतोच.

खरे तर १९५१ साली रजतपटावर झळकलेल्या 'अलबेला'ने दादांना भरघोस यश व संपदा दिली. या पुढचा भाग अधिक धन्यता वाटावा, असा आहे.

तब्बल २५ वर्षांनंतर म्हणजे १९७६ मध्ये 'शोले'ने अफाट यश मिळवले, पण या तरुणसंपन्न 'शोले'शी लोकप्रियतेच्या बाबतीत वयस्कर-साध्या 'अलबेला'ने दुसऱ्या राउंडला बरोबरीने मुकाबला केला. जिथे वेचायला कोणी नाही, त्या रजतपटाच्या मंचावर नोटांचा अन् नाण्यांचा पाऊस पडला.

दादांचा 'अलबेला' त्यांच्या जीवनाची कहाणी आहे. 'कलेसाठी कला' हे एक अर्धसत्य; जीवनासाठी कला हे दुसरे अर्धसत्य', 'जीवन-कला' हें मात्र पूर्ण सत्य. एका जीवनाचे कलात्मक दर्शन म्हणजे अलबेला. नायकाचे रूप नसलेल्या पण 'सिक्रेट लाइफ ऑफ वॉल्टर मिटी'तल्या डॅनी केप्रमाणे स्वप्ने पाहणारा एक गरीब, भोळा तरुण एक यशस्वी कलाकार होऊ शकतो, हीं साधी सरळ कहाणी एकाच वेळी चित्रपटातल्या 'प्यारेलाल'ची व जीवनपटातल्या भगवान आबाजी पालव नावाच्या एका गरीब गिरणी कामगाराच्या मुलाची गोष्ट आहे. भगवान-दादांमधला 'नायक' शेवटपर्यंत आर्थिकदृष्ट्या निम्नस्तरातील एक विनोदावर समाधान मानणारा आणि समवस्थांबरोबर आनंदाने जीवन कंठणारा तरुण राहिला आहे. या वास्तवाचे मार्क्सवादी विश्लेषण साम्यवादी चरित्र-अभिनेते कै. बलराज साहानी यांनी फार चांगले केले आहे. ते म्हणतात, "राजकपूर व युसुफ-मियाँ (दिलीपकुमार) हे उच्चभ्रूंमध्ये लोकप्रिय असतानाही मजूर वर्ग व गिरणी कामगारांत भगवानदादाच लाडके ठरले. भगवानदादांसारखे आपणही काही दाखवावे, या हेतूनेच राजने 'श्री ४२०' मध्ये फुटपाथवर चहा करून विकणारा, केळी विकणारी, सायकलवरून दूध घालायला जाणारा अशी माणसे दाखवून 'रम्मय्या वस्सावय्या...'सारखे जनगीत दाखवले." पुढे पुलंनाही 'गुळाचा गणपती' दाखवावासा वाटला आणि आमच्या दादा कोंडक्यांनी तर 'अलबेला'चा मराठी अवतारच प्रकट केला.

१९३०च्या 'बेवफा आशिक' या मूकपटाने दादांची 'कॅरिअर' (हा हिंदीतल्या समग्र थोर कलाकारांचा उच्चार आहे.) सुरू झाली. असे म्हणतात की, दादांच्या मुखावरील बोलक्या अभिनयामुळे त्यांच्यापुरता हा 'मूक'पट 'बोल'पटच ठरला !

त्यानंतर १९३५ मध्ये म्हणजे ज्यावेळी माझा जन्मही झाला नव्हता त्यावेळी 'हिम्मत-ए-मर्दा' या नावाचा स्टंटपट आला. आम्ही आमच्या लहानपणी 'नादिया व जॉन कॉवस' यांच्या चित्रपटांबरोबरच 'भगवान-बाबूराव' यांचे 'दे दनादन' छाप मारामारी-चित्रपट पाहिले, 'अनुभवले' असेच म्हणायला हवे. कारण थेटरात आमच्यावरोबर आलेल्यांना आमचे व आम्हाला त्यांचे ठोसे तिथल्या तिथे खावे लागत असत !

यानंतर १९५१ चे सोनेरी वर्ष आले. 'विजय'ला अलबेला दाखल झाला. यानंतर 'ला'

हे शेवटचे अक्षर 'ला'-भदायक ठरल्याने झमेला, हल्लागुल्ला, रंगीला, लावेला असे अनेक 'ला'न्त चित्रपट दाखल झाले. गीतावाली, कुमकुम, राधिका, मुमताज या दादांच्या नायिका. गीताबाली एवढी उत्कृष्ट नर्तकी, पण निदान एका 'दिवाना... परवाना....' या अलवेला गाण्यात ती दादांच्या अंगच्या लयीपुढे अमळ फिकीच पडली.

आज लग्नमुंजीच्या मिरवणुकीत 'भोली सुरत...' हवेच. लहान मुलांना वत्सलतेने थोपटताना 'धीरेसे आजारी आखियनमे...' ही संथ लयीतली गोड लोरी हवी आणि नुकत्याच शिंग फुटलेल्यांना कामुकतेने कमरा हलवायला 'भोली सुरतचे' 'ट्य, ट्यटँव, ट्यटँव, ट्यटँव' हे पिपाणीचे धुंद सूर हवेत. आज ऐकण्यातली व पहाण्यातली अभिरुचीच पार बदलून गेली आहे. वाद्यांच्या कर्कश गोंगाटात सुरेल गोडवा नाहीसा झाला आहे. खलनायकाच्या पुढे साधु-नायक लोकांना सपक वाटू लागला आहे. माझ्या पिढीला मात्र अजूनही गरीब, प्रामाणिक, साधा-भोळा, गमत्या सद्भावाचा, कडमडणारा, फारसा मदनाचे वरदान न लाभलेला 'प्यारेलाल'च आवडतो. आशा देवींना 'किचन' ऐवजी 'आपका 'चिकनखाना' किधर है ?' हे विचारणारा आणि 'देवीं'ना केवळ 'आ....शा' म्हणायला लाजणारा ! बाकी भगवानदादा लाजणार म्हणजे a sight for gods to see. हं !

मला लाजेची गोष्ट ही वाटते की, या हरहुन्नरी, प्रामाणिक, मराठी कलावंताच्या अंत्यदर्शनाला एकही मराठी कलाकार फिरकला नाही याची. "दादा, तुम्ही हिंदीप्रमाणे मराठीतही काही चित्रपट काढायला हवे होते. नाटकातही यायला हवे होते. मराठीत थोडेबहुत लिहायला-बोलायलाही हवे होते. अहो, आत्मचरित्र सोडा; पण थोडे विनोद, किस्से, अनुभव सांगायला हवे होतेत."

"दादा, 'झमेल्या'त तुम्हास व किशोरदास कडके दाखविले आहे. वास्तवात किशोरने रगड पैका केला. तुम्ही कमावलात व गमावलातही. चित्रपटात दृश्य आहे की भरपूर खाऊन झाल्यावर बिल भरायला पैसे नाहीत, म्हणून तुम्ही व किशोरदा एकमेकांना उद्देशून एक नाचरे, उडत्या चालीवरचे द्वंद्वगीत गाता - "तू ठैर अभी मै आया, नही, तू ठहर, अभी मै आया". सगळेच नाचू लागतात अन् त्या धांदलीत तुम्ही दोघे 'गुल' होता. दादा, शंकराच्या नृत्यातून जग जन्मले अशी एक विचारधारा आहे. ही जन्माची कहाणी झाली. माझी खात्री आहे, मृत्यूने दार ठोठावल्यावर तुम्ही तुमच्या खास आवाजात विचारले असणार 'ये किसने मुझे पुकारा ?' "मैं मौत" असा करडा आवाज आल्यावरही तुम्ही हसला असाल, उठला असाल, गुडघ्यात पाय वाकवून ठुमकदार गतीत नाचत मृत्यूला सामोरे झाला असाल. "ओह, मौतभय्या, तू ठैर अभी मै आया, तू ठैर अभी मै आया"

■

डॉ. मो. गो. धडफळे
२, यशोदीप-ब, ज्ञानल मंगल कार्यालयाजवळ, रामबाग कॉलनी,
सदाशिव पेठ, पुणे ३०. दूरध्वनी ४३३२०८१.



अनुक्रमणिका






# ताटीचे अभंग : एक चिंतन

❑

डॉ. हरिश्चंद्र निर्मळे

❑

**ता**टी म्हणजे ताटांपासून तयार केलेले झोपडीचे दार. ताट म्हणजे कणीस खुडलेले, पूर्ण वाळवल्यानंतर कडबा झालेले, पाला सोललेले, ऊन, पाऊस, वारा यांचा फारसा परिणाम न होणारे, बांबूसारखे चिवट असणारे कर्नाटकातील धाट. ताट-धाट या शब्दांमधील अर्थवाही साधर्म्य धडधाकट, ताठ-कणखर या मानवप्रकृतिसदृश तुलनेत आढळून येते. मूळ 'धाट' या शब्दाचा अपभ्रंश ७०० वर्षांपूर्वी 'ताट' झाला असेल आणि कर्नाटक सीमेवरील लोकांनी व्यंजनात्मक शब्दांवर जोर देऊन बोलण्याच्या लबकीमुळे 'ताट' ऐवजी 'धाट' उच्चारला असेल, तर मुक्ताईने वर्णिलेल्या ताटांचा कूड (भिंत) आणि ताटीचे दार हे संयुक्तिकच होय.

ताटी म्हणजे झोपडीचे दार. राजवाड्याचा दरवाजा नव्हे. असा दरवाजा आज अणुबाँबच्या युगात क्षणार्धात उद्‌ध्वस्थ करता येतो. परंतु अणुबाँबपेक्षाही शक्तिशाली अशा शव्दसामर्थ्याने फुटणे अशक्य असणाऱ्या काळात, सुमारे ७०० वर्षांपूर्वी संत मुक्ताबाईने केवळ आपल्या शाब्दिक आणि भावनिक आर्जवांनी, स्वत:ला कोंडून घेतलेल्या आपल्या भावाच्या (संत ज्ञानेश्वर) झोपडीची ताटी लीलया उघडली. आपल्या थोरल्या भावाची समजूत घालून, त्याची मनधरणी करून, त्याचा वहुमान करून, त्याला अत्युच्च पदावर नेऊन, केवळ त्याला साक्षात् मोक्षप्राप्ती होण्यासाठी. एवढा महत्प्रयास केवळ बहीणच करू शकते, आपल्या सहोदरासाठी! ताटीच्या अभंगांची रचना ही अशी समयसूचक आणि प्रसंगावधानपर आहे.

### मुक्ताई की मुक्ताबाई ?

ज्ञानेश्वर एक की दोन हा वादविषय महाराष्ट्रात १९ व्या शतकाच्या उत्तरार्धापासून २० व्या शतकाच्या मध्यापर्यंत विशेषत्वाने चर्चिला गेला. 'ज्ञानेश्वरी' लिहिणारे ज्ञानेश्वर आणि अभंग, विराण्या आणि गौळणी रचणारे 'ज्ञानदेव' ह्या कुणीतरी वेगळ्या व्यक्ती असल्या पाहिजेत, हा वाद म्हणजे केवळ भाषा, मानस आणि समाजशास्त्रीय अभ्यासाच्या दृष्टिकोनातून झालेले ते एक वस्तुनिष्ठ संशोधन म्हणण्यापेक्षा, खरे तर ब्राह्मण-ब्राह्मणेतर वाद होता, असे म्हटल्यास वावगे ठरू नये. वारकरी संप्रदायाचा आणि संतसाहित्याचा सर्वंकष, चिकित्सात्मक अभ्यास करणाऱ्या बहुतेक संशोधकांनी, हा बहुचर्चित विषय अलिकडे सप्रमाण संपवून आणि हा वाद निकालात काढून, ज्ञानेश्वरांच्या सगुण-निर्गुणतत्त्वातीत व्यक्तिमत्त्वातील अद्वैतमान्यतेचे निकालपत्र जाहीर करून, त्यांची सप्तम शताब्दी सर्वच समाजघटकांनी एकत्र येऊन, मोठ्या थाटामाटाने साजर केली आहे.

ज्ञानेश्वर-नामदेवांच्यासारखा असाच वाद महाराष्ट्रात संत मुक्तावाईच्या बाबतीतही झाला. महाराष्ट्र भाषाभूषण ज. र. आजगावकरांनी आपल्या 'महाराष्ट्र संत-कवयित्री' या ग्रंथात संत

मुक्ताबाई आणि संत मुक्ताई या दोन वेगळ्या स्त्रिया आहेत, हे सांगताना पुढील दोन मुद्द्यांची सविस्तर चर्चा केली आहे. ती अशी :

अ) प्रकृति निर्गुण..., आधी तू मुक्ताचि..., व्यक्त अव्यक्तींचे..., उर्णाचिया गळां..., विश्रांति मनाची..., निर्गुणाची सेज..., मुंगी उडाली... अशा शब्द आणि भाषासदृश तेवीस अभंगांचा दाखला देऊन आजगावकर म्हणतात, 'वरील अभंगांच्या भाषेवरून, हे अभंग ज्ञानेश्वरीकार ज्ञानदेव यांची भगिनी मुक्ताबाई हिचेच असले पाहिजेत, असे म्हणण्यास बिलकुल प्रत्यवाय नाही.

उपरमु, पैठा, पैसु, वरळ, रया, अथिलें, सावया, पैसे, अरावो, दवडितु इ. जुने शब्द व उच्छेदु, पाहुणेरु, संसारु, उच्चरु, पुरुषोत्तमु वगैरे पुल्लिंगी आकारांत शब्दांची उकारान्त रूपे, या अभंगांची भाषा ज्ञानेश्वरकालीन असल्याचे ते सिद्ध करतात. वरील अभंगात मुक्ताबाईने 'मुक्ताई' या शब्दानेच सर्वत्र स्वनामनिर्देश केला आहे; अर्थात ज्या कवितेच्या शेवटच्या चरणात 'मुक्ताबाई' हे येत असेल ती कविता या आद्य मुक्ताबाईची नव्हे, हे उघड आहे.' मुक्ताबाईचे अर्वाचीनत्व सिद्ध करण्याचा केवढा हा अट्टाहास!

ब) पुढे आजगावकरांनी योगी पावन मनाचा..., संत तेचि जाण..., एक आपण साधु...,ब्रह्म जैसें तेशापरी... आणि शुद्ध ज्याचा भाव... या मुक्ताबाईच्या ताटीच्या पाच अभंगांचा उल्लेख करून, हे अभंग वाचकांनी वरील अभंगाशी ताडून पाहावे, म्हणजे त्यांच्या भाषेच्या अर्वाचीनत्वावरून, ते ज्ञानदेव भगिनी मुक्ताबाईचे नसून, मागाहून कोणीतरी रचले असले पाहिजे, असा सप्रमाण निष्कर्ष काढून, समारोप करताना ते म्हणतात, 'या अभंगात (ताटीचे अभंग) फक्त एकदाच मुक्ताबाईचे नाव आहे व तेही 'मुक्ताबाई' म्हणून, 'मुक्ताई' म्हणून नव्हे. मुक्ताबाईच्या इतर सर्व अभंगांत 'मुक्ताई' हे नाव आहे. मुक्ताबाईचे मूळचे नाव 'मुक्ताई'च असावे, असे राजाई, गोणाई, साकराई वगैरे तत्कालीन इतर नावांवरून दिसते. मागाहून 'मुक्ताई'चे 'मुक्ताबाई' झाले. यावरूनही 'ताटीचे अभंग' मुक्ताबाईचे नव्हेत, हेच सिद्ध होते.

या सर्व चर्चेनंतर जाता जाता आजगावकरांनी मुक्ताबाईच्या उपदेशाविषयी आणि तिची कल्पकता व बुद्धी याविषयीच एक शंका उपस्थित केली आहे. ते म्हणतात, ज्ञानदेव खरोखरच कोणावर तरी रागावले असतील आणि मुक्ताबाईने त्यांना उपदेश केला असेल, हेच मुळी संभवनीय दिसत नाही.' श्री. आजगावकरांना आधी भावांची लडिवाळ बाई आणि नंतर सर्व वारकऱ्यांची वत्सलरूप आई ही संकल्पनाच मुळी मान्य दिसत नाही, असे दुर्दैवाने म्हणावेसे वाटते.

## लडिवाळ मुक्ताबाई

श्री. आजगावकरांनी उपस्थित केलेली पहिली शंका भाषेचे प्राचीनत्व. तत्कालीन शब्द, त्यांचा वापर, त्यासाठीचे व्याकरण आणि ताटीच्या अभंगातील साधे-सरळ परंतु भावनिक पातळीवरील हृदयस्पर्शी शब्द अशा भाषिक मुद्द्यांची चर्चा करताना आणि केवळ आपले आग्रही मत प्रदर्शित करताना एक चूक त्यांनी नकळतपणे (हेतु:पुरस्सर नव्हे) केलेली आहे.

ती म्हणजे, एका ठिकाणी ते ज्ञानेश्वरीकार ज्ञानदेव यांची भगिनी मुक्ताबाई आणि दुसऱ्या ठिकाणी ज्ञानदेव भगिनी मुक्ताबाई असे लिहून जातात. ज्ञानेश्वर म्हणजे ज्ञानदेव हे आजगावकर सहज मान्य करतात आणि भगिनी मुक्ताबाई असेही म्हणतात, मुक्ताई असे म्हणत नाहीत.

महाराष्ट्रातील वारकरी संप्रदायाची परंपरा, येथील ग्रामीण संस्कृती, तीमधील सामाजिक नातेसंबंध, त्यांच्या चालीरीती, भाषाशैली आणि बोलण्यातील लकबी ह्या जर कोणत्याही चिकित्सक संशोधकाने डोळसपणे तपासल्या, तर भाऊ आपल्या बहिणीला 'आई' न म्हणता बयो किंवा 'बाई' (अलिकडे ताई) अशीच हाक मारतो. याविषयी त्याच्या मनात कोणता संदेह निर्माण होईल, असे वाटत नाही. मुक्ताई ही महाराष्ट्रातील सर्व वारकऱ्यांची 'आई' होती, परंतु आपल्या भावांची लडिवाळ 'बाई'च होती. अशी बयो, बाई म्हणजेच बहीण आपल्या ज्ञानाने श्रेष्ठ असणाऱ्या भावाला उपदेश करताना, ताटीच्या शेवटच्या अभंगात 'लडिवाळ मुक्ताबाई' असे न म्हणता 'लडिवाळ मुक्ताई' असा स्वत:चा उल्लेख कशी करेल ? 'लडिवाळ' शब्दाचा अन्वयार्थ, त्यातील बहीण-भावांचे परस्परावलंबित्व आणि संगोपन या बाबींचा किमान विचार केला असता, तर आजगावकरांची अशी संभ्रमावस्था निर्माण झाली नसती. जी थोरल्या तीन भावांच्या अंगाखांद्यावर नाचली, बागडली आणि वाढली ती लडिवाळ (लाडात वाढलेली) 'मुक्ताई' कशी असेल, ती 'मुक्ताबाई'च असणार. आजगावकरही नकळतपणे 'ज्ञानदेव भगिनी मुक्ताई' असे न म्हणता 'ज्ञानदेव भगिनी मुक्ताबाई' असे लिहितात. त्यांच्याच भाषेत, ज्ञानेश्वरीकार ज्ञानदेव होऊ शकतात, तर मुक्ताईने ताटीच्या अभंगात बहीण म्हणून 'मुक्ताबाई'च रहायला नको ?

## रचनेतील सत्यासत्यता

श्री. आजगावकर म्हणतात त्याप्रमाणे मुक्ताबाईच्या इतर विविध विषयांवरील अभंगांची भाषा ही ताटीच्या अभंगात नाही, त्यामुळे ही रचना अन्य कुणाची असावी. त्यांचे हे म्हणणे धाडसाचे खरे. परंतु, ताटीच्या अभंगांची संख्या नेमकी किती आणि त्यापैकी प्रक्षिप्त किती, याविषयी अवश्य विचार करावयास हवा. स्वत: आजगावकरांनी आपल्या 'महाराष्ट्र संत कवयित्री' या ग्रंथात एकूण पाच ताटीचे अभंग दिलेले आहेत. तर श्री. गो. शं. नीळकंठ राहिरकर यांनी संपादित केलेल्या 'ओळीचे अभंगांची सकल संतगाथा' (आ. ४थी, १९८७, पुणे) मधील संतपर प्रकरणात, श्री मुक्ताबाईचे 'ताटीचे' म्हणून एकूण बारा अभंग प्रसिद्ध केलेले आहेत. (अभंग क्र. ३७९४ ते ३८०५, पृष्ठे ५५१ व ५५२).

श्री. आजगावकरांनी प्रसिद्ध केलेल्या ताटीच्या पाच अभंगांची रचना, मांडणी, शब्दसौष्ठव, गेयता, उपमा, दृष्टांत, शैली आणि तीमधील भाषिक प्राचीनत्व लक्षात घेता, राहिरकरांनी प्रसिद्ध केलेल्या १२ अभंगांपैकी क्र. ३७९६, ३७९७ आणि ३८०१ हे तीन अभंग पूर्णपणे प्रक्षिप्त असावेत, हे ते वाचत असतानाच लक्षात येते. शिवाय उरलेले क्रमांक ३७९४, ३८०२, ३८०३ आणि ३८०४ हे चार अभंग, त्यांची ओळी संख्या, त्यातील उपमा - दृष्टांत - कल्पना, मांडणी आणि अर्वाचीन शब्द तपासून पाहता, ते अलिकडील काळात कुणी रचनाकारांनी घुसडले असल्याची शक्यता नाकारता येत नाही. आजगावकरांनी प्रसिद्ध केलेल्या ताटीच्या ५ अभंगांशी राहिरकरांनी प्रसिद्ध

केलेल्या अभंगांची तुलना करता, यातील ३७९५, ९८, ९९ हे तीन अभंग तंतोतंत आणि मूळाबरहुकूम असले, तरी ३८०० व ३८०५ हे दोन अभंग रचनेच्या दृष्टीने ओळींचा क्रम वदलून, मुळात नसलेल्या ओळींची आणि अधिकच्या दोन दोन ओळींची भर पडून, तसेच काही शब्दांचा फेरफार होऊन प्रसिद्ध झालेले आहेत. विषय, आशय आणि शब्दसाधर्म्य असणारे दोघांचेही हे पाच अभंग समोरासमोर ठेवून तपासले असता, त्यामधील बेमालूम भेसळीची कल्पना येते.

| आजगावकर | राहिरकर |
|---|---|
| योगी पावन मनाचा । साही अपराध जनांचा | योगी पावन मनाचा । साही अपराध जनाचा |
| विश्व रागे झाले वन्ही । संतें सुखें व्हावें पाणी | विश्व रागे झालें वन्ही । संत सुखे व्हावे पाणी |
| शब्दशास्त्रें झाले क्लेश । संती मानावा उपदेश | शब्दशास्त्रे झाले क्लेश । संती मानावा उपदेश |
| विश्वपट ब्रह्म दोरा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा | विश्वपट ब्रह्मदोरा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ॥३७९५॥ |
| संत तेचि जाण जगीं । दया क्षमा ज्यांचे अंगी | संत तोचि जगी । क्षमा दया ज्याचे अंगी |
| लोभ अहंता नये मना । जगी विरक्त तेचि जाणा | लोभ अहं नये मना । जगी विरक्त तोचि जाणा |
| इहपरलोकीं सुखी । शुद्ध ज्ञान ज्यांचे मुखीं | इह परलोकी सुखी । शुद्ध ज्ञान ज्याचे मुखी |
| मिथ्या कल्पना मागें सारा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा | मिथ्या कल्पना मागे सारा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ॥३ |
| एक आपण साधु झाले । येर कोण वायां गेले ? | एक आपण साधु झाले । येर कोण वाया गेले |
| उठे विकार ब्रह्मी मूळ । अवघे मायेचें गाबाळ | उठे विकार ब्रह्मी मूळी । अवघे मायेचे गा बळी |
| माथा समूळ नुरे जेव्हां । विश्व ब्रह्म होइल तेव्हां | माया समूळ मुरेल जेव्हा । विश्व ब्रह्म होईली तेव्हा |
| ऐसा उमज उदिअंतीं । मग सुखी व्हावें संती | ऐसे समजा आदिअंती । मग सुखी व्हावे संती |
| चिंता क्रोध मागें सारा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा | चिंता क्रोध मागे सारा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ॥३७ |
| ब्रह्म जैसें तैशापरी । आम्हां वडील भूतें सारी | ब्रह्म जैसे तैशापरी । आम्हा वेढिले भूते चारी |
| अहो क्रोधे यावे कोठें । अवघे आपण निघोटे | हात आपला आपणा लागे । त्याचा करू नये राग |
| जीभ दांतांनीं चाविली । कोणें बत्तीशी तोडिली | जीभ दाताने चाविली । कोणे बत्तीशी पाडिली |
| मन मारुनि उन्मन करा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा | थोडे दुखावले मन । पुढे उदंड साहाणे |
| | चणे खावे लोखंडाचे । मग ब्रह्मपदी नाचे |
| | मन मारुनि मथन करा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ॥३८००। |
| शुद्ध ज्याचा भाव झाला । दुरी नाहीं देव त्याला | अवघी साधने हातवटी । मोले मिळत नाही हाटी |
| अवघी साधनहातवटी । मोलें मिळत नाही हाटीं | शुद्ध ज्याचा भाव । त्याला दूर नाही देव |
| कोणी कोणा शिकवावें । सार शोधूनियां घ्यावें | आपण जैसे व्हावे । अवघे अनुमानोनि घ्यावे |
| लढीवाळ मुक्ताबाई । जीव मुईल ठायींचे ठायीं | ऐसे केले सद्गुरुनाथे । बापरखुमादेवीकांते |
| तुम्ही तरुनी विश्व तारा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा | कोणी कोणासी शिकवावे । सारासार शोधुनि घ्यावे |
| | लडिवाळ मुक्ताबाई । बीज मुद्दल ठायी ठायी |
| | तुम्ही तरोनी विश्व तारा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ॥३८०५ |

राहिरकर संपादित 'ताटीच्या अभंगा'तील क्षमा, मूळी, गा बळी, माया, मुरेल, आदिअंती, पाडिली, मथन, साधने, कोणासी, तरोनी हे अधोरेखित शब्द पाठांतर आणि मुखोद्‌गत पद्धतीच्या वाटचालीतून आले असण्याची शक्यता असली, तरी मूळ अभंगातील काही ओळी वगळून नव्याने भर घालण्यात आलेल्या वरील अधोरेखित ओळी ह्या मात्र निश्चितच प्रक्षिप्त मानाव्या लागतील.

## तांदळातले खडे

आपले विचार इतरांच्या नावावर खपविण्याच्या उद्योगातून, स्वरचित प्रक्षिप्त अभंगनिर्मिती होते, याचा उत्तम नमुना म्हणून राहिरकरांनी प्रसिद्ध केलेल्या ताटीच्या अभंगामधील पुढील काही विषय, आशय, रचना आणि उपमा-दृष्टांत यांची कल्पकता, उदाहरणादाखल खालील विचार मुद्दाम तपासून पाहण्यासारखे आहेत. पहा :

*१) ऐसा नटनाट्य खेळ । स्थिर नाही एक पळ*
*एकापासून अनेक । त्यात आपपर लोक*
*एके उंचपण केले । घर अभिमानाने गेले* (३७९६)
*२) आपआपणा शोधुनि घ्यावे । जगी तैसे विरक्त व्हावे*
*विष ग्रासोग्रासी प्यावे ।* (३७९७)
*३) हात आपला आपणा लगे । त्याचा करु नये राग*
*थोडे दुखावले मन । पुढे उदंड साहाणे*
*चणे खावे लोखंडाचे । मग ब्रह्मपदी नाचे* (३८००)
*४) पुढे उमजेना काय । बुडत्याचे खोल पाय*
*एक मन चेष्टा करी । भुते बापुडी संसारी* (३८०२)
*५) घर बांधिले डोंगरी । विषय हिंडे दारोदारी* (३८०३)
*६) आपण जैसे व्हावे । अवघे अनुमानोनि घ्यावे*
*ऐसे केले सद्‌गुरुनाथे । बापरखुमादेवी कांते* (३८०५)

मुक्ताबाईसारख्या संत कवयित्रीच्या नावावर खपवून देण्यात आलेल्या वरील उदाहरणांमधील नसता खटाटोप पाहता, तो कुणीतरी अगदीच अलिकडच्या विद्वानाने केलेला दिसतो. अर्थात राहिरकरांनी सदर ताटीच्या अभंगांच्या उपलब्धतेविषयी कोणतेही भाष्य, निवेदन वा स्पष्टीकरण दिलेले दिसत नाही. त्यामुळे तो दोष त्यांचा? की या अभंगांचे निर्मिती - श्रेष्ठत्व त्यांनाच द्यावयाचे ? याविषयी संभ्रम निर्माण होतो.

## ताटीच्या अभंगांचा सारांश

अपमानित ज्ञानेश्वरांनी जेव्हा रागारागाने ताटीचे दार धाडकन बंद करून आतून कोयंडा लावून स्वत:ला कोंडून घेतले असेल, तेव्हा त्यांचा पाठलाग करत आलेल्या मुक्ताबाईची काय दारुण अवस्था झाली असेल, याची कल्पनाच केलेली बरी. या अनाहूत आणि अनाकलनीय

प्रसंगामुळे तिच्या मनात उठलेले काहूर, तिची अस्वस्थता, आणि हा बाबा, आता काय करेल? या चिंतेने व्याकुळ झालेल्या मुक्ताबाईने आधी आकांतच केला असणार. परंतु, त्याच्या ज्ञानाविषयीचा आणि स्वत:विषयीचा विश्वास ध्यानात आल्यावर, तिच्यातील काव्यवृत्तीचा सहजोद्रेक होऊन, 'योगी पावन मनाचा। साही अपराध जनांचा ॥ विश्व रागे झाले वन्ही। संतें सुखे व्हावें पाणी ॥' असा उपदेश त्याला करावा आणि त्याची विचलित अवस्था स्थितप्रज्ञाप्रत न्यावी, असे मुक्ताबाईला वाटले असणार.

केवळ क्रोधापोटी, तर विश्वही जळून खाक होते, हे तुम्हास माहीत असताना, मिथ्या कल्पनांच्या आणि अहंमन्यतेच्या आभासावर, शब्दांची शस्त्रे चालविणाऱ्या धर्ममार्तंडांच्या आपण फशी का पडता ? चिंता वा क्रोध यांची उपाधी आपण स्वत: मागे का लावून घेता? आपल्याच दातांनी आपली जीभ का चावता ? अन्य सर्व योगी आणि साधूंना आपण तुच्छ लेखता काय ? ब्रह्म जे चिरंतन आणि पंचमहाभूते ही वडिलधारी असताना, तुम्ही त्यांच्यावरची भक्ती शुद्ध न करता, 'अहो क्रोधे यावे यावे कोठे। अवघे आपण निघोटे ॥' याचे भान आपण हरपला आहात काय ? 'अरे ! पुरुष तू, रडतोस कशाला ?' असे काही परखड सवाल विचारण्याचा अधिकार लहानग्या मुक्ताबाईला आपातत: प्राप्त असतानाही, ती अत्यंत लीनतेने आपल्या थोरल्या भावाची विनवणी करीत, समजूत घालते आणि 'ताटीचे दार' उघडण्यांत यशस्वी होते. या निमित्ताने तिच्या बोलण्यातील मार्दव आणि लाघव्य मुद्दाम तपासून पाहण्यासारखे आहे.

जो पवित्र मनाचा योगी, तो सर्वसामान्य लोकांचा अपराध सहनच करतो. जो संत असतो, तो विश्वरागाचा वणवा विझविण्यासाठी स्वत: पाणी होतो, तो सामान्यांच्या शिव्या-शापांना उपदेशच मानतो. कारण दया, क्षमा अणि शांती ही त्याच्या नसानसांत भिनलेली असतात. केवळ शुद्ध ज्ञान ज्याच्या जिव्हेवर संचारते, कोणत्याही मोहाला बळी न पडता ज्याचा 'मी'पणा, स्वार्थ गळून पडतो, जो सर्व प्रलोभनांपासून विरक्त झाला आहे, तोच खरा संत असतो. जो स्वत:चे मन मारून केवळ इतरांच्या भाव-भावनांचाच विचार करतो, जो संपूर्ण विश्वाचे सार शोधून स्वत:च परिपूर्ण म्हणजेच ब्रह्मरूप होतो, तोच जीवाचे शिवत्व जाणून, सर्व विश्वाचे पालन करतो. असे स्वत: ज्ञानदेवा, तुम्ही आहात. तेव्हा कोणावर कसलाही कोप न धरता, स्वत:ला कोंडून न ठेवता ताटी उघडा आणि या साऱ्या विश्वाचा उद्धार करा, असा 'सर्वात्मका सर्वेश्वरा' उपदेश केवळ लडिवाळ मुक्ताबाईने केल्यामुळेच, तर ज्ञानेश्वरांनी ताटी उघडली.

ज्ञानेश्वरांनी ताटी बंद केली नसती, तर मुक्ताबाईने 'ताटीचे अभंग' रचले नसते. ज्ञानेश्वरांनी ताटी उघडली नसती तर ज्ञानेश्वरांवर गीताभाष्य करण्याचा प्रसंग आला नसता आणि कदाचित 'ज्ञानेश्वरी'सारख्या मराठी वाङ्मयातल्या पहिल्यावहिल्या ग्रंथाला मुकण्याची पाळी आपल्यावर आली असती. सुदैवाने असे काही घडले नाही, किमान यासाठी, संत मुक्ताबाईच्या ऋणात न राहता मुक्ताई की मुक्ताबाई ? या वादात आपण आपली बुद्धीशक्ती पणाला लावीत आहोत, याची मनस्वी खंत वाटते.

## ताटीच्या अभंगातील काव्यसौंदर्य

मुक्ताबाई ही प्रतिभासंपन्न कवयित्री होती. ती संत होती आणि ज्ञानेश्वरांसारख्या प्रगाढ पंडिताची बहीणही होती. त्यामुळे तिची सर्वच अभंगरचना, ही आजही जनी-मानसी 'ज्ञानेश्वरी' सारखीच रुजली आहे. ताटीच्या अभंगातील मुक्ताबाईने केलेल्या यमकांचा वापर पहा : मनाचा-जनांचा, वन्ही-पाणी, क्लेश-देश, जगी-अंगी, मना-जाणा, सुखी-मुखी, झाले-गेले, मूळ-गाबाळ, जेव्हा-तेव्हा, अंती-संती, परी-सारी, कोठे-निघोटे, चाविली-तोडिली, झाला-त्याला, वटी-हाटी, शिकवावे-घ्यावे, बाई-ठायीं, आणि अभंग चरणाच्या शेवटच्या ओळीत येणारा दोरा, सारा, करा, तारा - ज्ञानेश्वरा हे ताटीच्या अभंगातील प्रासात्मक यमक मुक्ताबाईच्या शब्दसौष्ठवतेचे उत्तम नमुने आहेत.

मुक्ताबाईच्या उपमा, प्रतिमा, तिने केलेली प्रतिके आणि वापरलेली रूपके पहा : विश्व क्रोधाने पेटणे, ते विझवण्यासाठी संतानी पाणी होणे, शब्द म्हणजे शस्त्र, अशा शस्त्रांना उपदेश मानणे, विश्व म्हणजे कापड आणि ब्रह्म म्हणजे दोरा, दया-क्षमा म्हणजे संत, शुद्ध ज्ञान म्हणजे सुख, लोभ-अहं, आसक्ती म्हणजे माया, माया म्हणजे विश्वाचा पसारा, पंचमहाभूते ही वडील, दातांनी जीभ चावू नये, त्यासाठी सर्व दात उपटू नयेत, शुद्ध भाव म्हणजे देव, जीव म्हणजे शिव या आणि अशा सर्व उपमा-दृष्टांतामधून मुक्ताबाईच्या प्रतिभेची उत्तुंगता सहज ध्यानात येते.

ज्याचे जळते त्यालाच कळते, अंतरीचे धावे स्वभावे बाहेरी, काळीज तडफडतंय शब्दरूप व्हायला प्रेशर कुकरमधल्या वाफेसारखं, उत्स्फूर्त भावनांचा सहजोद्रेक, बेंबीच्या देठापासून टाहो फोडणे, आकाश-पाताळ एक करणे म्हणजे काय ? असे प्रश्न कोणत्याही कवीला विचारू नयेत. मुक्ताबाईला तर अजिबात नको. कारण ज्ञानेश्वरांसारख्या लोकोत्तर भावाने जेव्हा स्वत:ला कोंडून घेतले, तेव्हा एकुलत्या बहिणीच्या मनाची अवस्था काय झाली असेल, हे तिच्या ताटीच्या अभंगातील भावाभिव्यक्तीमधून सहजपणे जाणवते. तिचा हा भावनांच्या कल्लोळाचा उद्रेक होणारा अनुभव दाहक नसता, तर तिच्या अभंगात एवढा विश्वात्मक आशय कदाचित आला नसता. बरे झाले ज्ञानेश्वरा, तुम्ही स्वत:ला कोंडून घेतले, अन्यथा सातशे वर्षानंतरही मुक्ताबाई मुक्ताईच राहिली असती.

## संन्याशाची पोरे

आता आजगावकरांनी उपस्थित केलेल्या तिसऱ्या (क) या मुद्द्याकडे वळू या. सातशे वर्षांपूर्वीच्या महाराष्ट्रात संत ज्ञानेश्वर, निवृत्तिनाथ, सोपानदेव यांची केवळ 'संन्याशाची पोरे' म्हणून, तत्कालीन धर्ममार्तंडांनी, संपूर्ण समाजाला हाताशी धरून जी लांच्छनास्पद उपेक्षा केली, त्यांना हीन, तुच्छ लेखून आणि बहिष्कृत ठरवून जी वागणूक दिली ती पाहता, एक स्त्री म्हणून मुक्ताबाईने काय भोगले असेल आणि तिला कोणत्या हाल-अपेष्टांना तोंड द्यावे लागले असेल, याची कल्पना किमान तार्किकतेने आणि तारतम्याने निश्चित करता येईल. ज्या

काळात मनुस्मृतिप्रणित पुरुष संस्कृतीचा पगडा होता, 'न स्त्री स्वातंत्र्यं अर्हति' चा पारंपरिक वारसा अबाधित होता आणि ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य वा शूद्र यांपैकी कोणत्याही वर्णातील असो, ती शूद्रच असा समज दृढमूल होता, त्या कालानुरूप वाट्याला आलेल्या संस्कृतीत (की विकृतीत) मुक्ताबाई जन्मली होती. (हे आमचे भाग्यच !) या सर्व तत्कालीन सामाजिक, सांस्कृतिक आणि धार्मिक पार्श्वभूमीवर तिच्या 'ताटीच्या अभंगां'चा सखोल आणि चिंतनात्मक अभ्यास व्हावयास हवा.

वरील सर्व ऐतिहासिक पार्श्वभूमीवर या चारही भावंडांच्या संपूर्ण जीवनचरित्राकडे पाहता, सश्रद्ध विचारवंतांना माझा प्रश्न कितपत मानवेल ? परंतु एखादी लहान बहीण थोरल्या भावाला चार उपदेशाच्या गोष्टी सांगू शकते की नाही ? त्या सांगताना थोरला भाऊ सामान्यच असायला हवा का ? सगळेच असामान्य भाऊ अलौकिक अर्थाने थोरले असतात का ? केवळ वर्ष-दोन वर्षांच्या अंतराने जन्मलेल्या विशिष्ट वयोगटातील चार भावंडांपैकी वयाने थोरला असणारा भाऊ थोरला की लहान असणारी बहीण थोरली ? या विषयीची सविस्तर चर्चा, आज शरीरशास्त्रविषयक विज्ञानयुगातील विविध साध्यांच्या आणि परिमाणांच्या पार्श्वभूमीवर करण्याची आवश्यकता आहे का ?

ज्या वयोगटातील ही चार भावंडे आहेत, ती केवळ एक-दोन वर्षांनी एकापेक्षा लहान आहेत. म्हणजे निवृत्तिनाथांपेक्षा मुक्ताबाई केवळ सहा वर्षांनी लहान आहे. परंतु वयाने लहान असली, तरी स्त्रीसुलभ स्वभावधर्मानुसार ती अनुभवाने मोठीच आहे. आई-वडिलांच्या इंद्रायणीतील देहत्यागानंतर खऱ्या अर्थाने, या तीन भावांचे लालन, पोषण आणि संगोपन कुणी केले असेल तर मुक्ता, या भगिनी असूनही मुक्ताईनेच. ज्ञानेश्वर आणि सोपानदेव यांच्या बाबतीत निवृत्तिनाथांनी वडिलांचे, तर मुक्ताबाईने मातेचे कर्तव्य पार पाडले. त्यामुळे मातृकर्तव्याप्रमाणे उपदेश करण्याचा तिचा अधिकार तितकाच मोठा आहे. भावांच्या कोड-कौतुकासोबतच प्रसंगी त्यांचे कान पिळण्याची तिला मुभा आहे.

मराठीतील संत कवयित्रींचा अभ्यास करणाऱ्या संशोधकांनी मुक्ताबाईला आजतागायत योग्य न्याय दिलेला दिसत नाही. आद्य कवयित्री महदंबा ही चक्रधरांची शिष्या होती आणि ती संपूर्ण श्वेताहार करू शकत होती. जनाबाई ही अस्पृश्य, अनाथ आणि मोलकरीण असली, तरी संत नामदेवांचा तिला आश्रय होता. कान्होपात्रा गणिका असली, तरी अस्पृश्य नव्हती. बहिणाबाई परितक्त्या असली, तरी संत तुकारामाची शिष्या होती. परंतु मुक्ताबाई ? ती तर चक्क बहिष्कृत होती. ब्राह्मण या सर्वोच्च वर्णकुळीत जन्माला येऊनही !! ती धनिक-श्रीमंत नव्हती, ती उच्चवर्णीयही नव्हती, स्त्री असल्यामुळे ती केवळ शूद्रही नव्हती, तर बहिष्कृत असल्यामुळे अतिशूद्र होती ! तत्कालीन गावगाड्यात अतिशूद्रांनाही भीक मिळत होती, परंतु बहिष्कृतांना शूद्रांनीही भीक न घालण्याचा दंडक होता. त्या काळात सत्ताधीश, धनिक-श्रीमंत आणि उच्चवर्णीय यांच्यापेक्षाही उपेक्षितांच्या आणि तळागाळातल्या समाजातील माणसांना, किंबहुना त्यापेक्षाही संन्याशाची मुलगी आणि शूद्र-बहिष्कृत लेखल्या-ठरविलेल्या मुक्ताबाईला खूपच लवकर जाण-शहाणपण आले असल्यास, आजगावकरांसारख्या पंडितांना अकारण

शंका येण्याचे काहीच कारण नाही.

परंतु, स्त्रियांना, पुरुषांना उपदेश करण्याचा अधिकार नाही, ही भूमिका ठाऊक असेल, तर 'मुक्ताबाई' 'ताटीचे अभंग' कसे रचेल ? किंवा 'ज्ञानियांचा राजा' असणारा 'ज्ञानेश्वर' रागावेलच कसा असे प्रश्न आजगावकरांसारख्या संशोधकांना पडणारच ! आजगावकर कुठे तरी कमी पडले म्हणून की काय प्राचीन वाङ्मयाचे गाढे अभ्यासक डॉ. रा. चिं. ढेरे यांनी अलिकडे 'मुक्ताई' विषयी एक नवीनच प्रमेय 'लीळाचरित्रा'च्या आधारे मांडले आहे. ज्ञानदेव भगिनी मुक्ताबाई हिचा संबंध त्यांनी चक्रधरांना त्यांच्या एकाकी भ्रमंतीत भेटलेल्या मुक्ताबाईशी जोडला आहे. ढेऱ्यांच्या मते, ज्ञानेश्वर भगिनी मुक्ताई हिला पूर्वजन्मी गोरक्षनाथांचा उपदेश होता. यावरून ती पूर्वजन्मातील मुक्ताई म्हणजे 'लीळाचरित्रा'तील ('एकाक') चक्रधरांना भेटलेली 'मुक्ताबाई' नावाची वृद्ध योगिनी असावी. हीच मुक्ताबाई चांगदेवांची मूळ गुरू असून, पुढे ती दिवंगत झाल्यावर, तिचाच नवा अवतार म्हणजे ज्ञानदेव भगिनी मुक्ताबाई, हिला त्याने गुरू केले ! वा ! काय हे संशोधनातील चिकित्सक आणि चिंतनात्मक अभ्याससूत्र ! हा निष्कर्ष तपासून, 'डॉ. ढेऱ्यांनी आपल्या संशोधनाच्या किमयेने या दुसऱ्या मुक्ताईला पहिल्या मुक्ताईचा पूर्वावतार ठरवून चांगदेवाला तिच्या पदरात टाकले आहे. संशोधनामुळे कोणाचे काय होईल आणि कोणाचा कोण होईल, याचा काही नेम नाही' असा अभिप्राय डॉ. शं. गो. तुळपुळे यांनी नोंदविला नसता तरच नवल !

वरील सर्व गुंतागुंतीच्या प्रश्नांचा वा मुद्द्यांचा विचार करता, आत्मत्याग केलेल्या पालकांच्या अनाथ पाल्यांवर मायेचा वर्षाव करणारी, त्यांना रांधून वाढणारी, त्यांचे संगोपन करण्यासाठी आपले मातृवात्सल्य पणाला लावणारी आणि थोरल्या बंधूंच्याही आधी समाधिस्त होणारी पहिला महिला कोण ? या प्रश्नाचे उत्तर, 'संत मुक्ताबाई' असेच द्यावे लागेल. सर्व भावंडांत वयाने लहान असली, तरी मातृवात्सल्य, अकाली आलेले प्रौढत्व आणि स्त्रीसुलभस्वभावानुसार आलेली जाण, या सर्व पार्श्वभूमीवर, तिने जर ज्ञानाने श्रेष्ठ असणाऱ्या, परंतु केवळ लौकिक टवाळीमुळे खिन्न होऊन, स्वतःला झोपडीत कोंडून घेणाऱ्या आपल्या थोरल्या भावाला उपदेश केला असेल, तर यामध्ये नवल काय ? ताटीच्या या अभंगांत वडील-भावावर रुसलेल्या धाकट्या बहिणीचा लडिवाळपणा आहे, तद्वतच अनाथ भावंडांचे संगोपन करणाऱ्या परिणत प्रौढत्वाला साजेशा मुक्ताबाईचा समंजसपणाही आहे. करुणरसाच्या सूत्रात सहजपणे गोवलेली धीरगंभीर विचारांची मौल्यवान रत्ने ताटीच्या अभंगांत तिने गुंफली आहेत.

■

डॉ. हरिश्चंद्र निर्मळे
प्राचार्य निवास, विलिंग्डन महाविद्यालय, सांगली.

---



---

# काव्यनिष्ठ बहिणाबाई

(१८।८।१८८० ते ३।१२।१९५१)

❑

नंदा सुर्वे

❑

**का**ही गुणवत्तासंपन्न माणसे काळाच्या पडद्यापलीकडे गेल्यानंतर प्रकाशात येतात. बहिणाबाई चौधरी या व्युत्पन्न कवयित्रीच्या काव्यशक्तीवर समाजाचं लक्ष गेलं ते त्या हयात नसताना, हे त्या व्यक्तिमत्त्वाचं अपार दुर्दैवच म्हणावं लागेल. कारण आपल्या सृजनाची रसिकांनी घेतलेली दखल, त्याला मिळणारी दाद त्यांना प्रत्यक्षात अनुभवता आली नाही. कोणत्याही सर्जनशील माणसांचा तो अंतरातला आनंद असतो. या कलाजन्य आनंदाला त्या वंचित झाल्या. आपल्या निर्मितीतला स्वानंदाचा पहिला धुमारा ओसरल्यावर ती निर्मिती रसिकांकडे आस्वादनासाठी सोडली जाते, हे खरं. परंतु बहिणाबाई चौधरींबाबत हे सर्वार्थानं खरं मानता येणार नाही. कारण त्यांच्या कविता अनुभवसिद्ध अभिव्यक्तीच्या पातळीवरच उद्भवत गेल्या. त्यामुळे स्वानंदाच्या आणि भावाविष्काराच्या निकषावरच त्यांचा जन्म होत गेला, एवढंच म्हणता येईल. त्या कविता रसिकांपर्यंत आल्या, त्या त्यांच्या मृत्यूनंतरच.

बहिणाबाई चौधरींची काव्यप्रतिभा फक्त त्यांच्या मुखातून बाहेर पडत गेली. आपला हा सृजनसंभार त्या स्वहस्ते लेखनबद्ध करू शकल्या नाहीत. कारण त्या निरक्षर होत्या. या कवयित्रीनं कधी शाळेची पायरी चढली नव्हती. त्यांच्या हाताला कधी लेखणीचा स्पर्श झालेला नव्हता वा डोळ्यांनी कधी अक्षरांचा चेहरा पाहिलेला नव्हता. साक्षात् अक्षरभेटीचा योग बहिणाबाईंच्या आयुष्यात कधी आलाच नाही. पण त्यांच्या मुखातून वाहत आलेलं काव्य मात्र अक्षरत्व घेऊन जन्मलं. त्यांच्या काव्यभाषेत सांगायचं तर —

*माझी माय सरसोती, माले शिकवते बोली*
*लेक 'बहिनाच्या' मनी किती गुपितं पेरली.*

बहिणाबाईंना लेखणी अवगत नव्हती. पण निसर्गाची लिपी वाचण्याची कला अवगत होती. माणसं आणि माणसांचे व्यवहार, माणसांची भावुकता, माणसांचे मनोव्यापार वाचण्याची दृष्टी त्यांना अवगत होती. अशा रूपातून 'माय सरसोती' त्यांच्यावर उदंड प्रसन्न होती. बहिणाबाई त्यातून वस्तुपाठ घेत गेल्या आणि पुढे स्वसामर्थ्य सिद्ध करत गेल्या. ही निसर्गकन्या मग सर्व साहित्यरसिकांच्या मनात आपलं विशिष्ट स्थान, आपलं विशिष्ट अवकाश निर्माण करून बसली.

बहिणाबाई चौधरी यांचे कवीसुपुत्र सोपानदेव चौधरी हे शालेय जीवनापासून आपल्या आईच्या मुखातून बाहेर पडणाऱ्या कविता मिळेल त्या कागदावर लिहून ठेवत असत. सोपानदेवांचे मावसबंधूही अधूनमधून त्या कविता उतरवून घेत. या दोघांनाही बहिणाबाईंच्या कवितांचं,



अनुक्रमणिका

ओव्यांचं कौतुक वाटे. एकदा सोपानदेवांनी आईला विचारलं होतं, ''तू शेतात कष्टाची कामं करतेस, तुझी नजर जमिनीकडे आणि तुला हे विचार सुचतात तरी कसे ?'' यावर बहिणाबाईंनी सहजतेनं उत्तर दिलं होतं, ''धरत्रीच्या आरशामधी मी सरग (स्वर्ग) पाहते बापा.''

बहिणाबाईंजवळ तर्कसंगत असं कल्पनासामर्थ्य होतं. एकदा कापूसवेचणीच्या वेळी सोपानदेवांनी एक कापसाचं बोंड हाती धरलं. त्यातला कापूस बाजूला सारून सरकी हातावर घेतली. ते पाहून बहिणाबाई म्हणाल्या, ''पहा, देवानं सरकीला कसा पांढरा स्वच्छ पोषाख नेसून पाठवलंय. पण माणसानं तिला नागडी केली आणि तिचंच वस्त्र बनवून तो स्वतःच नेसू लागला.''

बहिणाबाईंच्या विचारगर्भ मनातून काव्यजन्माची स्पंदनं उठत असत. कवी म्हणूनच एखादा माणूस जन्माला यावा लागतो, असं म्हणतात. हा जन्मजात कवी अर्थातच आपल्याबरोबर प्रतिभेची कुपी घेऊनच जन्मलेला असतो. त्यामुळे त्याच्या सृजनाचा सुगंध सर्वदूर दरवळत राहतो. बहिणाबाईंच्या हृदयात तर जणू सृजनाचा उत्सवच भरलेला होता. पर्वतराजीच्या कपारीतून एखादा झरा उचंबळत यावा, तशा कितीतरी काव्यधारा बहिणाबाईंच्या हृदयातून उसळत आल्या.

*'देवा आसं कसं मन*
*आसं कसं रे घडलं ?*
*कुठे जागेपनी तुले*
*आसं सपान पडलं.'*

माणसाची मनोरचना म्हणजे बहिणाबाईंना, परमेश्वराला जागेपणी पडणाऱ्या स्वप्नासारखी वाटते. ही किमया वाटते.

बहिणाबाईंची सगळी सृजनधारा बंदिस्तच राहिली असती, लोकांपर्यंत ती पोहोचू शकली नसती. ती लोकांपर्यंत पोहोचवण्याचं श्रेय जितकं सोपानदेव चौधरींना द्यायला हवं, तितकंच ते आचार्य अत्रे यांना द्यायला हवं. हा काव्यखजिना प्रकाशात आणण्याचं महत्कार्य त्यांनी केलं.

त्याचं काय झालं, सोपानदेव एकदा आ. अत्रेंना भेटायला गेले होते. त्यांनी जरा संकोचानंच त्या वहीतली एक कविता अत्र्यांना गाऊन दाखवली. 'कशाला काय म्हणू नये' ही ती कविता. ते काव्य ऐकून अत्रे स्तंभितच झाले. त्यांनी सोपानदेवांच्या हातून ती वही खसदिशी ओढून घेतली. सर्व कविता मनापासून वाचून काढल्या आणि म्हणाले, ''अहो, हे बावनकशी सोनं आहे. हा मोठा ठेवा आहे. आत्तापर्यंत का लपवून ठेवला ?'' सोपानदेव यावर काय उत्तर देणार ? अत्र्यांनी ती वही परचुरे प्रकाशनाकडे दिली. त्यांनी त्याला पुस्तकरूपात प्रकाशात आणलं. त्यामुळे हा अमृताचा ठेवा आपल्यापुढे आला आहे.

बहिणाबाईंच्या नसानसांत काव्य होतं. कथाकीर्तनादी श्रवणानं त्यांना बहुश्रुतपणा लाभला होता. त्यामुळे काव्याचा स्रोत त्यांच्या मुखातून अलगद बाहेर पडे. भावोत्कट काव्यप्रतिभेचं लेणं त्यांना लाभलं होतं. त्यातून त्या काव्याचे मळे फुलवत गेल्या. ही शेतकरी स्त्री दररोजचे जीवनव्यवहार सांभाळून जो अलौकिक काव्यधर्म जागवत होती, ते पाहून स्तिमित व्हायला

होतं. सर्वस्पर्शी अशा त्यांच्या काव्यात जराही कृत्रिमता नाही, भावविपन्नता नाही. उलट सृजनाच्या समग्र शक्तीची ग्वाही देणारं काव्य त्यांच्या मुखातून सहजस्फूर्तपणे आविष्कारत गेलं. ती अम्लान कविता झाली.

*'अरे खोप्यामधी खोपा*
*सुगरणीचा चांगला*
*देखा पिलासाठी तिनं*
*झोका झाडाले टांगला'*

अशा कितीतरी बहुमोलिक काव्यरचना त्यांच्या मुखातून, अंतरंगातून सळसळून बाहेर आल्या. या अर्थगर्भ काव्यरचना जे रचनासौंदर्य घेऊन आल्या, त्यामुळे त्या लयवेल्हाळही झाल्या. या संदर्भात सोपानदेव चौधरी म्हणतात,

''यमके, श्लेष तिच्यासमोर पट्टेवाल्याप्रमाणे उभे राहत असत. कल्पना, उपमा दासीप्रमाणे जवळ धावत येत असत. तिचे निरीक्षण नि विनोदबुद्धी तल्लख होती. तिची ग्रहणशक्ती आणि स्मरणशक्ती वाखाणण्याजोगी होती.''

बहिणाबाईंचं काव्य यमकांचा व्यवस्थित समतोल साधत उपजत गेलं. या काव्यमूल्याचा विचार बहिणाबाईंच्या मनात कसा आला असेल ? सृजनाचं विलक्षण सामर्थ्य या कवयित्रीला लाभलं होतं. त्यामुळे एकाहून एक सरस रचना आशयसौंदर्य, भावसौंदर्य घेऊन जन्माला येत गेल्या. या लोभस काव्यरचना रसिकांच्या मनाशी रुंजी घालू लागल्या. ओठांवर बागडू लागल्या. मनाच्या तळवटीत जाऊन रुतून बसल्या. बहिणाबाईंच्या वाणीतून उमटलेलं काव्य अस्सल मातीचं तर आहेच, तसंच ते शुद्ध, सकस असं भावलेणं आहे. कारण ते कवयित्रीनं निर्लेप वृत्तीनं, आर्त भावानं शब्दांकित केलेलं आहे.

खरं तर बहिणाबाईंच्या कितीतरी कविता वाऱ्यावर उडून गेल्या असतील. कारण सोपानदेव आणि त्यांचे मावसबंधू यांना या कविता उतरवून घेण्याची जाण येईपर्यंत कितीतरी कविता जन्माला येऊन गेल्या असतील. आस्वादनाविना त्या पोरक्या होऊन मृत पावल्या असतील. कुणालाही त्या कळल्या, दिसल्या नसतील. बहिणाबाईंच्या निर्माणविश्वातली काही पिसं उडून गेली ही दुःखकारक गोष्ट आहे. तरीही आज जो आपल्यासमोर अमोल ठेवा आलेला आहे, ती आनंदाचीच गोष्ट आहे. अन्यथा ही अभिजात कवयित्री पडद्याआडच राहिली असती.

बहिणाबाईंची काव्यसरिता जळगाव-असोद्याच्या परिसरात उगम पावली. असोद्याच्या एका सुखी परिवारात जन्मलेली ही स्त्री जळगावला आपल्या सासरघरातही समाधान पावली. म्हणूनच ही व्युत्पन्न कवयित्री आपल्या कवितेचा विकास करत गेली. तिच्यातल्या सृजनाला कधी थकवा आला नाही. आपल्या काव्यनिर्मितीविषयी त्या एकदा म्हणतात,

*'अरे, घरोटा घरोटा*
*तुझ्यातून पडे पीठी*
*तसं तसं माझं गानं*
*पोटातून येतं व्होटी'*











बहिणाबाईंच्या आयुष्यातला खूप मोठा काळ निसर्गाच्या सान्निध्यात गेला. त्यामुळे त्यांना 'निसर्गकन्या' असंच म्हणतात. धरित्रीवर त्यांचा फार जीव होता. तिच्या संगतीत राहण्यात त्यांना मनस्वी आनंद मिळत असे. या धरित्रीच्या लेकरांवर म्हणजे बोरी-बाभळीवर, आंब्यावर, नदीवर, दगडगोट्यांवर तसंच पाखरांवर, जनावरांवर त्यांनी अपार माया केली. त्या म्हणतात,

*'नका हेंडाळू बैलाले*
*माझं ऐका रे जरासं*
*व्हते आपली हाऊस*
*आन बैलाले तरास'*

त्यांची काव्यशक्ती अशी चौफेर फिरायची. त्यांच्या संपर्कात येणारा कोणताही विषय त्यांना वर्ज्य नव्हता. त्या विषयावरचं त्यांचं स्वत:चं भाष्य कवितेचं रूप घेऊनच जन्माला येत असे. पेरणीनंतर जमिनीतून आलेली रोपं पाहून बहिणाबाईंना पोटभर आनंद वाटे. त्यांच्या काव्यात उत्प्रेक्षा, उपमांचं चांदणं बरसलेलं असे.

*'बीज टरारे भुईत*
*सर्वे कोंब आले वऱ्हे*
*गह्यरलं शेत जसं*
*आंगावरती शहारे'*

उगवलेल्या पिकाचे ते कोवळे अंकुर, ती उगवाई पाहून बहिणाबाईंना वाटतं की, शेताला जणू गहिवरून आलं आहे आणि त्याच्या अंगावर हे अंकुररूपी शहारे आलेले आहेत.

बहिणाबाई आपल्यासमोर येतात त्या केवळ कवयित्री म्हणूनच. त्यांचं अन्य रूप आपल्याला ज्ञात नाही. जणू कविता करण्यासाठीच त्या या पृथ्वीतलावर अवतीर्ण झाल्या. काव्यरूपात जगल्या आणि काव्यरूपातच उरल्या. कवितेचं असं समग्रपण त्यांच्या व्यक्तिमत्त्वाला लाभलं. त्यामुळे बहिणाबाई म्हटलं की, समोर उभ्या राहतात त्या त्यांच्या भावसुंदर, आत्मस्पर्शी कविता आणि कविताच.

*'अरे संसार संसार*
*जसा तवा चुल्ह्यावर*
*आधी हाताले चटके*
*तव्हा मियते भाकर'*

अशी काव्यं रसिकमनाच्या डोळ्याआड होणं कधी शक्य आहे का ? आपल्या दैनंदिन कामातून, प्रपंचाच्या रहाटगाडग्यातून जीवनाचं अवघं तत्त्वज्ञान बहिणाबाईंना दिसलं. जीवनाचा गाभा गवसला. त्यातून हे व्यवच्छेदक काव्य जन्माला येत गेलं. उत्स्फूर्तता हा तर बहिणाबाईंचा स्थायीगुण. त्या एकदा स्वयंपाकघरात चूल पेटवायला बसल्या. चूल काही पेटता पेटत नव्हती. ती थंड पडली होती. तिच्यातून नुसताच धूर बाहेर पडू लागला. बहिणाबाई अस्वस्थ झाल्या. चिडचिडल्या. तो उद्वेग काव्यरूपातून बाहेर पडला.

*'पेट पेट धुक्कयेला*
*किती घेसी माझा जीव*
*आरे इस्तवाच्या धन्या*
*कसं आलं तुले हीव'*

उत्स्फूर्तता हा जसा बहिणाबाईंच्या काव्याचा विशेष, तसा वेगवेगळ्या संकल्पना आपल्या काव्यातून मांडणं, हीसुद्धा मनोहर करामतच म्हणावी लागेल.

*'धरित्रीच्या कुशीमधी*
*बीयबियानं निजली*
*वऱ्हे पसरली माटी*
*जशी शाल पांघरली'*

बहिणाबाईंच्या प्रत्येक अनुभवातून उमटलेले बोल इतरांना काही ना काही सांगून जातात. त्यांचा प्रत्येक अनुभव बोलका होतो. तो अनेक गोष्टींची आपल्याला जाणीव करून देतो. जाणीवांना जाग आणणाऱ्या कितीतरी गोष्टी बहिणाबाईंना साध्या साध्या प्रसंगातून, प्रत्यही घडणाऱ्या घटनांमधून प्रतीत होत गेल्या. त्यातील विविधता, व्यापकता, मौलिकता, विचारधन असं बरंच काही बहिणाबाईंच्या प्रतिभाशक्तीला आजमावता आलं. बहिणाबाईंच्या संवेदनशील मनाचा प्रत्यय तर ओळीओळींतून, शब्दाशब्दांतून येत राहतो.

काव्यनिर्मिती ही बहिणाबाईंच्या जीवनाची ऊर्जा होती. त्यामुळे त्यांच्या जीवनचक्राला सुरम्य गती लाभली. त्यांच्या या अभिजात काव्यात क्षणाक्षणांतून आणि कणाकणांतून दिसणारं विचारसौंदर्य, भावसौंदर्य, जगण्याचा अर्थ, त्यातली सूक्ष्मता व्यक्त करणारं प्रतिभासामर्थ्य चकित करणारं आहे. माणसाच्या जीवनातलं वास्तव, कटू सत्य, माणसाच्या वृत्ती-प्रवृत्ती यांचा या काव्यातून अचूक वेध घेतला गेलाय,

*'पाहिसनी रे लोकाचे*
*व्यवहार खोटे नाटे*
*तेव्हां बोरी बाभयीच्या*
*आले अंगावर काटे'*

माणसानं केलेले अनिष्ट व्यवहार, खोटी-नाटी कृत्यं पाहून अवघ्या वस्तुजाताच्या, झाडा-झुडपांच्या अंगावरही काटे यावेत, शहारे यावेत हे बहिणाबाईंचं वास्तवदर्शी कल्पनासामर्थ्य! त्यांची ही विचारझेप थक्क करणारी! बहिणाबाईंचं अवघं काव्य मानवी जीवनाच्या गाभ्याला स्पर्श करणारं आहे. तेही त्यांच्या हृदयातून सहजस्फूर्तीनं उतरलेलं आहे.

निसर्ग हा बहिणाबाईंच्या काव्याचा अविभाज्य घटक. निसर्गातल्या वस्तुजाताचा शोध त्यांनी काव्यातून घेतला. त्यांचं जीवन आणि निसर्ग भिन्न नाहीच. निसर्गाची विविध रूपं, विविध अंगं त्यांनी पाहिली. त्यामुळे एखाद्या चित्रलिपीप्रमाणे अवघा निसर्ग त्यांनी आपल्या काव्यात सामावून घेतला. कारण त्यांनी निसर्गाशी एकरूपता साधलेली होती. त्यात निसर्गातली पानापानांमधली चाहूल आहे, पावसा-मातीचं आणि उगवाईचं नातं आहे, 'पान्यावऱ्हल्या'



अनुक्रमणिका







लाटा आहेत, दऱ्याखोऱ्या आणि सभोवतालची झाडझुडपं आहेत, पावसाची विविध रूपं आहेत, ढगातली बाजंदी अणि झगमगणारी 'ईज' आहे, धरित्रीच्या कुशीत निजलेली 'बियानं' आहेत, कापणीला आलेली पिवळी धमक शेतं आहेत, 'भिन भिन' येणारा वारा आहे. 'पयसा'ची लाल फुलं, 'बाभयी'चं, 'केयी'चं पान असं केवढं तरी निसर्गाचं साम्राज्य भरून राहिलेलं आहे. त्यांच्या जीवनाचा मोठा हिस्सा असा निसर्गमय होऊन राहिलेला दिसतो.

सभोवतालचा निसर्ग त्यांनी जाणीवेच्या नजरेनं पाहिला. आपल्या अस्सल अनुभवांचं, दृष्टिकोनाचं नातं निसर्गाशी जोडून त्या काव्यातून दाखले देत गेल्या.

*'जग जग माझ्या जीवा*
*असं जगनं तोलाचं*
*उच्च गगनासारखं*
*धरतीच्या रे मोलाचं'*

जगण्याचा मंत्र देणारं हे अनमोल सुभाषितच आहे. बहिणाबाईंच्या जगण्यातली सर्वसमावेशकता त्यांच्या काव्यात उतरत गेलीय. जुन्या काव्यधारेत चमकून उठेल, नव्या काव्यरसात झळकून उठेल, इतकं त्यांचं काव्य तेजोमय झालंय. बहिणाबाईंनी काही स्फुट काव्यं, म्हणीही लिहिल्या. त्यातही त्यांची मानवी स्वभाववृत्तीची, त्याच्या वर्तनाची खूप निरीक्षणं दिसतात. त्यांच्या निरीक्षणांचा मोहरा मात्र कुठूनही कुठेही वळू शकतो. त्या एके ठिकाणी म्हणतात,

*'कडू खानं रुचेना*
*कडू बोलनं रुचे*
*अशी कशी दुजाभाई*
*बोल वो वाचे'*

जिभेला कडू खायला आवडत नाही, पण कडू बोलायला मात्र आवडतं. या विसंगतीची त्यांना उकल होत नाही. मग त्या जिभेलाच विचारतात की, असा दुजाभाव का ? असा दुहेरी भाव का? बहिणाबाईंच्या काव्याचा विशेष म्हणजे, ते ग्रामीण जीवनावर बेतलेलं आहे. ते अवकाश छोटं वाटलं तर त्यांच्या काव्यात व्यापक तत्त्व आलेलं आहे. त्यात वास्तवार्थ आहे. ते कुठेही निरर्थक वाटत नाही.कारण त्यांचे सगळे बोल भावसंवाद घेऊन येतात. कसला ना कसला विचार घेऊन येतात.

*'मन पाखरु पाखरु*
*त्याची काय सांगू मात*
*आता व्हतं भुईवर*
*गेलं गेलं आभाळात'*

माणसाच्या मनाच्या किती तऱ्हा, किती परी आहेत, किती पदर आहेत, हे सांगताना बहिणाबाई म्हणतात,

*'मन मोकाट मोकाट*
*त्याले ठायी ठायी वाटा*
*जशा वाऱ्यानं चालल्या*
*पान्यावऱ्हल्या रे लाटा'*

मनाची रचना, जडणघडण इतकी विविधअंगी, विविधढंगी कशी असते, याचं बहिणाबाईंना कोडं पडतं. मनाची चंचलता, मनाचा लहरीपणा, मनाची अनिर्बंधता, मनाचं मुक्तपण, त्याचं असंयतपण, त्याची चपलता, त्याचं अनिश्चितपण त्या आपल्या काव्यात गुंफतात आणि त्या आद्यरचनाकाराला या व्यामिश्रतेबद्दल विचारतात,

*देवा, कसं देलं मन*
*आसं नाही दुनियात*
*आसा कसा रे तू योगी*
*काय तुझी करामत !'*

बहिणाबाई चौधरी यांची कविता म्हणजे साहित्यविश्वातलं एक वैभव आहे. उत्तुंग प्रतिभेचं वरदान जन्मजात लाभलेल्या बहिणाबाई जीवनाकडे फार समंजसपणे पाहतात. त्यांच्या नसानसांत काव्य खेळत होतं. त्यांचं जगणं जसं प्रांजळ होतं, तशा त्यांच्या कविताही पारदर्शी होत्या. नितळ होत्या. त्यांच्या कवितांमधून त्यांच्या अभिव्यक्तीतली सहजताही प्रतीत होत राहते.

ज्या काळात केशवसुत, तांबे, बी असे महाराष्ट्रातले प्रतिभावान कवी आपल्या काव्यनिर्मितीनं रसिकांना मुग्ध करून टाकत होते, त्याच काळात जळगावात राहणाऱ्या एका शेतकऱ्याच्या घरात एक अडाणी मराठी शेतकरी स्त्रीसुद्धा काव्यनिर्मितीत मग्न होती. तिचा हा साक्षेप मात्र या समकालीन कवींपर्यंत पोहोचू शकला नाही. कारण एकतर त्या कवितांना कोणतंही व्यासपीठ नव्हतं. तसंच लोकांपर्यंत पोहोचवण्याचं माध्यम त्यांना ज्ञात नव्हतं. त्यामुळे त्या काळात या कविता जणू गोठून गेल्या होत्या.

बहिणाबाई रूढ अर्थानं शाळेत गेल्या नसल्या तरी जीवनाची आणि निसर्गाची शाळा त्यांनी स्वत:साठी सतत उघडी ठेवली होती. त्या अशिक्षित होत्या, पण अज्ञानी नव्हत्या. त्यांच्या मनाला फुटलेले डोळे फार प्रखर होते. त्यांच्या अनुभूतीचा पोतच खूप वेगळा होता. त्यांच्या जाणीवा-नेणीवांमधून सगळी काव्यनिर्मिती झाली. म्हणूनच,

*'लेकीच्या माहेरासाठी*
*माय सासरी नांदते'*

हा प्रत्येक मातृहृदयाला हलवणारा, जगवणारा भावसंदेश त्या देऊ शकतात. त्यांनी सांगितलेलं हे मातृत्व आहे. कोणतीही सजग माता हे विसरू शकणार नाही.

अशी अनेक अमरतत्त्वं त्यांच्या काव्यातून प्रत्ययास येत गेली. या कवयित्रीच्या असामान्य प्रज्ञेतून उपजलेल्या समस्त काव्यसंपत्तीला रसिकमनानं केलेलं हे भावजागरण ! ■

नन्दा सुर्वे
'आनन्द-रंग', २७/३ हिंगणे खुर्द, सिंहगड रस्ता, पुणे ४११ ०५१.फोन नं. ४३५९०८८










# मराठी भाषाशिक्षणाचे महत्त्व



डॉ. मृणालिनी शहा



नव्या शतकात, संपूर्ण जगभर विविध क्षेत्रांमध्ये अतिशय वेगाने परिवर्तने होत आहेत. सर्वच संकल्पनांच्या व्यूहांत झपाट्याने बदल होत आहेत. स्वाभाविकपणेच मानवी संस्कृतीला आकार देणाऱ्या शिक्षणक्षेत्रामध्येही हा बदल जाणवतो आहे. अशा वेळी शिक्षणाच्या संकल्पनेमध्येही काही बदल करण्याची गरज निर्माण झाली आहे.

खरे तर संपूर्ण शिक्षणपद्धतीचाच नव्याने विचार करण्याची वेळ आली आहे. तथापि, शिक्षणाचे क्षेत्र व्यापक असल्यामुळे प्रस्तुत ठिकाणी मराठी भाषेच्या शिक्षणाचा विचार केला आहे. सध्याच्या जागतिकीकरणामुळे होणाऱ्या बदलांमुळे व माहिती-तंत्रज्ञानाच्या वेगामुळे मराठीच्या अध्ययन-अध्यापनामध्येही काही बदल करण्याची गरज निर्माण झाली आहे. राज्यभाषा म्हणून मराठीला मान्यता आहे. एवढेच नाही, तर प्राथमिक पातळीपासून ते पदवी आणि पदव्युत्तर पातळीपर्यंत मराठी हा विषय महाराष्ट्रातील सर्व शाळांमध्ये आणि विद्यापीठांमध्ये शिकवला जातो. तरीही मराठी भाषेच्या शिक्षणाला मिळावे तेवढे महत्त्व मिळत नाही. तसेच लोकव्यवहाराची भाषा किंवा ज्ञानभाषा म्हणून मराठीची स्थितीही फारशी समाधानकारक नाही, ही वस्तुस्थिती नाकारता येत नाही. म्हणूनच मराठी भाषेच्या शिक्षणाचा पुनर्विचार करण्याची निकड आहे, यात शंका नाही. शिक्षण हे क्षेत्र शासनाच्या कक्षेतील असले तरी एक नागरिक, एक शिक्षक या नात्याने मराठी भाषा-शिक्षणाविषयी काही बदल आपण सूचवू शकतो, किंबहुना ते आपले कर्तव्य आहे. या एका नम्र भावनेतून हे विवेचन केले आहे.

औपचारिक शिक्षण हे नेमलेल्या अभ्यासक्रमानुसार होते हे आपल्याला ठाऊक आहे. त्यामुळे अध्यापनाचा विचार करताना अभ्यासक्रम आणि त्यातील बदल अशीच दिशा ठरवणे क्रमप्राप्त असते. त्यामुळे याही विवेचनामध्ये 'मराठी' याविषयाचे ''सध्या प्रचलित असलेले अभ्यासक्रम आणि त्यातील भाषाशिक्षण हा विचार'' मध्यवर्ती ठेवला आहे. त्यातही पदवी आणि पदव्युत्तर शिक्षणातील मराठीच्या अभ्यासक्रमांना प्राधान्य दिले आहे.

## शिक्षण आणि भाषा

शिक्षणात भाषा अध्ययन-अध्यापनाला महत्त्वाचे स्थान आहे. कारण भाषेला आपल्या जीवनात महत्त्वाचे स्थान आहे. भाषा हा माणसाच्या जीवनाचा एक अविभाज्य भाग आहे. भाषा ही गोष्ट माणसाच्या प्रत्येक भावनेशी, प्रत्येक विचाराशी, प्रत्येक कृतीशी निगडित असते. माणसाच्या सामाजिक जीवनासाठी त्याला एकमेकांशी संपर्क साधणे, एकमेकांमध्ये विनिमय साधणे, निरनिराळ्या असंख्य संदेशांची देवाणघेवाण करणे आवश्यक असते. अशा

तऱ्हेचा संपर्क, विनिमय अणि संदेशन भाषेमुळे सहज शक्य होते. जीवन व्यवहारातील संप्रेषणाचे एक साधन म्हणून भाषा महत्त्वाची आहे.

भाषा मानवी जीवनात उपयुक्तता, सामाजिकता आणि सांस्कृतिकता अशा तीन प्रकारे कार्य करते. ही कार्ये करताना माणसाचे आत्मभान जागवते. भाषेमुळेच मानवी संस्कृतीचा विकास झाला आहे, ज्ञानसंवर्धन झाले आहे. तसेच संस्कृतीच्या विकासात शिक्षणाला औपचारिक किंवा अनौपचारिक असे एक विशिष्ट स्थान प्राप्त झाले. विद्यार्थ्यांचे व्यक्तिमत्त्व घडविणे, त्यांना मानसिक व वैचारिकदृष्ट्या समर्थ बनवणे, तसेच जीवनात स्वतंत्रपणे प्रवेश केल्यानंतर योग्य व्यवसायाची निवड करून स्वत:चा व समाजाचा विकास घडवून आणण्याची योग्यता त्यांच्यात निर्माण करणे, ही शिक्षणाची उद्दिष्ट्ये आहेत. या उद्दिष्टांच्या पूर्ततेसाठी भाषेचा आधार घ्यावाच लागतो.

मग अशा वेळी भाषा हे केवळ संपर्काचे माध्यम म्हणून राहत नाही, तर ते शिक्षणाचेही माध्यम बनते. स्वाभाविकपणेच शिक्षणप्रक्रियेत भाषेला अनन्यसाधारण स्थान प्राप्त झाले आहे. एवढेच नाही, तर भाषेला शिक्षणाचा पाया किंवा आधार म्हणायला हरकत नाही. हा पाया भक्कम व्हावा म्हणूनच भारतीय भाषांचा विकास करणे, हे भारताच्या शैक्षणिक धोरणाचे एक महत्त्वपूर्ण अंग आहे. सर्व ज्ञानक्षेत्रांत आणि लोकव्यवहारांत या भाषांचा सक्षमपणे उपयोग करता यावा, अशा रीतीने या भाषांची वाढ करण्याचे धोरण शासनाने ठरवलेले आहे. महाराष्ट्र शासनाने देखील राज्यभाषा मराठीची प्रगती करण्याचे उद्दिष्ट ठेवले आहे. महाराष्ट्राच्या शिक्षणक्रमात मराठी भाषेचे स्थान त्रिविध आहे. (१) भाषा शिक्षणक्रमात माध्यम म्हणून येते, (२) अध्ययनाचा सामान्य विषय म्हणून येते, (३) विशेष अध्ययनाचा विषय म्हणून येते. या अभ्यासक्रमानुसार कोणताही विद्यार्थी पूर्वप्राथमिक स्तरापासून उच्च माध्यमिक स्तरापर्यंत एकूण १४ वर्षांच्या कालावधीचा 'मराठी विषयाचा अभ्यासक्रम' पुरा करतो अणि मग हा विद्यार्थी कला, विज्ञान, वाणिज्य, वैद्यक, अभियांत्रिकी, संगणकविज्ञान, वास्तुविद्या, औषधज्ञान, कृषिविज्ञान इत्यादी शाखांपैकी कोणत्यातरी शाखेतील पदवी घेण्यास पात्र ठरतो. या शिक्षणात म्हणजेच उच्च माध्यमिक स्तरापर्यंत मराठी भाषा माध्यम म्हणून अध्ययनाचा सामान्य विषय म्हणून येते. फक्त पदवी परीक्षेसाठी (बी. ए.) आणि पदव्युत्तर परीक्षेसाठी (एम. ए.) मराठी विशेष अध्ययनाचा विषय म्हणून घेता येतो. तसा तो घेतलाही जातो.

### मराठीच्या अभ्यासक्रमाचे स्वरूप

पदवीशिक्षणासाठी येणाऱ्या विद्यार्थ्यांची पार्श्वभूमी पाहणे आवश्यक ठरते. त्याचप्रमाणे त्या पातळीवरील मराठीच्या अभ्यासक्रमाच्या स्वरूपाची पाहणी करणेही गरजेचे ठरते. प्रथम एका गोष्टीकडे लक्ष वेधावेसे वाटते. आपल्या अभ्यासक्रमांमध्ये या विषयाचे शीर्षक क्वचित 'भाषा' (प्राथमिक पातळीवर) असे असते. बहुतांश वेळा फक्त 'मराठी' असेच असते. 'मराठी भाषा' आणि 'मराठी वाङ्मय' असे दोन्ही अर्थ त्यातून अभिप्रेत असतात. एवढेच नाही, तर आपण इतरत्रही (शिक्षणेतर) 'भाषे'साठी व 'वाङ्मया'साठी 'मराठी' असाच शब्द वापरतो. भाषा आणि वाङ्मय अशा वस्तुत: दोन भिन्न गोष्टी आहेत. 'वाङ्मय' हा भाषेच्या

माध्यमातून केलेला कलाविष्कार आहे. नित्य परिचयामुळे आपल्याला येत असणारी भाषा-स्वभाषा किंवा मातृभाषा म्हणजेच 'भाषा' आहे, ही गोष्टच आपल्या लक्षात येत नाही. वाङ्मय या कलेची भाषा हीसुद्धा 'भाषेत' जरूर मोडते; पण ते भाषेचे विशेषीकृत रूप आहे. वाङ्मय हा भाषेचा स्वाभाविक उपयोग नाही. संगीत, शिल्प, चित्र इत्यादींच्या कलामाध्यमापेक्षा वाङ्मयाचे माध्यम 'भाषा' ही आपल्या नित्य परिचयाची असल्यामुळे इतर कलांपेक्षा वाङ्मय हे समाजजीवनाशी अधिक निगडित असते, परिचितही असते. पण त्यामुळे भाषा म्हणजे वाङ्मय, असे एक समीकरण नकळत आपल्या मनात बसले आहे. (याला काही अपवाद आहेत, हे विसरून चालणार नाही.) त्याचा परिणाम म्हणूनच की काय, आपल्या एकूण शिक्षण-पद्धतीत आपण वाङ्मयाचे शिक्षण केंद्रस्थानी ठेवलेले आहे. वाङ्मय शिकता शिकता मूल/विद्यार्थी जी काही भाषा शिकेल, ती शिकेल, अशाच स्वरूपाचे आपले अभ्यासक्रम आहेत. 'मराठी भाषेचे' अध्ययन आणि अध्यापन यांमध्ये फारसे दिसत नाही. अभ्यासक्रमात भाषेच्या व्याकरणाला स्थान असते. वस्तुत: व्याकरण हे भाषेचे एक अंग आहे. पारंपरिक व्याकरणात भाषेचे उपयोजन कसे असते, हे सांगणारी नियमावली असली तरी भाषेचे स्वरूप 'कसे आहे' यापेक्षा 'कसे असावे' हे ठरवण्याचाच प्रयत्न व्याकरणाकडून होत असतो. त्यामुळे भाषा 'कशी आहे' हे समजून घेण्यास आणि भाषेचे शिक्षण मिळण्यास त्याचा फारसा उपयोग होत नाही, असेच नाइलाजाने म्हणावे लागते. व्याकरणाचा भाषाविज्ञानाच्या पद्धतीने अभ्यास केला तर (उदा. कार्यात्मक व्याकरण) फलद्रूप ठरेल. पण सध्यातरी तसा अभ्यासक्रम कार्यान्वित झालेला नाही.

आतापर्यंतच्या स्पष्टीकरणातून अभ्यासक्रमामध्ये मराठी भाषेच्या अध्ययनाला आणि अध्यापनाला फारसा वाव नसतो, हे लक्षात येते. अशा पद्धतीने १४ वर्षे मराठीचे औपचारिक शिक्षण घेऊनही विद्यार्थी मराठी भाषेवर पुरेसे प्रभुत्व प्राप्त करू शकत नाहीत. बारावी उत्तीर्ण झालेल्या शेकडा साठ टक्के विद्यार्थ्यांमध्ये मराठी भाषेसंबंधी काही उणिवा आढळतात. त्यांना मराठी भाषेचे स्थूल स्वरूप ठाऊक नसते. त्यांना मराठी नीट वाचता येत नाही. आपले म्हणणे, आपला विचार, आपली भावना व्यक्त करता येत नाही. (बोलणे आणि लिहिणे या दोन्ही पद्धतींत) वाक्यरचना सदोष असते. शब्दसंग्रह पुरेसा विकसित झालेला नसतो. विद्यार्थ्यांची ही पार्श्वभूमी समजून घेतल्याशिवाय भाषेच्या अध्ययन-अध्यापनाचे स्वरूप लक्षात येत नाही आणि दिशाही कळत नाही.

आता यापुढील क्रमविकासी अभ्यासक्रमाकडे वळूया. बी. ए. आणि एम. ए.ला मराठी हा विषय विशेष अध्ययनासाठी घेतला जातो. येथेही भाषेच्या शिक्षणाची पूर्ण अनास्थाच दिसते. पुणे विद्यापीठापुरते पाहिले तर (आणि हीच गोष्ट थोड्याफार फरकाने इतर विद्यापीठांचीही आहे.) बी. ए. (मराठी) होताना मराठीच्या एकूण सात प्रश्नपत्रिकांचा आणि एम. ए. (मराठी) होताना मराठीच्या एकूण आठ प्रश्नपत्रिकांचा अभ्यास विद्यार्थी करतो. यातील एकेक प्रश्नपत्रिका भाषेच्या अभ्यासासाठी (भाषाविज्ञान) असते आणि ही प्रश्नपत्रिका विद्यार्थी आवडीने अभ्यासतात, असे नाही. येथेच अजून दोन खुलासे करायला हवेत.

१. भाषाविज्ञानात भाषेचा-भाषेच्या व्यवस्थेचा, संरचनेचा, शास्त्रीय अभ्यास केला जातो. त्यातून भाषेचे स्वरूप समजते, पण भाषा शिकवली जात नाही. भाषेचे शिक्षण याहूनही वेगळे असते. भाषेच्या शिक्षणाला या भाषेच्या अभ्यासाची मदत होऊ शकते. भाषेच्या वैज्ञानिक अभ्यासाची गरज महत्त्वाची असते. पण तरीही भाषाविज्ञान आणि भाषाशिक्षण या दोन वेगळ्या गोष्टी आहेत.

२. अभ्यासक्रमात वाङ्मयाचा समावेश हवाच. वाङ्मय हा शिकवण्याचा विषयही आहे, यातही शंका नाही. वाङ्मयाच्या मार्फत जाणिवा, संवेदनक्षमता आणि वृत्ती संक्रमित करता येतात. (शिकता येतात.) संवेदनक्षमता शिकण्याचे वाङ्मय हे माध्यम असते. विशेष अभ्यासाचा विषय म्हणून आणि सामान्य विषय म्हणून वाङ्मयाचा अभ्यासक्रमामधील वैचारिक आणि ललित वाङ्मयातून जीवनाचा एकंदर संदर्भ आणि आधुनिक मानवी समाजापुढचे प्रश्न यांची जाण निर्माण होऊ शकते. सामाजिकतेच्या अंगाने भाषा येथे काम करते. विद्यार्थ्यांची अभिरूची संपन्न करण्याचे काम, संवेदनक्षमता निकोप ठेवण्याचे कार्य ललितवाङ्मय करू शकेल. भाषेची सांस्कृतिकता येथे कार्यरत होत असते. वाङ्मयाकडे शिक्षणाचे माध्यम म्हणून, विद्यार्थ्यांवर संस्कार करण्याचे साधन म्हणून पाहायचे असते. शिवाय वाङ्मयाचा भाषा शिकण्याचे एक साधन म्हणून उपयोग होऊ शकतो. तरीही वाङ्मय हे भाषाशिक्षणाचे एकमेव साधन होऊ शकत नाही, ही गोष्ट एव्हाना आपल्या लक्षात आली असेलच.

वाङ्मयकेंद्री अभ्यासक्रमाखेरीज वाणिज्य आणि विज्ञान शाखेत 'व्यावहारिक मराठी' नावाचा एक उपयोजित स्वरूपाचा अभ्यासक्रमही आता जवळजवळ सर्व विद्यापीठांमधून शिकवला जातो. त्याचा भाषाशिक्षणासाठी आणि भाषेच्या उपयोजनासाठी उपयोग होत असला, तरी त्याचा विचार स्वतंत्रपणे करणे इष्ट ठरेल.

ही पार्श्वभूमी लक्षात घेऊन मराठी भाषाशिक्षण किंवा अध्ययन-अध्यापन म्हणजे काय, ते पाहूयात.

## मराठी भाषेच्या अध्ययनाची गरज

शाळेत जाण्याअगोदरच लहान मूल भाषेचा वापर करत असते. मूल ज्या परिसरात जन्मते, वाढते त्या परिसराची भाषा ते आत्मसात करत असते. भाषेचे औपचारिक शिक्षण न घेताही मानवाजवळ असणाऱ्या भाषिक क्षमतेमुळे समाजात वावरण्यासाठी त्याला भाषा अवगत असते. या भाषेलाच 'मातृभाषा' किंवा 'स्वभाषा' असे म्हटले जाते. ही स्वभाषा जरी आपल्याला येत असली तरी त्या भाषेत आपण आपला आशय प्रभावी रीतीने प्रकट करू शकतोच, असे नाही. भाषेचे कामचलाऊ ज्ञान आपली अगदी मामुली गरजच भागवू शकते. त्यामुळे स्वभाषेवरची हुकमतसुद्धा प्रयत्नांनी मिळवावी लागते, हे लक्षात घेणे आवश्यक आहे.

महाराष्ट्रात प्रदेशागणिक आणि सामाजिक भेदागणिक मराठीच्या अनेक बोली वा भाषा बोलल्या जातात. मात्र परस्परांच्या भाषा एकमेकांना समजूच नयेत, इतके ते भेद तीव्र नसतात. भौगोलिक आणि सामाजिक कारणांमुळे निर्माण झालेल्या विविध भाषाभेदांना सामावून घेणारी

त्या समाजाची अशी जी एकसंध भाषा ती प्रमाणभाषा किंवा बोलींना जोडणारी संपर्कभाषा असेही तिला म्हणता येते. महाराष्ट्रात मराठी ही प्रमाणभाषा आहे. राजकारण, समाजकारण, संस्कृती आणि शिक्षण या क्षेत्रांमध्ये एकसारखेपणा राहण्यासाठी प्रमाणमराठीची गरज असते. परंतु तरीही वैचारिक, व्यावहारिक आणि भावनात्मक अभिव्यक्ती या भाषिक गरजा पूर्ण करणाऱ्या प्रमाणभाषेचीही गरज असते. संपर्कभाषा म्हणून प्रमाणमराठीचे अध्ययन अगत्याचे ठरते. तिचे भाषाज्ञान करून घेणे, तिच्यात प्रभुत्व मिळणे आणि भाषिक क्षमतेची प्रगती करणे आवश्यक ठरते. शाळेत प्रमाण भाषेचे अध्ययन अपेक्षित असते. मराठी ही अखिल महाराष्ट्राची संपर्क भाषा, जोडभाषा (Link language) आहे.

भाषा शिक्षणाची व्याप्ती याहून अधिक आहे. भाषा हा एकप्रकारे जीवनरस असतो. वासुदेव बळवंत पटवर्धन यांनी १९०६ साली भाषा शिक्षणाबद्दल जे सांगितले आहे, ते पाहण्यासारखे आहे.

''कोणत्याही देशात मुलाला जर काही शिकवणे अवश्य असले तर ती त्याची जन्मभाषा होय. ती भाषा म्हणजे तो व त्याचे पूर्वज, वर्तमान व भूत, तो व त्याचे शेजारी, तो व त्याचा समाज यांचे एकत्व ठरविणारे नाते असते. महाराष्ट्रातील प्रत्येक मुलास महाराष्ट्राची भाषा शिकवायची नाही तर काय शिकवायचे ?'' (शिक्षण, शिक्षक व अभ्यासक्रम, २०००, पृ. ३७) म्हणूनच अभ्यासक्रमात मराठी भाषाशिक्षण या विषयाला तोलामोलाचे स्थान दिले पाहिजे. आपल्या अभ्यासक्रमात अशा प्रकारचे भाषाशिक्षण आहे का, याचा विचार करावा लागेल.

## भाषेच्या अध्यापनाची पद्धत

भाषा ही कौशल्याधिष्ठित क्षमता असल्यामुळे भाषाशिक्षण हे मुख्यत: उपयोजित स्वरूपाचे असते. भाषाशिक्षणात श्रवण, भाषण, वाचन आणि लेखन ही चार मूलभूत कौशल्ये शिकवायची असतात. ही कौशल्ये वरवर पाहता सहज आणि सोपी वाटतात. परंतु त्यांचे स्वरूप तसे नाही. **श्रवण :** म्हणजे श्रवण म्हणजे नुसते बोलेणे ऐकणे असे नाही, तर लक्षपूर्वक आणि अर्थासह, आकलनासह ऐकणे आहे. भाषेतील ध्वनींचे उच्चार, स्वरांचे चढउतार अणि त्यातील विरामस्थळे समजावून घेणे, येथे महत्त्वाचे असते. मुलाचे भाषाशिक्षण हे तर श्रवणावर आधारलेलेच असते; पण याचा फार थोडा वापर आपल्या अभ्यासक्रमात केला जातो.

**भाषण :** बोलणे ही प्रत्यक्ष करावयाची भाषिक कृती असते, active skill असते. दुसऱ्याला किंवा ऐकणाऱ्याला समजेल अशा पद्धतीने बोलणे, म्हणजे भाषण.

**वाचन :** हे संवाद किंवा संप्रेषणाच्या दृष्टीने तसे निष्क्रिय असले तरी (स्वत:शीच करावयाचे असल्याने) तिचे आकलन, वाचलेला मजकूर समजून घेणे अपेक्षित असते.

**लेखन :** हे कौशल्य निर्मितीशील (productive) आहे. कोणीतरी सांगितलेले लिहून घेणे - 'लेखकु' होणे म्हणजे लेखन नाही; तर जे ऐकलेले, जे वाचलेले असते ते समजून घेऊनं त्यासंबंधीचे आपले आकलन, आपली प्रतिक्रिया व्यक्त करणे, असा लेखनकौशल्याचा व्यापक अर्थ आहे. बोलीभाषेपेक्षा लिखित भाषा वेगळी असते, हेही लक्षात घ्यावे लागते.



अनुक्रमणिका

बोलताना समोर श्रोता असतो. त्याच्या प्रतिक्रिया व्यक्त होत असतात. त्यामुळे संप्रेषण सुलभ असते. परंतु लेखनात श्रोत्याचा अभाव असतो. त्यामुळे लेखन बोलण्यापेक्षा अवघड असते. तांत्रिक आणि आशयात्मक अशा लेखनाला दोन बाजू असतात. तांत्रिक बाजूमध्ये अक्षरांचे वळण पाहावे लागते. अक्षरांची मांडणी शब्दरूपात होते. तर शब्दांची वाक्यात योग्य जुळणी होत असते. म्हणून लेखनात त्या रचनांकडेही लक्ष पुरवावे लागते. वाक्यातील विरामचिन्हे, परिच्छेद, त्याची मांडणी या गोष्टी तांत्रिक असल्या तरी महत्त्वाच्या असतात.

लेखनाची आशयात्मक बाजू ज्ञानाच्या अंगाने महत्त्वाची ठरते. विषयांची निवड, त्यांचा आरंभ, मध्य, शेवट अशा प्रकारे योग्य मांडणी करण्याची सवयच लावून घ्यावी लागते. विचारांचे विविध पैलू, त्यांचा क्रमन्वित विकास आणि मांडणीतील सुसूत्रता इत्यादी गोष्टी कुशलतेने मांडाव्या लागतात. शिवाय आशय व्यक्त करण्यासाठी लागणारी शब्दसंपत्ती आणि शैली या गोष्टीही आत्मसात कराव्या लागतात. लेखनकौशल्यात या दोन्ही अंगांचा विकास होणे अपेक्षित असते. त्यासाठी आपलेच लेखन पुनः पुन्हा तपासून पाहण्याची सवय करून घेणे भाषेच्या अध्यायनात योग्य ठरते.

वरवर पाहता ऐकणे, बोलणे, वाचणे, लिहिणे ही कौशल्ये प्राथमिक शिक्षणाच्या पातळीवरची वाटतात, पण वस्तुस्थिती तशी नाही. पदवी परीक्षेच्या विद्यार्थ्यांसाठी, पदव्युत्तर पातळीवरील विद्यार्थ्यांसाठीही हा भाषेच्या कौशल्याचा सराव करणे अत्यंत उपयुक्त आहे, गरजेचे आहे.

अशा पद्धतीने 'भाषा अध्ययनाचा' औपचारिक शिक्षणाच्या अभ्यासक्रमात समावेश करणे आता महत्त्वाचे झाले आहे. ही प्राथमिक कौशल्ये प्राप्त झाल्यानंतर संवाद, वर्णन, कथन, सारांशलेखन, रूपांतर, भाषांतर इत्यादी प्रगत कौशल्ये प्राप्त करून घेता येतात. व्यक्तिमत्त्वाच्या विकासात या सर्व भाषिक कौशल्यांनी फरक पडतो.

संप्रेषण कौशल्याचा समावेशही भाषा शिक्षणात करावा लागतो. समाजातील रीती, समजुती, बोलण्या-चालण्याच्या पद्धती समजून घेऊन संप्रेषणक्षमता विकसित करावी लागते. समाजाचे काही संकेत स्त्री-पुरुषांसाठी निरनिराळे असतात, हेही ध्यानात ठेवणे आवश्यक असते.

अशा पद्धतीचे भाषिक क्षमता वाढवणारे मराठी भाषेचे अध्ययन आपल्या कोणत्याच अभ्यासक्रमात होत नाही. किंबहुना होत नसावे, म्हणून याचा शालेय पातळीवरून क्रमविकास पद्धतीने महाविद्यालयीन अभ्यासक्रमात समावेश करावा, असे सुचवावेसे वाटते. मात्र त्यासाठी जाणीवपूर्वक प्रयत्न करावे लागतील.

### मराठी भाषेच्या अध्यापनाच्या दिशा

मराठीचे अध्यापन शैक्षणिक, सामाजिक आणि सांस्कृतिक या तीनही पातळ्यांवर करता येते. किंबहुना ते करावयाचेच असते. परंतु, येथे फक्त शैक्षणिक पातळीवरच्या भाषा-शिक्षणाचा विचार केला आहे. आता पाहिलेल्या भाषेच्या मूलभूत कौशल्याधिष्ठित अध्यापन पद्धतीचा वापर विविध विद्याशाखांसाठी कसा करता येईल, हे पाहणे अगत्याचे आहे. नवीन शतकातील आव्हाने पेलण्यास आपले शिक्षण कसे सक्षम बनवता येईल, याचा विचार प्रस्तुत

ठरतो. त्यासाठी विद्यार्थ्यांची भाषिक क्षमता कशी वाढेल, ती संपन्न कशी होईल, याचाही विचार महत्त्वाचा ठरतो. त्याचप्रमाणे त्यांची साहित्याची जाण कशी जोपासता येईल, याचाही शोध घेतला पाहिजे. एकूणच शिक्षणाचे ध्येय भाषा, साहित्य अणि संस्कृती यांच्या अभ्यासांना योग्य स्थान प्राप्त करून देणे, असे हवे. त्यासाठी अभ्यासक्रमातील काही सुधारणा येथे सूचित करण्याचा प्रयत्न केला आहे. त्याचा भाषाशिक्षणाच्या विचारमंथनाला दिशा मिळण्यास उपयोग होईल, असे वाटते.

प्राथमिक पातळीपासून भाषा शिक्षणाकडे लक्ष पुरवले पाहिजे. प्रमाणभाषा वाचायला शिकवताना प्रत्यक्ष मोठ्याने बोलणे, वाचन करून घेणे आवश्यक आहे. शासनही त्या संदर्भात काही प्रयत्न करत आहे. इयत्ता पहिली ते पाचवीसाठी कार्यात्मक व्याकरणाचा नवा प्रयोग सध्या केला जातो आहे. वाक्यातील प्रत्येक भाषिक घटक, त्या घटकाचा वाक्यातील दुसऱ्या घटकांशी असलेल्या नात्यांचा अभ्यास म्हणजे कार्यात्मक व्याकरण. भाषेतील घटकांच्या अभ्यासामुळे आणि त्यांचा प्रत्यक्ष वापर करण्याच्या सरावामुळे त्यांची भाषिक क्षमता वाढण्यास निश्चित मदत होईल. या कार्यात्मक व्याकरणाचा पुढील भाग माध्यमिक शाळेतही समाविष्ट करावा. त्याचप्रमाणे शासनाने भाषेचा क्षमताधिष्ठित अभ्यासक्रम आखला आहे. त्यातील 'बोलणे' या कौशल्यावर भर देऊन मुलांमधील सर्जनशीलतेला वाव देण्यासाठी शिक्षकांना प्रवृत्त केले पाहिजे. शिक्षकांसाठी अधूनमधून सतत कार्यशाळा घेऊन भाषेच्या अध्यापनाचे महत्त्व त्यांना पटवून दिले पाहिजे.

भाषेच्या संदर्भात आणखी एक महत्त्वाची गोष्ट नमूद करावीशी वाटते. भाषेच्या वर्गातच विद्यार्थी भाषा शिकतो, हे खरे नाही. शिक्षणसंस्थेतल्या एकूण वातावरणातून तेथील भाषिक व्यवहारातून आणि इतर विषयांच्या वर्गात वापरल्या जाणाऱ्या भाषेवरूनही तो भाषा शिकत असतो. म्हणूनच भाषेच्या वर्गात होणाऱ्या त्याच्या भाषाशिक्षणाशी शिक्षणसंस्थेतील भाषिक वातावरण अणि इतर विषयांच्या वर्गात वापरली जाणारी भाषा यांचा सुसंवाद राखला जाईल, याची काळजी घेतली पाहिजे. 'जो जो मराठीतून शिकवतो तो तो मराठी भाषा शिकवतो' हे सूत्र येथे लक्षात घेतले पाहिजे.

याचप्रमाणे उच्च माध्यमिक पातळीवरच्या अकरावी आणि बारावी या वर्गाच्या अभ्यासक्रमात कार्यात्मक व्याकरणावर आधारित थोडा भाग, थोडा भाग वर्णनात्मक भाषाविज्ञानाची प्राथमिक ओळख यासाठी ठेवला तर विद्यार्थ्यांना भाषाध्ययनाचे महत्त्व लक्षात येईल. त्यांचे लेखनकौशल्य वाढले आहे की नाही, हे पाहण्यासाठीच्या चाचण्या तयार केल्या पाहिजेत. भाषिक कोडी तयार करणे किंवा विविध भाषिक खेळ यांचा समावेश केल्याने त्यांना भाषिक कौशल्यांचा विकास करण्यातही रूची वाटेल.

विद्यापीठ पातळीवर सामान्य पातळीवरच्या अभ्यास-पत्रिकेमध्ये तोंडी परीक्षेला गुण ठेवावेत. त्यामुळे बोलणे, भाषण या भाषिक कौशल्याचा विकास होऊन पर्यायाने त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचाही विकास होईल. लेखनकौशल्यासाठी साराग्रहण, संवादलेखन, मुलाखतलेखन, कवितेचे रसग्रहण इत्यादी अनेक बाबींचा समावेश करावा. अर्थातच यासाठी अध्ययनातही

जिवंतपणा ठेवण्याची शिकस्त अध्यापकांनाच करावी लागणार आहे.

मराठी विषयाच्या विशेष अध्ययनासाठीच्या अभ्यासक्रमात तीनही वर्षी पुढील तीन विषय ठेवावेत — बोलीचा अभ्यास, शैलीलक्षी अभ्यास, आणि आधुनिक भाषाविज्ञान. तर एम. ए.च्या अभ्यासपत्रिकेत भाषाविज्ञानाच्या अभ्यासाची वाढ करून भाषेच्या वर्णनात्मक अभ्यासाची प्रात्यक्षिके ठेवावीत. शिवाय प्रत्यक्ष अनुवाद करणे वगैरे प्रगत भाषिक कौशल्यांचा प्रात्यक्षिकासह समावेश केल्याने त्यांचे भाषाशिक्षण सखोल होईल. नवनिर्मितीच्या संबंधाने कार्यशाळा आयोजित करून त्यातून स्वाध्याय करून घेणेही उपयुक्त ठरेल. सर्वात महत्त्वाचे म्हणजे प्रमाणभाषेच्या लेखनपद्धतीकडे (शुद्धलेखन) गांभीर्याने पाहिले पाहिजे. नेहमी चुकणाऱ्या शब्दांची (आशीर्वाद, पारंपरिक, शारीरिक, आविष्कार, उपाहारगृह, वाङ्मय, परीक्षा इ.) व्युत्पत्ती किंवा शब्दघटना समजावून दिल्याने विद्यार्थ्यांच्या लेखनातील चुका कमी होतील व त्यांचा आत्मविश्वासही वाढेल. आणि ही गोष्ट फक्त मराठी साहित्याचा अभ्यास करणाऱ्यांसाठीच महत्त्वाची आहे, असे नाही तर जो जो मराठी माध्यमातून शिकतो, त्यांच्यासाठी म्हणजेच सामाजिक शास्त्रांच्या बाबतीतही तितकीच महत्त्वाची आहे.

सामाजिक शास्त्रांच्या अभ्यासक्रमाची चर्चाही भाषाशिक्षणाच्या संदर्भात महत्त्वाची आहे. उच्च स्तरावरील सामाजिक शास्त्रांच्या शिक्षणामध्ये भाषाविकासाला पूरक असे ज्ञान देणारा एक विषय म्हणून मराठी भाषा समाविष्ट केली पाहिजे. प्रगत भाषिक कौशल्य-विकासाबरोबर एखाद्या साहित्यकृतींचा अभ्यास केल्याने विद्यार्थ्यांच्या व्यक्तिमत्त्वाच्या निकोप संवर्धनाला निश्चितच मदत होईल. ही भाषाविषयक जाणीव आता सामाजिक शास्त्रांच्या अभ्यासकांनाही झाली आहे. डॉ. राजा दीक्षित यांनी 'सामाजिक शास्त्रे आणि मराठी माध्यम' यांचा ऊहापोह करताना ''भाषा हे समाजाचे स्पंदन असते. या स्पंदनाचा वेध घेणे आवश्यक असते,'' असे म्हटले आहे. काळानुसार समाज कसा बदलला, याचा अभ्यास करण्यासाठी भाषा व साहित्यातील बदलांचा अभ्यास मोलाचा ठरतो, असे प्रतिपादन केले आहे. एवढेच नाही तर पुढे ते म्हणतात, ''भाषा, साहित्य आणि सामाजिक शास्त्रे यांच्या स्वायत्ततेचे भान राखून त्यांच्यातील दुराव्याच्या भिंती पाडणे आवश्यक आहे. निव्वळ मराठी भाषेतून सामाजिकशास्त्रे शिकून पुरेसे नाहीतर मराठी भाषेसह सामाजिकशास्त्रे आणि सामाजिक शास्त्रांसह मराठी भाषा व साहित्य शिकणे आवश्यक आहे.'' ('मराठीचे भवितव्य', पुणे, २००१, पृ. १९९). एका इतिहासाच्या प्राध्यापकाचे हे निरीक्षण 'भाषेच्या अध्यापनाच्या'दृष्टीने पुरेसे बोलके आहे. मराठी भाषेकडून व्यक्त केल्या जाणाऱ्या या अपेक्षा पूर्ण करण्याचे काम मराठी अभ्यासकांनी करायचे आहे.

याप्रमाणे विज्ञान शाखेच्या अभ्यासक्रमातही मराठी माध्यमाचा विचार करून मराठी भाषेला ज्ञानभाषा बनवण्याची गरज कितीतरी शास्त्रज्ञांनी प्रतिपादन केली आहे. डॉ. जयंत नारळीकर यांनी तर सातत्याने याचा पाठपुरावा केला आहे. पण आज मात्र विज्ञानाच्या अभ्यासासाठी इंग्रजी हेच माध्यम स्वीकारले गेले आहे. कारण ती आंतरराष्ट्रीय ज्ञानभाषा आहे. परंतु खरे पाहिले तर विज्ञानाची अशी एक वेगळीच परिभाषा असते. ही परिभाषा प्रामुख्याने इंग्रजी शब्दांचा

वापर करत असली तरी त्यातील पारिभाषिक शब्दांचा अर्थ इंग्रजी जाणणाऱ्या माणसालाही कळत नसतो. त्यालाही ती परिभाषा समजूनच घ्यावी लागते. मग तीच गोष्ट मराठी भाषेतून समजून घेतानाही होत असते. म्हणून परिभाषेचा (ती समजण्याचा) बाऊ न करता, विज्ञान मराठी भाषेत आणण्याचा प्रयत्न केला पाहिजे. तरच ते खेड्यापाड्यांत आणि तळागाळातल्या लोकांपर्यंत जाऊन पोहोचेल. येथे परिभाषा बनवण्याच्या कामी भाषा- अध्यापनाचा निकटचा संबंध आहे. आपली भाषा टिकवायची असेल, तर ती काळाशी संवादी हवी आणि या विज्ञानाच्या युगात ती प्रामुख्याने विज्ञानाची झाली पाहिजे. विज्ञान- शाखेच्या अभ्यासात भाषाविज्ञान, भाषेची व्युत्पत्ती, प्रगत भाषिक कौशल्ये यांना स्थान दिले पाहिजे.

वाणिज्य ही शाखा आर्थिक व्यवहाराशी निगडित असणारी आहे. व्यापाराच्या निमित्ताने बँक, सरकारी कार्यालये यांच्यांशी या लोकांचा संबंध येतो. अशा प्रकारच्या व्यवहारात विद्यार्थ्याला सुव्यवस्थित मराठी भाषेची गरज पडते. हे लक्षात घेऊन पुणे विद्यापीठाने व इतर बऱ्याच विद्यापीठांनी कार्यालयीन पत्रलेखन, टिप्पणी, कार्यवृत्त, अहवाल, बातमीलेखन, जाहिरात, मुलाखत इत्यादी अनेक बाबींचा त्या प्रश्नपत्रिकेत समावेश केला आहे. त्याच्या जोडीला एक पाठ्यपुस्तक (साहित्याचे) नेमलेले असते. ही प्रश्नपत्रिका मराठी भाषेचा उपयोजित पद्धतीने अभ्यास कसा करावा, याचे मार्गदर्शन करणारी आहे, यात शंका नाही. व्यवहाराची काही क्षेत्रे अशी असतात की, जेथे लेखनभाषाच वापरावी लागते. अशा वेळी लेखनासाठी वेगळीच परिभाषासुद्धा उपयोजावी लागते. त्या सर्वांचा विचार या प्रश्नपत्रिकेच्या संदर्भात करावा लागतो. मात्र शिकवताना या विषयात जिवंतपणा ठेवण्याचे अवघड काम प्राध्यापकांना करावे लागते. ही गोष्ट लक्षात घेतली नाही, तर या विषयाकडे विद्यार्थी पाठ फिरवण्याची शक्यता नाकारता येत नाही. अशा प्रकारची प्रश्नपत्रिका कला व विज्ञान शाखेसाठी उपयुक्त ठरते. व्यवहारातल्या या भाषिक-कौशल्यांमध्ये नीटनेटकेपणा, सुव्यवस्थितपणाची आणि शिस्तीची गरज असते. हे विद्यार्थ्यांना पटवून देणेही येथे आवश्यक ठरते. शिवाय लेखनाची भाषा प्रमाणभाषेतील नियम पाळूनच वापरावी लागते, याची जाणीव विद्यार्थ्यांमध्ये निर्माण करावी लागते. त्यामुळे म्हटले तर सोपा, पण तसा आव्हानात्मक असणारा हा अभ्यासक्रम आहे. सध्याच्या जागतिकीकरणाच्या वातावरणात हा विषय भाषाशिक्षणासाठी महत्त्वाचा ठरू शकेल.

शिक्षणशास्त्राच्या पदवी परीक्षेमध्ये आणि पदव्युत्तर परीक्षेमध्ये 'मराठीचे अध्ययन आणि अध्यापन' हा विषय आहे. मातृभाषा शिकवण्याच्या पद्धती याद्वारे अभ्यासली जाते. येथे शालेय अभ्यासक्रमातील पाठ्यपुस्तके आणि व्याकरणाच्या अभ्यासाबरोबर भाषाशिक्षणाचाही अभ्यास केला जातो. भाषेची कौशल्ये, श्रवण, भाषण, वाचन आणि लेखन ही कशी शिकवावीत, याचे मार्गदर्शन यातून केले जाते. अध्यापनशास्त्रात भाषा-अध्यापनाच्या या मूलभूत गोष्टीचा विचार आहे. पण प्रत्यक्षात भाषा शिकविताना किती शिक्षक त्या पद्धतींचा वापर करत असतील, असा प्रश्न मनात येतो.

भाषेचा अभ्यास करणारे भाषाविज्ञान किंवा वर्णनात्मक/कार्यात्मक व्याकरण यांचा समावेश या अभ्यासक्रमात नाही. शिक्षकांमध्ये आधुनिक ज्ञानाबद्दल उत्सुकता निर्माण करण्याचा प्रयत्न

येथे करावा. तसेच भाषिक कौशल्ये मुलांना शिकवण्याचे प्रयोग त्यांनी प्रत्यक्षात उतरवण्यासाठी त्यांना उत्तेजन दिले पाहिजे.

अशा प्रकारे सर्व विद्याशाखांमध्ये भाषा-अध्यापनाला आणि अध्ययनाला महत्त्वाचे स्थान दिले पाहिजे, तरच नव्या जगातील आव्हाने पेलण्यास मराठी भाषा सक्षम बनेल. खरे तर शिक्षणाचा आणि भाषेचाही समाजाशी आणि सांस्कृतिकतेशी अतिशय जवळचा संबंध असतो. त्यामुळे त्यांचे परस्परसंबंधही व्यामिश्र स्वरूपाचे असतात. भाषेच्या शिक्षणात तिचे सामाजिक आणि सांस्कृतिक वळण लक्षात घेणेही महत्त्वाचे असते, हे आपल्याला ठाऊक आहेच. आपण सर्वांनीच भाषेला; तिच्या अभिव्यक्तीला आपल्या जीवनात महत्त्वाचे स्थान देण्याची गरज आहे. मराठीचा विचार आजवर प्रामुख्याने साहित्याच्या अंगाने झाला. तो भाषेच्या अंगाने होणे अगत्याचे आहे.

*(''मराठी भाषा व साहित्य : अध्यापनातील नवी आव्हाने'' या विषयावर श्रीमती चांदीबाई हिंमतमल मनसुखानी महाविद्यालय, उल्हासनगर येथे २ व ३ फेब्रुवारी २०००२ रोजी झालेल्या चर्चासत्रात वाचलेल्या निबंधाच्या आधारे केलेले लेखरूप)*

■

मृणालिनी शहा
१, शीतल अपार्टमेंट, ४६/४, एरंडवन, पुणे ४११ ००४. दूरध्वनी : ५४३३८६९.

---

**स्वागत**

**राजहंस प्रकाशन, पुणे यांची प्रकाशने**

**तेंडुलकरांच्या निवडक कथा :** विजय तेंडुलकर.
**लढा साखरेशी :** डॉ. रमेश गोडबोले.
**तमसो मा :** पंकज कुरुलकर.
**विद्येच्या बैलाला ! :** संजीव लाटकर.
**झाड लावणारा माणूस :** मूळ लेखक-जा. ओनी, अनुवाद-माधुरी पुरंदरे.

---



---



अनुक्रमणिका






# प्रकाश संत यांचे कथालेखन

अ. श्री. भडकमकर

मराठी कथेत, बालमानसचित्रणाला एक आगळे महत्त्व आहे. हरिभाऊ आपटे यांच्यापासून आशा बगे, व. बा. बोधे, बाबूराव बागूल यांच्यापर्यंतच्या कथालेखक-लेखिकांनी बालसाहित्यातील बालांसाठी केलेल्या लेखनापेक्षा हे लेखन वेगळे आहे.

सुप्रसिद्ध कवयित्री इंदिरा संत यांचे सुपुत्र श्री. प्रकाश नारायण संत तथा डॉ. भालचंद्र दीक्षित यांचे ललितलेखन मराठीतील आजवर झालेल्या बालमानसचित्रणापेक्षा वेगळे आहे. 'वनवास'(१९९४), 'शारदा संगीत' (ऑगस्ट १९९७) आणि 'पंखा' (एप्रिल २००१) हे त्यांचे तीन कथासंग्रह आहेत. या तिन्ही कथासंग्रहांत 'लंपन' या तीव्र संवेदनशील व कल्पक मुलाचे आत्मशोधन करणारे भावविश्व चित्रित झाले आहे. 'पंखा' नंतर 'झुंबर' हा आणखी एक कथासंग्रह प्रसिद्ध होणार आहे. भालचंद्र नेमाडे यांच्या 'बिढार', 'जरीला' 'झूल' आणि 'हिंदू' (यापैकी हिंदू प्रसिद्ध झाली नाही) या चार कादंबरी चतुष्ट्यात मांडलेल्या एका वेगळ्या भावविश्वाची एका निराळ्या संदर्भात आठवण करून देणारे हे संतांचे लेखन आहे. पण आश्चर्य म्हणजे हे लेखन आजवर उपेक्षित राहिले आहे. तसे प्रकाश संत १९६० पासून लिहीत आहेत. त्या साली 'वनवास' नावाची त्यांची कथा वाचून त्यातला शाळकरी वयाचा 'लंपन' पु. ल. देशपांडे यांच्या मनात वर्षानुवर्षं घर करून बसला होता. ते लिहितात, 'पौंगडावस्थेतल्या मुलांचं जग त्या कथेतून एखाद्या सुंदर चित्रपटासारखं डोळ्यांसमोरून सरकून गेलं होतं. ज्या भाषेत ह्या लंप्यानं आपल्या शाळकरी वयात ही कथा सांगितली होती ती बेळगावची मराठी होती. मराठीला कानडी चाल लावलेली. त्या चालीवरचं मराठी बोलणं अतिशय लोभस. अतिशय आर्जवी. एखाद्या गाण्यासारखं मनात रुंजी घालणारं. 'सत्यकथे'त तीस वर्षांपूर्वी प्रसिद्ध झालेली ही कथा आजही तितकीच टवटवीत राहिली आहे.'' अशा शब्दांत 'वनवास' या कथा-संग्रहाची पाठवणी पु. लं.नी केली होती.

समकालीन लघुकथा-लेखक यांच्या संदर्भात संतांची कथा कुठे बसते, याचा विचार करावा लागेल. त्यातूनच संतांचे मराठी कथेला नेमके योगदान कोणते, याचा विचार करता येईल.

याबाबत अडचण अशी आहे की, प्रकाश संत हे १९६० पासून ललितलेखन करीत असले तरी त्यांच्या लेखनाचे स्वरूप तसे मर्यादित आहे. त्यांचे लेखन फक्त बालानुभवावर आहे.

बालकथा वेगळी आणि बालमानसकथा वेगळी. हरिभाऊंपासून प्रत्येक कालखंडात अगदी नवकथेनंतरच्या कथेच्या कालखंडापर्यंत जवळजवळ प्रत्येक महत्त्वाच्या लघुकथालेखक/ लेखिकेने बालमनावर लिहिले आहे. या सर्व शतकभरातील कथालेखनात प्रकाश संत यांचे

कथालेखन आगळे व स्वयंभू आहे, असे वाटते. 'बालमानसकथा' हा शब्द 'किशोरकथा' याला पर्यायी म्हणून प्रा. विद्याधर पुंडलीक यांनी वापरला आहे. 'बालांसाठी लिहिली जाणारी ती बालकथा आणि बालांच्या वर्तनावर लिहिलेली विश्लेषण करणारी ती बालमानसकथा' असे म्हणता येईल. उदा. गंगाधर गाडगीळ यांनी 'मानसचित्रे' या कथासंग्रहात अशा बालमानसकथा लिहिल्या आहेत. पु. भा. भावे यांची 'वैरी' नावाची ४ वर्षांच्या जगू नावाच्या मुलाच्या अनुभवावर आधारित बालमानसकथा आहे.

बालमानसचित्रणातून 'मराठी कथेतील' बालमानसकथा हा एक स्वतंत्र आकृतीबंध तयार झाला आहे —— लघुकथेच्या आशय आणि अभिव्यक्तीच्या परिभाषेच्या पलीकडे जाऊन बालमनाच्या आगळ्यावेगळ्या बालानुभवांचे भावपूर्ण व स्वयंभू अनोखे दर्शन - मनोविश्लेषण आणि संज्ञा-प्रवाह या मानसशास्त्रीय पद्धतींचा उपयोग करून.

तसं पाहिलं तर प्रकाश संत म्हणजे डॉ. बी. जी. दीक्षित हे भूस्तर शास्त्राचे प्राध्यापक. पण बालमनाचे तटस्थ पातळीवरून केलेले कलात्मक निरीक्षण हा या तिन्ही कथासंग्रहांचा विषय आहे. 'ओझं', 'फुलाची गोष्ट', 'मैत्री', 'खेळ', 'साखळी', 'आदम', 'चक्र', 'वीज' आणि 'वनवास' ही शीर्षककथा त्यांच्या पहिल्या कथासंग्रहात प्रसिद्ध झाल्या आहेत. तर विविध कलागुणांचे उपजत देणे लाभलेल्या, महाराष्ट्र-कर्नाटक सीमेवरल्या एका सुंदर गावात वाढणाऱ्या मुलाचं, 'वनवास' मध्ये उघडत गेलेले हे भावविश्व 'शारदा संगीत', 'पंखा' आणि त्यानंतर प्रसिद्ध होणाऱ्या 'झुंबर' या संग्रहात नुसते विस्तारत जात नाही, तर त्याच्या 'लंपन'च्या जाणिवेच्या एका विशिष्ट टप्प्यापर्यंत येऊन पोचते. प्रकाश संत हे केवळ भूगर्भशास्त्रज्ञ नाहीत, तर ते इंदिरा संत आणि ना. म. संत यांचा साहित्य-संगीत-कला यांचा समृद्ध वारसा लाभलेले व स्वत: चित्रकार, संगीतज्ञ, मराठी-इंग्रजी वाङ्मयाचे मर्मज्ञ अभ्यासक, क्रिकेट, टेबलटेनिस, बुद्धिबळ इत्यादी मैदानी व बौद्धिक खेळात रस घेणारे आहेत. त्यांच्या विविध ध्यासांच्या, छंदांच्या व्यासंगाचे गहिरे रंग त्यांच्या या तिन्ही कथासंग्रहातील ललितलेखनात उतरलेले दिसतात. अशा एकूण चार कथासंग्रहातून उघडत जाणाऱ्या लंपनच्या विशिष्ट पर्वातील भावविश्वासमवेत, कर्नाटक आणि महाराष्ट्राच्या सीमेवरील बेळगाव, तेथील निसर्ग, माणसे, प्राणी आणि त्याचा आप्त परिवार यांचे व्यापक आणि व्यामिश्र दर्शन घडते. तिथल्या प्रादेशिक वातावरणाला वेढून राहिलेला व कानडीची चाल लाभलेला मराठीचा गोडवा तेथे भरून राहतो.

'वनवास'च्या प्रस्तावनेतच या लेखनामागची कथाकाराची मन:प्रवृत्ती स्पष्ट होते. " 'वनवास' हा खऱ्या अर्थाने आनंदवासच असतो, असं मला नेहमीच वाटत आलेलं आहे," असं तो म्हणतो.

'लंपन' हा मुलगा चोखंदळ असून सृजनशील मन असलेला मनस्वी आहे. जीवनानुभवांकडे पाहण्याची त्याची अशी एक स्वतंत्र दृष्टी आहे. या दृष्टीचा अंदाज 'वनवास' कथासंग्रहातील कथांची जी शीर्षके दिली आहेत, उदा. 'वनवास', 'ओझं', 'वीज', 'आदम', 'फुलांची गोष्ट' इत्यादी शीर्षकांवरून येतो. मराठी कथेत आजवर आलेल्या 'गोट्या', 'चंदू', 'चिंगी',

'वसंता', 'राघू, मैना, साळू' इ. बाल-व्यक्तिरेखांपेक्षा 'लंपन' वेगळा आहे. या कथांमधून वरील नायकांसारखे, सरळसोट, भाबडे व थोडेसे धक्कादायक व निराळे व्यक्तिचित्रण आलेले नसून स्वत: लंपन, त्याचे घर — कुटुंबीय, आई, बाबा, आजी, आजोबा, भावंडे, बालमैत्रिण सुमी आणि परळ्या- कणब्यासारखे मित्र यांचेही व्यक्तिरेखाटन एका अनोख्या चित्रशैलीत आणि भाषेत आले आहे. पुन्हा 'पुलं'च्याच शब्दात सांगावयाचे झाले तर "लंप्याच्या भाषेत सांगायचं म्हणजे 'एकदा नाही, दोनदा नाही तर अठ्ठावीसशे तीस वेळा जरी ह्या कथा मॅडसारख्या वाचल्या तरी ताज्याच वाटतील', नव्हे वाटतातच."

'लंपन' हा असाधारण मुलगा आहे. त्याच्या वयोगटाला साजेसे असे परिकथांचे आकर्षण, साहसकथांची ओढ, समवयस्क मैत्रिणींविषयीचे अबोध गूढ कुतूहल आहेच. अबोध लैंगिक जाणिवाही आहेत. 'वनवास', 'वीज', 'अर्थ'सारख्या कथेतून 'लंपन'ने केलेले सुमीचे वर्णन या पौंगडावस्थेतील त्याच्या अज्ञात अनोख्या लैंगिक जाणिवांची ओळख करून देते. सुमीची नुसती आठवण आली तरी त्याच्या पोटात काहीतरी गडबड होते. ह्या वयाच्या अवस्थेला 'emotional-sickness' असे म्हटले जाते, त्याचे सहज दर्शन येथे घडविले जाते आणि तेही भावुक होऊन नव्हे, तर सुंदर, अलिप्त, तटस्थ पातळीवरून. जणू पौंगडावस्थेतील वयाचा मॅडनेस अंगात मुरवून लिहिण्यात लंपन आणि पर्यायाने प्रकाश संत दोघेही यशस्वी झाले आहेत.

पण त्याबरोबरच एकटेपणाचा शोध घेणारा, त्याच्या वयाच्या सर्वसाधारण किशोरकुमारवयीन मुलांना न जाणवणाऱ्या जीवनानुभवांचा शोधही या कथांत आहे. या अनुभवांचे स्वरूप साधे, सरळ आणि सुटसुटीत नाही. बालजीवनाच्या निर्भर आनंदाच्या शोधाबरोबरच लहान वयातही येऊन आदळणाऱ्या अनाकलनीय, गूढ अबोध अनुभवांचेही मानसशास्त्रीय पातळीवर विश्लेषण करण्याचा प्रयत्नही आहे. 'वनवास' हे केवळ साहित्यिक दृष्टीनेच नव्हे, तर सामाजिक आणि मनोवैज्ञानिक दृष्टीनेही अभ्यसनीय पुस्तक आहे.

'लंपन'सारख्या स्वतंत्र व्यक्तित्त्व, दृष्टी आणि प्रतिभा असणाऱ्या कुमार मनाच्या विकास-प्रक्रियेत कोणते अडथळे येऊ शकतात, त्याचे स्वयंभू व उत्स्फूर्त दर्शन 'वनवास' हा कथासंग्रह घडवतो.

'शारदासंगीत' हा संतांचा दुसरा कथासंग्रह आहे. या कथासंग्रहातील परचक्र, आगगाडीच्या रूळांवर, रानी का बाग, घसरगुंडी, शारदासंगीत या कथांमधून लंपनची जीवनानुभवाकडे पाहण्याची विकसित दृष्टी दिसते. या सर्व कथा बालमनाच्या एका कुमारवयीन मुलाच्या जीवनानुभवावर आधारलेल्या असूनही काहीशा प्रतिकात्मक आहेत. त्यात दडलेल्या रूपकात्मक प्रतिभेचा अभ्यास करण्याजोगा आहे.

आपल्या ठायी असलेल्या सुप्त कल्पनाशक्तीची आणि आपल्याजवळ असणाऱ्या शब्दभांडाराची जाणीव लंपनला येथे तीव्रतेने होताना दिसते. कोणत्याही लहान खेळण्याशी लहान मुले जशी काही काळ खेळत राहतात, तसा हा लंपन आपल्यातील या सुप्त शक्तीशी खेळत राहतो. उदा. 'रानी का बाग' या लेखनातील क्रिकेट ग्राऊंडचे त्याने केलेले वर्णन हा

एक भावनिक भूगोल (emotional geography) चा सुंदर नमुना आहे. मैदानाच्या भौगोलिक परिसराचा आत्मा क्रिकेट खेळण्यासाठी तयार केलेल्या पीचमध्ये आहे, हे त्याने बरेच फिरवून फिरवून सांगितले आहे.

संतांच्या कथांचे आणि त्यातील बालानुभवांचे, त्यांच्या निवेदनाचे स्वरूपही इतर बालकथा किंवा बालमानसकथांतील अनुभवांच्या निवेदनासारखे नाही. कारण 'लंपन'च्या निवेदनाचे स्वरूपच निराळे आहे. यात प्रसंग, घटना आहेत; पण त्यातून आरंभ-मध्य-शेवट यांची गाठ घालणारी गोष्ट निर्माण होत नाही; तर त्यातून एक अनुभवांची उतरंड दिसते. या लेखनातून कथात्मक अनुभव शोधणारांची निराशाच होईल. मुळात संताच्या या लेखनाला कथालेखन म्हणता येणार नाही असे एक व्यासंगी समीक्षक अविनाश सप्रे यांचे मत आहे.

पण संतांच्या या लेखनाला कथा प्रकारात समाविष्ट करावेसे वाटते. कारण या ललितलेखनाचे स्वरूप ललित-निबंधात्मक नाही आणि 'कथा' नसलेल्या कथेची परंपरा मराठीत गंगाधर गाडगीळांपासून सुरू झालेली आहे व अनेक कथाकारांनी या नव्या आकृतिबंधाचे अनुसरणही केले आहे.

'शारदासंगीत'मधील निवेदनाविषयी स्वत: प्रकाश संत सांगतात, '' 'वनवास'मधील लंपन या संवेदनशील मुलाच्या घरावाहेरील विश्वाचा थोडासा पुढचा भाग 'शारदासंगीत'मध्ये दिसेल.

''नाद, गंध, रंग आणि स्पर्श अशा विविध माध्यमांतून त्या वयाच्या मुलाच्या नव्या कोऱ्या मनाला भिडणारे हे पहिले-वहिले अनुभव, आणि त्यातून उमटणारी अतिसूक्ष्म संवेदनांची ती धावती वलयं. मनात खोल कुठंतरी झिरपून राहिलेलं हे सर्व कधीतरी अचानकच उफाळून आलं आणि येतच राहिलं. त्याच्या स्वत:च्याच अशा गतीनं माझ्या मनात चित्तवृत्ती उल्हसित करणारी एक स्पष्ट अशी गुंज सुरू झाल्यासारखी झाली.

सरस्वतीच्या हातात कायम दिसणाऱ्या त्या वीणेचा आवाज कसा असेल, हा एक मला लहानपणी सतावणारा प्रश्न होता.'' (प्रस्तावना : पृ. ८)

'शारदासंगीत' या कथेत आपल्याला ऐकू येणारी ती गुंज सरस्वतीच्या वीणा झंकाराच्या जवळपास जाणारी आहे, असे लेखकाला वाटते. ती गुंज शब्दांत पकडणं, तिची सरगम करणं तसा कठीण प्रयत्न असूनही तो संतांनी 'शारदासंगीत'मध्ये केला आहे. लंपनला न समजणाऱ्या पण भावणाऱ्या शारदेच्या संगीताने आपलं जीवन व्यापून राहिलं आहे, असं सतत जाणवत राहतं. तो त्याला मिळालेला आशीर्वाद आहे, अशीही त्यांची धारणा आहे. याच कथेत बिहाग रागाबद्दलच्या भावना लंपननं एका ठिकाणी सांगितल्या आहेत. उदा. 'खूप रंगीबेरंगी पक्षी एकदम कुणीतरी आकाशात मोकळे करून सोडले आहेत आणि सोनेरी उन्हात चमकत ते गिरक्याच गिरक्या घेत आहेत, असं काहीतरी मला तो राग ऐकताना वाटतं.' लंपनची ही विशिष्ट भावावस्था आपल्या चित्रशैलीत प्रकट करण्यात प्रकाश संत यशस्वी झाले आहेत. त्याचं आपल्या जीवनावरचं भाष्यच येथे तो सांगत आहे. 'लंपन'ची चित्तवृत्ती उल्हसित करणारी गुंज, तिची सरगम करण्यात लेखक निश्चितच यशस्वी झाला आहे.

या साऱ्या अनुभव-निवेदनाचं वैशिष्ट्य हे की, जाणकार रसिक वाचकांना लंपूच्या

भावविश्वातल्या सगळ्या व्यक्तिरेखांशी आपलं नातं कुठंतरी जुळतंय, असं प्रकर्षानं जाणवतं.

'लंपन'च्या शारदा संगीताचे आणि पेटीवादनाचे, स्वरांचे वाचकांच्या मनात उठलेले, निर्माण झालेले स्वरांचे, नादांचे आणि लयींचे तरंग चालू राहतात. किशोर-कुमारवयीन संस्कार संपन्न मनोव्यापारांविषयी प्रकाश संतांना सतत जाणवत राहणारे कुतूहल आणि त्यातून एका कलात्मक तटस्थ पातळीवरून मिळणारा आत्मप्रत्ययाचा निर्भर, निरागस आनंद हे या कथालेखनाचे मुख्य सूत्र आहे.

या कथासंग्रहात 'वनवास'मधील सुमी दिसत नाही. त्या ऐवजी हिरा, सोना, कुसुम गुंजीकर या मुली येतात. रघुनाथ कोरांटे आणि कुसुम गुंजीकर यांचे प्रेमप्रकरण लंपनला समजले तरी या प्रेमप्रवासाची सगळी गुंतागुंत लंपनच्या आजीप्रमाणे त्याला उकलतेच असे नाही. तरीही तो त्या एकूण प्रकरणात चांगलाच रस घेतो. हेही पौंगडावस्थेत त्याला जाणवणाऱ्या लैंगिक जाणिवांविषयीच्या त्याच्या आकर्षणाशी सुसंगत वाटते.

प्रकाश नारायण संत यांचा 'पंखा' चढत्या श्रेणीचे श्रेय घेणारा ठरला आहे, याची काही खास कारणे आहेत. 'वनवास' आणि 'शारदासंगीत' या संग्रहातील 'लंपन' येथे आणखी मोठा झाला आहे. त्याची त्याच्या भोवताली घडत असलेल्या घटना - प्रसंगांची दाद घेण्याची - जीवनानुभवांचे आकलन करून घेण्याची पद्धतच निराळी आहे. दोन्ही कथासंग्रहातील त्याच्या अनुभवांपेक्षा या संग्रहातील 'लंपन'ची जीवनानुभवांना भिडण्याची पद्धत निराळी आहे. या कथासंग्रहातील 'पान'ही आठ पानांची कथा आहे, तर सर्वात मोठी कथा 'पंखा' ही पंचवीस पृष्ठांची आहे. 'शारदासंगीत'मध्ये हरवलेली सुमी येथे 'पान' या कथेत पुन्हा भेटते. या कथेतील सुमी ही 'लंपन'च्या पौगंडावस्थेतील सुप्त आणि अबोध लैंगिक जाणिवांचे एक सुरेख प्रतीक आहे.

'पंखा'चे मुखपृष्ठ अतिशय बोलके आहे. 'पान', 'सफाई', 'डग', 'पॅच', 'शोध', 'नाणं', 'फूल', 'झांज', 'पाहुण्या' , 'पंखा' आणि 'ग्रंथ' या सर्व कथांना जुनुका देशपांडे, चंद्रमोहन कुलकर्णी आणि स्वत: प्रकाश संत यांची लाभलेली रेखाटने लेखकाच्या चित्रशैलीला एक विशिष्ट गती देतात. कथेचे निवेदन आणि वातावरणनिर्मिती अधिक बोलकी, परिणामकारक, आणि प्रवाही होण्यास या रेखाटनांची मदत झाली आहे. प्रत्येक लेखातील मध्यवर्ती व्यक्तिरेखा 'लंपन'ची असली तरी प्रत्येक कथेत त्याच्या अवतीभोवती वावरत असलेल्या व्यक्तींच्या हालचालींचा, मनोव्यापारांचा आपल्या विशिष्ट पद्धतीने वेध घेण्याचा 'लंपन'चा प्रयत्न चालूच असतो. काहींचा अर्थ लंपनला कळतो. काहींचा अर्धवट तर काही अनुभव त्याच्या डोक्यावरून जातात; पण त्यातून निर्माण होणाऱ्या भावनिक संघर्षाचे आणि हास्य, अद्‌भुत, करुण, आश्चर्य, वात्सल्य, शृंगार अशा अनेक रसपरिपूर्ण भावनांच्या रंगच्छटा स्वाभाविकपणे पेरल्या जातात. वरवर साधे वाटणारे हे अनुभव गुंतागुंतीचे आणि व्यामिश्र असूनही ते समजण्याची 'लंपन'ची धडपड चालूच असते. उदा. 'डग' या कथेत दुंडाप्पा टांगेवाल्याच्या लालासाहेब घोड्याच्या तवेल्याचे वर्णन करताना लंपन म्हणतो, ''खोगीर, त्या खालच्या गाद्या, चामड्याचे पट्टे, घुंगूर, नालांच्या माळा, रंगीत पिसांचे तुरे, पाठीवर पांघरायची रंगीबेरंगी चादर, डोळ्यांवर

लावायची कातडी झापडी, काचमण्यांच्या माळा, घंटा, तोबऱ्याची पिशवी, काय काय बरंच सामान होतं तिथं.

"मला नेहमी वाटतं, हे सामान लालासाहेबांचं म्हणजे काय ?"

"लालासाहेबासारखे घोडे माणसाळायच्या आधी मोठमोठ्या हिरवेगार कुरणात राहायचे. त्याआधी जिथं माणूस नव्हताच मग हे सगळं सामान कुठं असणार ? आजी म्हणते तसे ते सगळे सडेफटिंग असणार. आता एवढं सामान गोळा झालंय ते लालासाहेबानं कुठं गोळा केलंय ? मग ते सामान म्हणजे लालासाहेबांवरचा जुलूमच." इत्यादी (पंखा)

'सफाई' कथेमध्ये 'लंपन'च्या घरातील बाबूराव आचारी पद्मावती नावाच्या सुंदर पण बनेल बाईच्या नादी लागतो. त्यातून संपूर्ण कथेत घडलेल्या प्रसंग-घटनांचे वर्णन येते. शेवटी 'लंपन'चे आजोबा त्याचे अपराध पोटात घेऊन त्याला क्षमा करतात. 'पॅच' या कथेची सुरुवात 'लंपन'च्या सायकल-पर्यटनाच्या अद्भुत वर्णनाने होते, पण कासार-गोड-एल्सा चे प्रेमप्रकरण आणि 'लंपन'च्या आजीची मध्यस्थी, हे या कथेचे मुख्य सूत्र आहे. मानवी जीवनातील गिचमिडीपेक्षा गुंतागुंतीकडे, त्यातील जीवघेण्या जाणिवांकडेही प्रकाश संतांचे लक्ष जाते. 'साखळी'मध्ये सुमीच्या गळ्यातल्या हरवलेल्या साखळीमुळे निर्माण झालेल्या परिस्थितीचे वर्णन आहे. कुमारवयीन मुला-मुलींचे भावनिक मानसविश्व येथे येते.

'पंखा' या कथासंग्रहात 'निर्मिती'पासून मृत्यूपर्यंतच्या सर्व जीवनानुभूतींचे 'लंपन'ला जाणवलेल्या स्वरूपाचे वर्णन आलेले आहे. 'लंपन'च्या भाषेत बोलायचे तर सत्तावीसशे तेवीस वळणे घेणारा प्रवास 'ग्रंथ' आणि 'पंखा' या कथांतून ग्रथित झाला आहे. 'माणसा'तला माणूस शोधणारा हा एक वेगळाच प्रयत्न आहे.

प्रकाश संत यांच्या कथेने मराठी आणि कन्नड या दोन भाषांना जोडणारी एक नवी 'सीमावर्ती' निवेदनपद्धती मराठी कथेत आणलेली आहे. प्रादेशिकता, निसर्ग, कौटुंबिक परिसर, मित्रपरिवार, बालमानसिकता, एवढेच नव्हे तर क्रिकेटचे मैदान, रेल्वेरूळ, ग्रंथालय तसेच 'शारदासंगीत' यांनी युक्त अशा अनोख्या जिवंत विश्वाचे नवे योगदान मराठी कथावाङ्मयाला दिले आहे, असे म्हणता येईल. ■

प्रा. डॉ. अ. श्री. भडकमकर
८२/३, बसेरा हौसिंग कॉम्प्लेक्स, सिल्व्हासा ३९६२३० (दादरा-नगरहवेली)

## स्वागत

**सुरावटींच्या सहवासात :** कमलाकर कदम, प्रतीक्षा प्रकाशन, पुणे.
**ख्रिस्ती लोकहितवादी :** सुधीर आढाव, प्रबोधन प्रकाशन, नागपूर.
**तिसऱ्या बिंदूच्या शोधात :** तारा भवाळकर, सुगावा प्रकाशन, पुणे.
**सत्यशोध :** अनुप गोसावी, सुगावा प्रकाशन, पुणे.
**मराठी नियतकालिकांची सूची :** संपा. वसंत भिकाजी बेलसरे, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय.
**पसायदान :** म. चिं. देशमुख, प्रकाशक स्वतः लेखक, अहमदनगर.
**मराठीचे भवितव्य :** संपा. अविनाश आवलगावकर व मृणालिनी शहा, मानसन्मान प्रकाशन, पुणे.

# ‘करुणाष्टकां’तील करुणेचे मूळ नेमके कशात?

❑

प्रा. डॉ. यशवंत साधु

❑

समर्थांची करुणाष्टके हा श्रद्धाळू मनासाठी एक अमोल असा ठेवा आहे. संसारतापाने तप्त झालेल्या जीवासाठी करुणाष्टके म्हणजे शीतल, शांत चंद्रकिरणेच होत. अशा या लोकप्रिय व मौलिक काव्यरचनेची सर्वांगीण समीक्षा मराठी संतसाहित्यसमीक्षेत यापूर्वी झाली नव्हती. ती उणीव डॉ. सुहासिनी इर्लेकर यांनी ‘समर्थ रामदासांची करुणाष्टके’ हा ग्रंथ लिहून पूर्ण केली आहे. त्याबद्दल त्यांचे मन:पूर्वक अभिनंदन!

करुणाष्टकात समर्थांनी व्यक्त केलेला भाव लक्षात घेता ही रचना रामदासांच्या एकाकी, साधक व मुमुक्षू अवस्थेत निर्माण झाली असावी, असे वाटते. रामदासांनी म्हणजेच नारायणाने वयाच्या बाराव्या वर्षी गृहत्याग केला आणि ते नाशिक पंचवटी येथे आले. लहान वयात परमेश्वरप्राप्तीच्या ओढीमुळे रामदासांच्या जीवनात जे कारुण्य निर्माण झाले, त्याचे पडसाद त्यांच्या करुणाष्टकांत ऐकू येतात. भक्ती नाही, ज्ञान नाही, वैराग्य नाही, आजूबाजूस कुणी ओळखत नाही, कुणी जवळ करीत नाही तरीपण रामाच्या भेटीसाठी रामदासांचे मन तळमळते. ही तळमळ करुणाष्टकातील मुख्य जाणीव आहे, असे कुणालाही वाटेल. कोवळ्या वयात आईचे प्रेम, खेळगड्यांची सोबत टाकून घरापासून, गावापासून दूर अनोळखी ठिकाणी आलेल्या नारायणास कोणत्या प्रवृत्तीशी झगडावे लागले आणि त्या संघर्षात त्यांच्या शरीराची व मनाची कशी छिन्नभिन्न अवस्था झाली, याचे हृदयद्रावक चित्रण रामदासांच्या करुणाष्टकांत आले आहे. असे असताना डॉ. इर्लेकर यांना मात्र रामदासांच्या करुणाष्टकांतील करुणेचे मूळ वेगळ्या परिस्थितीत आढळते.

डॉ. सुहासिनी इर्लेकर यांच्या मते करुणाष्टकांतील करुणेचा उगम समर्थांच्या उत्तरायुष्यातील वैफल्यग्रस्त अनुभवात आहे, असे लक्षात येते. विशेषत: शिवाजी महाराजांच्या मृत्यूमुळे रामदासांना जो धक्का बसला आणि जगण्याची व्यर्थता वाटू लागली, त्यात करुणाष्टकांचा उगम आहे, असे डॉ. इर्लेकरांना वाटते. करुणाष्टकांच्या निर्मितीचा संबंध रामदासांच्या साधकावस्थेशी नसून, त्यांच्या प्रगल्भ परिपक्व अवस्थेशी करुणाष्टकांचा खरा संबंध आहे. आध्यात्मिक जाणिवेतून करुणाष्टके निर्माण झाली नसून राजकारणातील विमनस्क अनुभवातून करुणाष्टकांची निर्मिती झाली, असा डॉ. इर्लेकर यांच्या म्हणण्याचा इत्यर्थ आहे.

### करुणाष्टकांची निर्मिती समर्थांच्या कोवळ्या वयात

रामदासांच्या सर्व साहित्याचे वैशिष्ट्य म्हणजे त्यात कोठेही कालोल्लेख आढळत नाही. बहुतेक जुने कवी आपल्या ग्रंथाच्या शेवटी त्या ग्रंथाचा निर्मितीकाळ लिहून ठेवतात. ‘विवेक-

सिंधू', 'ज्ञानेश्वरी', 'एकनाथी भागवत' या ग्रंथांचे शेवटी कालोल्लेख आढळतो. तसा तो रामदासांच्या एकाही रचनेत आढळत नाही. त्यामुळे रामदासांनी कोणती रचना केव्हा केली, याचा कोणताही पुरावा नाही. करुणाष्टकांची ही रचना रामदासांनी केव्हा केली, याचाही पुरावा नाही. त्यामुळेच त्यांच्या निर्मितीविषयी अनेक तर्क करण्यास वाव प्राप्त झाला आहे. 'पुरावा नसला तरी मन असे सांगते की, ही अष्टके समर्थांनी समर्थ होण्यापूर्वी म्हणजे नाशिक पंचवटीत पुरश्चरण चालू असताना केलेली असावी. कारण त्यात एक प्रकारची अगतिकता आहे व ही वृत्ती समर्थ वयाच्या ३६ व्या वर्षी कृष्णातीरी येऊन स्थिर झाल्यानंतर पुढे कधीही त्यांना शिवली नाही. उलट पंचवटीतील तत्पूर्व साधकावस्थेत अगतिक होऊन अंतर्मुख होण्याचे कितीतरी प्रसंग त्यांनी अनुभवले असतील. साधकावस्थेतील ही तळमळ करुणाष्टकांतून व्यक्त झाली आहे, हे पाहिले म्हणजे त्यांचा रचनाकाळ शके १५४७ ते १५५२ असा ठरतो,' हा डॉ. शं. गो. तुळपुळे ('पाच संतकवी' : पृष्ठ ४०९-४१०) यांचा अभिप्राय पाहता समर्थांच्या करुणाष्टकांतील करुणेचे मूळ त्यांच्या कोवळ्या वयातील साधकावस्थेत आहे, हेच सिद्ध होते आणि तशी वस्तुस्थितीही आहे. कारण करुणाष्टकांतील प्रत्येक उद्गार रामाला उद्देशून असतो. त्यातील प्रत्येक वेदना श्रीरामाच्या वियोग भावनेतून व्यक्त होते. आपल्या परमार्थातील उणिवा लक्षात आल्यामुळे जे दु:ख नामदेव महाराजांना होते, तेच दु:ख रामदासांनाही होते. संसारदु:खाची दाहक जाणीव जशी तुकाराम महाराजांना होते, तशीच ती रामदासांनाही होते.

या संदर्भात संतसाहित्याचे एक साक्षेपी अभ्यासक डॉ. वि. रा. करंदीकर यांनी 'तुझा दास मी व्यर्थ जन्मास आलो' या करुणाष्टकांवर केलेले भाष्य विचारात घेण्यासारखे आहे. ('साक्षेप समर्थांचा' या ग्रंथात पृ. २० वर) डॉ. वि. रा. करंदीकर लिहितात — नारायणाच्या घरात पूर्वापार श्रीरामचंद्राची उपासना चालत आली होती. श्रीरामचंद्राचं स्थान म्हणून नाशिकची असलेली कीर्ती त्यानं ऐकलेली असणार आणि त्यामुळे घरातून बाहेर पडल्यावर तो थेट नाशिकला आला. ईश्वरप्राप्तीसाठी साधना करायची, एवढे मनाशी ठरले होते. पण नारायणाला कोणीही मार्गदर्शक नव्हता...

अनेक मोठमोठ्या भक्तांच्या कथा नारायणाच्या कानावर पडत. कुणी तीर्थस्थानी वास करून राहिलेले तर कुणी गिरिकंदरामध्ये घनदाट अरण्यात राहून तपश्चर्या करणारे. असे साधक केवळ एकातंवासात राहात आणि वर्षानुवर्षे त्यांची तपश्चर्या चालू राहिलेली असे.... आपण काही धडपड करतो आहोत हे खरे, पण हे सारे फार फार बेताचेच आहे, असे नारायणाला एकसारखे वाटत राहते. भक्तांशी मी माझी तुलना करून पाहतो आणि मनात येते की, 'आपले हे जिणं व्यर्थ आहे.' रामदास उद्गारतात, 'तुझा दास मी व्यर्थ जन्मास आलो!' डॉ. वि. रा. करंदीकरांच्या या स्पष्टीकरणातून करुणाष्टकांतील भाव समर्थांच्या कोवळ्या वयातील साधनेच्या द्विधा मन:स्थितीतील आहे, हेच सिद्ध होते. करुणाष्टकांतील उदासीनतेचा संबंधही नारायणाच्या एकाकी जीवनाशी अधिक जवळचा आहे. संतांच्या वियोगामुळे रामदासांना एकाकी वाटते. हा एकाकीपणा वाढत जाऊन त्यातूनच भयाण उदासीनतेचे दु:ख श्लोकरूप धारण करते. पण डॉ. सुहासिनी इर्लेकरांना 'समर्थांच्या करुणाष्टकांतील उदासीनतेचे मूळ असे लोकोद्धारार्थ

वेचलेले आयुष्य व्यर्थ गेल्याच्या शोकात्म जाणिवेत आहे' असे वाटते. पण आपल्या या विधानासाठी डॉ. इर्लेकर यांनी करुणाष्टकातला कोणताही आधार दिला नाही. समर्थांनी राष्ट्रनिर्मितीच्या कार्यासाठी सर्व आयुष्य वेचले. त्यासाठी त्यांनी लोकशक्तीला आवाहन केले, याबद्दल कुणाचेच दुमत होणार नाही. लोकशिक्षक या नात्याने रामदासांनी 'ओवीशते', 'जनस्वभाव-गोसावी' यासारख्या स्फुट प्रकरणातून लोकांना अनेक गोष्टींची शिकवण दिली. दासबोधाच्या अनेक समासांतून मानवी कुरुपतेवर रामदासांनी प्रकाश टाकला आणि आदर्श माणसाचे चित्र समाजासमोर उभे केले. राष्ट्रनिर्मितीच्या कार्याची खरी सुरुवात समर्थांनी इ. स. १६४४ मध्ये चाफळ येथे सुरू केली. पण त्यापूर्वी २४ वर्षे रामदासांनी लोकस्वभावाचा जवळून अनुभव घेतला. करुणाष्टकांतही या लोकस्वभावाची चित्रणे विखुरली आहेत.

रामदासांना लोकांच्या वागण्याचा वीट आला होता. लोकांची मर्जी राखणे, त्यांच्यासारखे बोलणे, त्यांची मनधरणी करणे आवडत नव्हते. लोकांचे प्रेम केवळ वैभवसुख यापुरतेच. विषम परिस्थितीत कोण कुणाचे ? या लोकांच्या अनुभवाला रामदास विटले आहेत. आपल्या एकाकी अवस्थेत लोकांनी मदत करणे तर दूरच राहिले, उलट लोक आपल्या कलंदर वृत्तीला हसतात, याचे रामदासांना लहानपणी वाईट वाटत असे, खूपदा उदास वाटत असे. या विषण्ण मन:स्थितीत रामाची भेट केव्हा होईल, याबद्दल तळमळ वाटत असे. हाच निष्कर्ष करुणाष्टकांतील रचनांतून निघतो. लोकोद्धारासाठी प्रवृत्त झालेल्या रामदासांचा उदय अजून झालेला नाही. करुणाष्टकांत आपले दु:ख कथन करणारा १३-१४ वर्षांचा नारायण सूर्याजी ठोसर आपणास दिसतो. नारायणाचा रामदास व रामदासाचा समर्थ रामदास प्रगट हातो तो इ. स. १६४४ मध्ये. तेथून त्यांचे खरे राष्ट्रनिर्मितीचे कार्य सुरू होते. करुणाष्टकांत कुठेही आपण जनउद्धाराच्या कार्यात काय मिळवीत आहोत आणि काय हरवत आहोत, या जाणीवेने रामदासांचे मन पोखरत असल्याचे जाणवत नाही.

## समर्थांचे स्वप्न भंग पावले ?

डॉ. सुहासिनी इर्लेकर यांनी करुणाष्टकांतील अनुतापाच्या मुळाशी समर्थांचा स्वप्न भंग झाल्याचे दु:ख आहे, असे अनेकवेळा म्हटले आहे. विशेषत: शिवाजी राजे कालवश झाले, त्यांची जागा घेणारे भव्य व्यक्तिमत्त्व अस्तित्वातच नव्हते. त्यामुळे रामदासांचे मन हादरले, उद्ध्वस्त झाले. त्यांच्या दृष्टिपुढेच त्यांची स्वप्नसृष्टी भंग पावली. रामदासांच्या मूळ वैराग्यवृत्तीला पुन्हा एकदा अखेरचीच जाग आली आणि शोक श्लोकरूप पावला. त्यांच्या अंतिम प्रार्थनेला प्रारंभ झाला. ती प्रार्थना म्हणजेच करुणाष्टके, असे डॉ. इर्लेकर यांनी सुचविले आहे. डॉ. इर्लेकर यांच्या म्हणण्यात मुळीत तथ्य नाही, असे नाही. कारण समर्थांच्या सर्व चरित्रकारांनी रामदासांच्या अखेरच्या दिवसांचे हृदयद्रावक वर्णन केले आहे. शिवाजी महाराजांच्या निधनाचे स्वामींना सज्जनगडावर समजताच कित्येक दिवस ते अन्नपाणी वर्ज्य करून एकांतात राहिले. पुढे पुढे तर ते फक्त दुधावरच राहिले. समर्थांचे ठिकाणी हळूहळू निशक्तपणा येऊ लागला. शिवाजीचे देहावसान होण्यापूर्वी काही दिवस अगोदरच शिवाजी रामदासांना भेटून गेले होते

आणि अचानकच शिवाजीच्या निधनाचे वृत्त स्वामींना समजले. त्यामुळे रामदासांना धक्का बसला. त्या दु:खात भर म्हणजे संभाजीने शिवाजीच्या एकनिष्ठ सेवकांना निर्दयपणे मारून टाकले. याचे समर्थांना अतिशय वाईट वाटले. संभाजीला उपदेश करण्यासाठी रामदासांनी 'अखंड सावधान असावे' हे प्रसिद्ध पत्रात्मक काव्य लिहिले. चाफळास जाऊन श्रीरामाचे शेवटचे दर्शन घेतले. शके १६०३ च्या रामनवमीस समर्थ चाफळास होते. ती त्यांची आयुष्यातील शेवटची रामनवमी. त्यांनी सारे चाफळ खोरे हिंडून पाहिले. जुन्या आठवणींनी समर्थांचे मन भरून आले. देहविसर्जनाची कल्पना मनाला चाटून गेली. सारे पूर्वचरित्र आठवले. त्या आठवणींतूनच काही उद्‌गार बाहेर पडले, तेच करुणाष्टकांतील तिसरे अष्टक होय —

*'हिणाहून मी हीण जैसा भिकारी ।*
*दिनाहून मी दीन नाना विकारी ।*
*पतीतासि रे आणि हाती धरावे ।*
*समर्था तुझे काय उत्तीर्ण व्हावे ॥*

वयाच्या शेवटी-शेवटी आपले पूर्वचरित्र आठवून श्रीसमर्थ श्रीरामाच्या उपकारांचे या अष्टकात स्मरण करीत आहेत, हे उघड आहे. त्यात मागील काळाचा उल्लेख आहे. एवढेच नव्हे तर आपण कृतकृत्य झालो, असा भाव व्यक्त करून आता मोठ्या आनंदाने देहाचे विसर्जन करण्याची समर्थांनी तयारी दर्शविली आहे. अशा प्रकारचा भाव प्रस्तुत अष्टकात असल्याचे समर्थ साहित्याचे थोर उपासक श्री. शंकर श्रीकृष्ण देव यांनी म्हटले आहे. (श्री समर्थावतार : पृ. ४६१-४६२). प्रस्तुत करुणाष्टक डॉ. इर्लेकर यांच्या सदर पुस्तकात पृ. ७१ वर छापले आहे. पण त्याचा परामर्श घेताना त्याचा मूळ संदर्भ डॉ. इर्लेकर यांनी सोडून दिला आहे.

एवढ्या विस्ताराने लिहिण्याचे कारण असे की, शिवाजीच्या देहावसनानंतर समर्थांनी अतिशय कृतज्ञतेने, आनंदाने देहत्याग केला, हे लक्षात यावे. शिवाजी महाराजांच्या निर्याणाने समर्थांना धक्का बसला ही गोष्ट खरी आहे, पण त्यामुळे आपण आयुष्यभर राष्ट्रनिर्मितीचा जो प्रयत्न केला, तो असफल ठरला, असे रामदासांना कधीही वाटले नाही. राष्ट्रनिर्मितीच्या कार्यात समर्थांना शेवटी शेवटी निराशा व उदासीनता वाटली, असे कुठेही दिसत नाही. स्वराज्यस्थापनेच्या कार्यात ज्या लोकांशी संबंध आला, त्याचाही वीट आल्याचे समर्थांच्या अखेरच्या काळात कुठेही दिसत नाही. अशा स्थितीत शिवाजीच्या निधनाने रामदासांचे स्वप्न भंग पावले आणि त्या वेदनेतूनच करुणाष्टके निर्माण झाली, असे डॉ. इर्लेकर म्हणतात ते पूर्णपणे काल्पनिक, निराधार आहे.

आपल्या उच्चकोटीच्या अनुभूतीपासून जो खाली येतो, त्याचा रामदासांनी स्वत:च्या अशा खास शब्दशैलीत ('म्हैस मंगळू') धिक्कार केला आहे. रामदास म्हणजे असे लेचेपेचे भक्त नव्हते की, ज्यांची भक्ती स्वराज्यस्थापनेच्या कार्यातील अडथळ्यांमुळे संपुष्टात आली आणि त्या कार्यात निराशा आल्यामुळे ती करुणाष्टकांच्या रूपाने उफाळून आली. श्रीरामनिष्ठा हा रामदासांच्या जगण्याचा श्वासोच्छ्‌वास होता. या निष्ठेला बळकटी येण्यासाठी करुणाष्टकांची

निर्मिती झाली आहे. या जगातील कुठलीही उलथापालथ रामदासांच्याच काय, कोणत्याही संताच्या निष्ठेला दुभंगू शकत नाही. म्हणून करुणाष्टकांचे मूळ लोकोद्धारार्थ व स्वराज्यस्थापनेसाठी वेचलेले आयुष्य व्यर्थ गेल्याच्या शोकात्म जाणिवेत आहे, हे डॉ. इर्लेकर यांचे म्हणणे टिकणारे नाही.

'संतांची हे भेटी'मध्ये (पृ. १७८ वर)डॉ. मु. श्री. कानडे यांनी म्हटल्याप्रमाणे — 'रामदासांच्या व्यक्तिमत्त्वातील सारी भावोत्कटता त्यांच्या करुणाष्टकांतून करुणरसाची डूब दिलेल्या भक्तिरसाची परिसीमा झालेली आहे, याविषयी सर्व समीक्षकांचे एक मत आहे. गोदातीरी तप:साधना चालू असताना रामाच्या भेटीसाठी व्याकुळ झालेल्या रामदासांनी आपल्या भक्तिभावनेला याठिकाणी मुक्तपणे वाट करून दिली आहे. त्यांच्या हृदयातील भावनातरंग या करुणाष्टकांतूनच ओसंडून चाललेले दिसतात. १२व्या वर्षानंतर आरंभिलेल्या तपश्चरणाच्या काळात त्यांचे अंत:करण आपल्या उपास्य दैवताच्या भेटीसाठी अहर्निश तळमळत होते, याची साक्ष करुणाष्टकांत पदोपदी पटते. ही करुणामय अष्टके म्हणजे साधकावस्थेतील त्यांच्या आर्त मनाचे तितक्याच हळुवारपणे शब्दांकित झालेले आक्रंदनच आहे.'

डॉ. सुहासिनी इर्लेकर यांनी करुणाष्टकांची रचना रामदासांच्या अखेरच्या दिवसांत झाली, हे गृहित धरूनच त्याचे रसग्रहण केले आहे. त्यामुळे कुठलेही अनावश्यक, निराधार व काल्पनिक तपशील त्यांच्या विवेचनात आले आहेत. हे वगळल्यास रामदासांच्या करुणाष्टकांचे 'अंतरंग' उलगडून दाखविणारी डॉ. इर्लेकरांची चर्चा भावस्पर्शी आहे. उद्देशिका (ode) या गीतकाव्याशी करुणाष्टकांचे साम्य दाखविणाऱ्या डॉ. इर्लेकर यांचा प्रयत्न मननीय आहे. या निमित्ताने रामदास समकालीन संत तुकारामांचे अस्तित्व जमेस धरताना दिसत नाहीत, असे का व्हावे ? या प्रश्नाकडे विचारवंताचे लक्ष वेधावे, ही डॉ. इर्लेकर यांची अपेक्षा रास्त आहे. याही प्रश्नाचा विचार पुढे केव्हातरी करता येईल. तूर्त इतकेच . ■

प्रा. डॉ. यशवंत साधु

श्रीनगर कॉलनी, विदर रोड, ता. उदगीर, जि. लातूर. दूरध्वनी : ५५६७३.

---

**स्वागत**

**ग्रंथाली प्रकाशन, मुंबई, यांची प्रकाशने**

**शिलाहार कालीन नगरी 'दिवे आगार'** : निर्मला गोखले.

**आपत्कालीन यंत्रणा :** अ. पां. देशपांडे.

**कोवळी मने सावरणारे हात :** डॉ. अनुराधा सोवनी.

**प्रेरणा प्रकाशन, पुणे यांची प्रकाशने**

**त्या कोवळ्या फुलांच्या :** अनिल कांबळे

**प्राची :** शरद मान्नीकर

**आता तुझ्याचसाठी :** द. रा. दंडगे

**मी भारतीय आहे :** गोविंद झुजरवाड

---

# स्त्रीवाद आणि दलित साहित्य



डॉ. अनिल सपकाळ



पुरुषाने निर्माण केलेली सामाजिक व्यवस्था लिंगभावावर आधारित असून स्त्री ही पुरुषाच्या लैंगिक आणि दैहिक राजकारणाला बळी पडते. पुरुषाने निर्माण केलेल्या पुरुषी अधिभौतिक सत्तेने स्त्रीला सामाजिक, सांस्कृतिक, आर्थिक, राजकीय व्यवस्थांमध्ये दुय्यम स्थान दिलेले आहे. पुरुषाने आपल्या उपभोगतेसाठी स्त्रीचा वापर केला आहे. या जाणिवेतून स्त्रीवादी विचाराने पुरुषी राजकारणाला नकार दिलेला आहे. किंबहुना आपला विद्रोह प्रकट केलेला आहे.

पुरुष हा आवश्यक असणारा पूर्ण घटक असून स्त्री ही इतर, अनावश्यक अशी वस्तू आहे. स्त्रीला स्वत:चे व्यक्तिमत्त्व नाही या पुरुषाने निर्माण केलेल्या सांस्कृतिक वर्चस्ववादाला स्त्रीवादाने आव्हान दिलेले आहे. स्त्रीवादाच्या वैशिष्ट्यांसंदर्भात पुढील दोन मुद्दे कळीचे आहेत : (१) लिंगभेदामुळे स्त्रीच्या वाट्याला विषमता येते, (२) लिंगभाव हा शारीररचनेशी संबंधित नसून तो सामाजिक/सांस्कृतिक रचनेच्या आधारे घडलेला भाग असतो.

पुरुषी अधिभौतिक सत्तेने स्त्रियांना समाजव्यवस्थेतील सहभागाविषयी हेतूपुरस्सर बाजूला सारून निष्क्रिय म्हणून उल्लेखिले, या पुरुषी राजकारणाचा स्त्रीवाद धिक्कार करतो. हा धिक्कार करत असताना पुरुषाने निर्माण केलेल्या स्त्रीप्रतिमांचा स्त्रीवादी प्रणालीनुसार अन्वयार्थ लावतो आणि पुरुषांच्या लिंगाधिष्ठित राजकारणावर प्रकाश टाकतो. आपल्याकडील स्त्रीवादाने पाश्चात्य स्त्रीवादी विचारप्रणाली स्वीकारलेली असून त्या विचारप्रणालीबरहुकूम कृतिशीलता अंगीकारलेली आहे. ही कृतिशीलता संघटनात्मक पातळीवर प्रकट झालेली आहे. १९७५ नंतर बदलत्या राजकीय परिस्थितीनुसार आपल्याकडे स्त्रीवादी विचारधारेला वेगवेगळे कंगोरे निर्माण झालेले पाहावयास मिळतात. यातूनच भारतीय स्त्रीवादाची मांडणी केलेली दिसते. कुटुंबस्थित भारतीय स्त्रीवादाची संकल्पना 'स्त्रीपुरुष' या आपल्या ग्रंथात छाया दातार यांनी मांडलेली आहे. भारतीय स्त्रीवादाची मांडणी करताना जैविक लिंगभेद आणि सांस्कृतिक लिंगभेद नमूद करून अरुणा दुभाषी म्हणतात की, भारतीय समाजाने अजूनपर्यंत कुटुंबव्यवस्था टिकवली आहे. नजिकच्या काळात ती नष्ट होईल, असे वाटत नाही. आपण अजूनही कुटुंबाशी, समाजाशी स्वत:ला जोडून घेत समूहभावनेने जगत आहोत. साहजिकच भारतीय स्त्री ही कुटुंबसंस्थेत बांधलेली आहे. तिची सुटका व्हावयाची असेल तर कुटुंबसंस्था मोडण्याचा आणि नवे प्रश्न निर्माण करण्याचा मार्ग उचित ठरणार नाही. त्याऐवजी दैनंदिन कौटुंबिक जबाबदाऱ्यांतून स्त्रीला मुक्त कसे करता येईल, हा विचार करणे आवश्यक आहे. रोजच्या

स्वयंपाकाच्या आणि संगोपनाच्या जबाबदारीतून स्त्रीला मुक्त करण्याचे उपाय शोधावे लागतील. ते अंमलात यावेत म्हणून प्रयत्न करावे लागतील आणि यशस्वीपणे राबवावे लागतील. असे झाल्यास स्त्रीची शक्ती वेगळ्या कार्याच्या दिशेने वळवता येईल. अशा दिशेने आपण वाटचाल केली तर भारतीय स्त्रीवाद आकाराला येऊ शकेल, असा विश्वास वाटतो. (अरुणा दुभाषी, भारतीय स्त्रीवाद, (ग्रंथ) समीक्षेतील नव्या संकल्पना, संपा. डॉ. मनोहर जाधव, पृ. १५४) विविध विचारप्रवाहांच्या प्रभावांनुसार स्त्रीवादी विचारप्रवाहामध्ये वेगवेगळे संप्रदाय निर्माण झालेले पहावयास मिळतात. पाश्चिमात्य स्त्रीवादाच्या भारतीय पर्यावरणासंदर्भातील मर्यादा अनेकांनी मांडलेल्या आहेत. परंपरा टिकवून परिवर्तन साधण्याची विचारधारा भारतीय स्त्रीवादी चळवळीने आपल्या कृती आणि उक्तीतून स्वीकारली आहे, कुटुंबसंस्था ही जातिव्यवस्थेचा परिपाक आहे, ही वस्तुस्थिती स्त्रीवादी जाणीवपूर्वक नाकारतात. 'कुटुंबसंस्था ही योनिशुचितेचा पुरस्कार करते. कुटुंबसंस्थेने स्त्रीवादाला पारंपरिक विचारव्यूहामध्ये गुरफटून ठेवले आहे' हे स्पष्ट करताना अब्राह्मणी स्त्रीवादाची मांडणी प्रकट करताना प्रतिमा परदेशी आपल्या विवेचनात म्हणतात, 'योनिशुचितेच्या मूल्यांना घट्ट करण्यासाठी कुटुंबसंस्था कुटुंब नावाची संस्थात्मक संरचना उभी केली जाते. हे अब्राह्मणी स्त्रीवाद अधोरेखित करतो.' (प्रतिमा परदेशी, मार्क्स-फुले-आंबेडकरवाद आणि अब्राह्मणी स्त्रीवादी इतिहासलेखन, (ग्रंथ) अब्राह्मणी स्त्रीवादी इतिहासलेखनाच्या दिशेने, संपा. विद्युत भागवत, प्रतिमा परदेशी, पृ. ५०-५१)

भारतीय स्त्रीवादाने आणि स्त्रियांच्या चळवळीने दलित स्त्रियांच्या प्रश्नाला आपल्या पत्रिकेवर केव्हाच घेतले नाही, ही दलित स्त्रीवादी कार्यकर्त्यांची भूमिका आहे. दलित स्त्रियांना दलित चळवळीने तसेच प्रस्थापित स्त्रीवादी चळवळीने नाकारल्यामुळे त्यांनी स्वबळावर आपल्या विकासाचा मार्गक्रम आरंभला आहे. दलित स्त्रिया एका बाजूला दलित चळवळीचे ऋण मान्य करतात तर दुसऱ्या बाजूला ते ऋण नाकारतातही. दलित स्त्री कार्यकर्त्यांमध्ये द्वंद्वात्मक स्थिती आढळून येते. दलित चळवळ ही संकल्पना स्पष्ट करताना 'दलित या शब्दामध्येच दलित स्त्री आणि पुरुषांची मिळून संयुक्त चळवळ असा अर्थ अभिप्रेत आहे' अशी भूमिका 'धर्म आणि दलित स्त्री' या आपल्या लेखात मीनाक्षी मून घेतात. (दलित स्त्री अस्मितेचा आविष्कार व दिशा, पृ. १२) दलित चळवळीने स्त्रीविषयक स्वीकारलेली भगिनीभावाची भूमिका जशी स्वीकारली जाते, तशीच दलित चळवळीने दलित स्त्रीला स्त्री म्हणून अधोरेखित केले आहे, अशीही भूमिका घेतली जाते. भारतीय स्त्रीवादामध्ये स्त्रीचे होणारे शोषण स्त्री म्हणून अणि आर्थिकदृष्ट्या अवहेललेली म्हणून दुहेरी मानलेले आहे तर दलित स्त्रियांचं शोषण तिहेरी पातळीवरती होते, अशी भूमिका दलित स्त्रीवाद घेतो. 'पितृप्रधानता आणि दलित स्त्रियांचा संघर्ष' या आपल्या लेखात 'दलित स्त्रियांचे शोषण हे धार्मिक वर्ण व जातिव्यवस्थेने केलेले शोषण, पितृप्रधान कुटुंबव्यवस्थेने केलेले शोषण, आणि स्त्री म्हणून होणारे लिंगाधारित शोषण या तिहेरी पातळीवर होते,' अशी भूमिका प्रा. कुमुद पावडे व्यक्त करतात. (पितृप्रधानता अणि दलित स्त्रियांचा संघर्ष, कुमुद पावडे, आलोचना चर्चासत्र वृत्तांत, पृ. ४०)

भारतीय पर्यावरणाचा विचार करताना भारतीय स्त्रीवाद (अब्राह्मणी स्त्रीवादी याला ब्राह्मणी

स्त्रीवाद असं म्हणतात.), दलित स्त्रीवाद आणि अब्राह्मणी स्त्रीवाद अशा संकल्पना पाहावयास मिळतात. या तीनही संकल्पना स्त्रियांच्या शोषणाविरुद्ध आवाज उठवतात. तसेच स्त्रीवादाचे सांस्कृतिक स्वरूप स्वीकारून सामाजिक परिवर्तनाची भूमिका आग्रहाने प्रतिपादतात. पुरुषसत्ताक समाजव्यवस्थेने स्त्रीला केलेल्या शोषणाबरोबरच आपल्या वैशिष्ट्यपूर्ण संकल्पनेला नेमके स्वरूप देण्यासाठी अनुषंगिक घटकांना स्वीकारतात.

स्त्रीवाद हा सांस्कृतिकीकरणाचा एक घटक असल्याने सांस्कृतिकीकरणातील सर्व मानवी व्यवहारांना आपल्या विचारप्रवाहामध्ये बांधण्याचा प्रयत्न स्त्रीवादाने केलेला दिसतो. साहित्य, हे सांस्कृतिक व्यवहारातील महत्त्वाचे अंग असून स्त्रीवादाने साहित्यविषयक दृष्टिकोन स्पष्ट करताना साहित्याच्या अभ्यासाचे सूत्र स्त्री-जाणीवेतून निर्माण झालेले असले पाहिजे, अशी भूमिका घेतलेली आहे. याच भूमिकेतून स्त्रीवादाचा साहित्यविषयक विचार प्रकटलेला आहे. व्हर्जिनिया वुल्फ, एलेन शॉवॉल्टर, केट मिलेट यांनी स्त्रीवादी साहित्यसमीक्षेचे स्वरूप स्पष्ट करून उपयोजित स्वरूपात भूमिका मांडली. बार्बरा स्मिथ यांनी कृष्णवर्णीय स्त्रीवादी साहित्य समीक्षा आपल्या 'टूवडर्स् ए ब्लॅक फेमिनिस्ट क्रिटिसिझम' या ग्रंथाद्वारे मांडली.

स्त्रीवादी समीक्षेने स्त्रीच्या साहित्याच्या संदर्भात स्त्रीविशिष्ट अनुभव, स्त्रीकेंद्री अनुभव, आणि स्त्रीवादी अनुभव या संज्ञा रूढ करून साहित्यातील अनुभवविश्वाचे तीन गटात वर्गीकरण केले. स्त्रीवादी समीक्षेने स्त्रीवादी वाचन (फेमिनिस्ट क्रिटिक) आणि जैववाचन (गायनोक्रिटिसिझम) या भूमिका स्वीकारून साहित्याचे वाचन केले. स्त्री अथवा पुरुषांनी लिहिलेल्या साहित्याचे स्त्रीकेंद्री, स्त्रीलक्ष्यी वाचन, अर्थविवरण व मूल्यमापन साहित्यकृतींच्या संदर्भात स्त्रीवादी वाचनाद्वारे केले जाते. गायनोक्रिटिसिझममध्ये स्त्री लेखिकांनी निर्माण केलेल्या कलाकृतींचे वाचन करत असताना त्या लेखिकांच्या बाईपणावर लक्ष केंद्रित केलेले असते.

मूर्त स्वरूपात येऊ घातलेली दलित स्त्रीवाद ही संकल्पना स्वत:ची समीक्षाप्रणाली निर्माण करू शकली नाही, तर दलित साहित्याच्या समीक्षेविषयक दृष्टिकोनाचाच दलित स्त्रीवादावर प्रभाव आहे. अब्राह्मणी साहित्याच्या सौंदर्यशास्त्राच्या स्वरूपासंदर्भात आणि उपयोजनासंदर्भात स्पष्टता आणण्याचा प्रयत्न कॉ. शरद पाटील यांनी केलेला आहे.

स्त्रीवाद आणि दलित साहित्य या विषयावरील निबंधामध्ये स्त्रीवादी समीक्षा सिद्धांतांच्या अनुषंगाने दलित साहित्याचे वाचन करणे अभिप्रेत असावे. हा स्त्रीवादी समीक्षासिद्धांत म्हणजे उपरोक्त विवेचनातील भारतीय स्त्रीवादी विचार असावा. आणि त्या समीक्षा सिद्धांताच्या अनुषंगाने दलित साहित्याची उपयोजित समीक्षा करणे आवश्यक असावे. दलित साहित्य-कृतींची स्त्रीवादी विचारप्रणालीच्या अनुषंगाने समीक्षा करण्याच्या पूर्वी दलित साहित्य या संकल्पनेचा धांडोळा घेणे इष्ट ठरेल.

'डॉ. बाबासाहेब आंबेडकर अकादमी'तर्फे सातारा येथे झालेल्या साहित्यचर्चेमध्ये चर्चिल्या गेलेल्या 'स्वातंत्र्योत्तर मराठी समाज आणि साहित्य' या विषयावरील चर्चासत्रामध्ये लेखक म्हणून आपली भूमिका मांडताना जी. के. ऐनापुरे म्हणाले की, 'दलित, दलित जाणीव, दलित चळवळ हे शब्द फेकून देणं तितकंच गरजेचं आहे. ह्या शब्दांचं अस्तित्व अबाधित ठेवल्यास

हिंदू, हिंदुत्व, हिंदू राष्ट्रीयता हे शब्द कल्हई केल्यासारखे पुन्हा चकचकीत होतील.' (समाज प्रबोधन पत्रिका, ऑक्टो.-डिसें. २०००, पृ. २१२) रा. जी. के. ऐनापुरे यांना हिंदू, हिंदुत्व आणि हिंदू राष्ट्रीयता या संकल्पनांवरील कल्हई उडाल्यासारखे वाटते आहे. तसेच दलित या संकल्पनेमुळे हिंदू ही संकल्पना अधिमान्यता पावते आहे, असे वाटते. हिंदू आणि दलित या संकल्पना स्पष्ट करताना रा. ऐनापुरे दलित या संकल्पनेकडे जातजाणिवेने पाहताना दिसतात. दलित ही संकल्पना स्वीकारली गेल्यानंतर त्या संकल्पनेकडे जातजाणिवेतून काहीवेळा पाहिले गेले आहे, हे सत्य मान्य करणे आवश्यक आहेच.

दलित ही संकल्पना गरीब, अस्पृश्य, श्रमिक, कामगार, भूमिहीन शेतमजूर, नाडलेला, विकासापासून वंचित, स्त्रिया आणि आदिवासी या अनुषंगाने अनेकदा वापरली गेलेली आहे. परंतु दलित साहित्याच्या संदर्भात या संकल्पनेचा संकोच झालेला पाहावयास मिळतो. किंवहुना दलित या संकल्पनेकडे जातजाणिवेमध्येच अधिक पाहिलेले आहे. या संकल्पनेमध्ये जन्मापासून दलित, शोषित हे व्यवच्छेदक लक्षण दिसते. दलित जाणिव आणि दलित साहित्याच्या संदर्भात वेगवेगळ्या अभ्यासकांनी वेगवेगळी वैशिष्ट्ये मांडलेली आहेत. डॉ. भालचंद्र फडके यांनी वेदना आणि विद्रोह यांद्वारे दलित जाणीव व्यक्त होते, असे स्पष्ट केले आहे. तर दत्ता भगत दलित साहित्याचे वैशिष्ट्य सांगताना 'आत्मसन्मानाच्या जाणिवेतून आत्मशोध, आत्मसन्मानाच्या आड येणाऱ्या परंपरेला, धर्माला नकार किंवा त्याविरुद्ध बंड, लोकशाही मूल्ये पायदळी तुडवली तर बंड, माणूसपणाची वागणूक, भगवान बुद्धाचा धम्मविचार, फुले आणि आंबेडकर ह्या विचारवंतांच्या गतिमान परिवर्तनाच्या प्रक्रियेबद्दल निस्सीम आदर दलित साहित्यिकाकडे असतो' असे मत प्रकट करतात. (दत्ता भगत, दलित साहित्य : दिशा आणि दिशांतर) दलित साहित्याचे जातिधिष्ठित अनुभवक्षेत्र, त्य अनुभवक्षेत्राचे वेगळेपण, निर्मात्याची समष्टीविषयक सहभावना, व्यक्ती आणि समूहसंवेदन या पातळीवरील संघर्ष दलित साहित्याला अभिप्रेत आहे. या संघर्षातून दलित साहित्य हे परिवर्तनाच्या लढ्यातील हत्यार आहे, ही जाणीव दलित साहित्याने वृद्धिंगत केलेली आहे. जातजाणिवेला केंद्रवर्ती मानताना दलित साहित्याचे अभ्यासक वर्णव्यवस्थेविरुद्धचा संघर्ष आणि माणूसपणाचे मूल्य महत्त्वाचे मानतात. दलित साहित्याच्या विकसनाबरोबर दलित साहित्याच्या संकल्पनेचा विस्तार झालेला दिसतो. या संकल्पनेमध्ये परिवर्तने पाहायला मिळतात. या परिवर्तनांचा दलित साहित्याच्या नामांतराशी संबंध जोडता येतो. १९६० नंतर वाङ्मयीन व्यवहारामध्ये रूढ होत गेलेली दलित साहित्य ही संकल्पना परिवर्तनाचा विचार केंद्रस्थानी मानणारी आहे. दलित साहित्यिकांनी या संकल्पनेकडे सातत्याने चर्चा आणि चिकित्सेच्या दृष्टिकोनातून पाहिलेले आहे. अनेकदा ही चर्चा वैचारिक सुंदोपसुंदी सुद्धा झालेली आहे. दलित साहित्याच्या नामांतरामध्ये त्याचे विशेष प्रत्यय पाहायला मिळतात. दलित साहित्य, आंबेडकरवादी साहित्य, फुले-आंबेडकरवादी साहित्य, परिवर्तनवादी साहित्य, बहुजन साहित्य, अब्राह्मणी साहित्य आणि अलीकडे विद्रोही साहित्य या संकल्पनांमध्ये ज्या लेखकांच्या वाङ्मयाचा विचार केला जातो, त्या वाङ्मयाचा सुरुवातीच्या दलित साहित्य या संकल्पनेअंतर्गतच समावेश केलेला दिसतो.



अनुक्रमणिका

'दलित साहित्य : विकास आणि भविष्य' या आपल्या लेखात अर्जुन डांगळे यांनी दलित साहित्याच्या संदर्भात अनेक मुद्यांची चर्चा केली आहे. (अर्जुन डांगळे, दलित विद्रोह, ग्रंथघर, पृ. २३) दलित साहित्यासंदर्भात चर्चिल्या जाणाऱ्या वेगवेगळ्या मुद्यांसंदर्भात तपशील आणि दलित साहित्याच्या केलेल्या व्याख्या पाहताना दलित साहित्य हे एकूणच शोषणाधिष्ठित समाजव्यवस्थेच्या विरुद्ध विद्रोह प्रकट करते, समताधिष्ठित सामाजिक मूल्यांची प्रतिष्ठापना करते, शोषणव्यवस्थेने निर्माण केलेल्या विषम सामाजिक रचनेला नकार देते, समाज परिवर्तनाची केंद्रीय भूमिका घेऊन आपल्या निर्मितीला मुख्य धारा बनवते. जातजाणिवेतून होणारे शोषण नाकारणे दलित साहित्य प्रमाण मानते. विषम सामाजिक मूल्यांवर जसे दलित साहित्य आघात करते, तसे सक्षम निर्मितीसाठी ते आत्मशोध, आत्मटीकेचा स्वीकार करते.

दलित साहित्याच्या पारंपरिक संज्ञेला लाभलेली लाचारी, दारिद्र्य, पददलित या अर्थाऐवजी दलित ही व्यापक संवेदना आहे. ती सर्व मानवी समूहांना स्त्री आणि पुरुषांच्या सहसंवेदनांना, दु:खाला अभिव्यक्त करणारी आहे. ही भूमिका दलित साहित्य आपल्या पटावर आणते. व्यापक आशय आणि मितींचे परिमाण स्वीकारताना दलित ही कोणती एक जात नसून ती एक जाणीव आहे, हे भूमिका सर्वच दलित अभ्यासकांनी स्वीकारलेली पाहावयास मिळते. नकार, विद्रोह आणि विज्ञान याद्वारे समष्टीच्या परिवर्तनाची भूमिका दलित साहित्याने महत्त्वाची मानलेली आहे. माणूस आणि माणसाचे माणूसपण हे दलित साहित्याचे केंद्र मानलेले आहे.

स्त्रीवाद आणि दलित साहित्य या भूमिकांचा परस्परसंबंध पाहताना स्त्रीवाद माणसाला स्त्री आणि पुरुष या दोन भिन्न मितींमध्ये पाहतो. पुरुषप्रधान व्यवस्थेने स्त्रीला आपली अंकित केली असून ही व्यवस्था स्त्रीचे शोषण करते, हे गृहीतसूत्र स्त्रीवादामध्ये पाहावयास मिळते. तर दलित साहित्य हे स्त्री आणि पुरुषांना विषम सामाजिक व्यवस्थेचे बळी मानते. ही विषम सामाजिक व्यवस्था जातिव्यवस्थेद्वारे माणसाचे शोषण करते, असे दलित साहित्य गृहितसूत्र स्वीकारते. स्त्रीवादी साहित्यामध्ये पुरुषांच्या स्त्रीशोषणाधिष्ठित राजकारणाला नकार दिलेला पाहावयास मिळतो. आणि या नकारातूनच निर्माण होणाऱ्या सामाजिक चळवळी समाज परिवर्तनाची भूमिका स्वीकारतात. त्यामध्ये स्त्रियांच्या व्यक्तिस्वातंत्र्यावरोबर स्त्रीसमूहाचा घटक महत्त्वाचा असतो. दलित साहित्य हे दलित चळवळीच्या अनुषंगाने विकसत जाणारे, तसेच समष्टीच्या शोषणाविरुद्ध नकार देणारा घटक प्रधान मानणारे आहे. स्त्रीवादी साहित्य समीक्षेने स्वत:चे वाचक निकष निर्धारित केलेले आहेत. दलित साहित्याने नकार, विद्रोह, विज्ञान आणि परिवर्तन या अनुषंगाने स्वत:चे समीक्षा निकष निर्माण केलेले आहेत. विभिन्न परिवर्तनवादी चळवळींच्या स्वव्यक्तित्व स्पष्ट करणाऱ्या या दोन विचारधारा आहेत. ज्या विचारधारांचे स्वतंत्र अस्तित्व मान्य करावे लागते. एका विचारधारेद्वारे दुसऱ्या विचारधारेकडे पाहिल्यास ती विचारधारा म्हणजे साहित्याच्या दृष्टीने एक समीक्षापद्धत म्हणूनच शिल्लक राहते. म्हणजेच वाङ्मय व्यवहारामध्ये अस्तित्वात असलेल्या साहित्यसमीक्षा पद्धतीतील स्त्रीवादाकडे वा दलित जाणिवेकडे एक समीक्षा पद्धत म्हणून पाहता येते. अवलोकनामध्ये या वादांना निश्चितपणे मर्यादा पडतात.

दलित जाणिवेच्या साहित्यिकाने निर्माण केलेल्या साहित्यकृतीचे उपरोक्त समीक्षापद्धतींद्वारे अवलोकन करावयाचे झाल्यास एकाच साहित्यकृतीकडे भिन्न मितींतून पाहता येऊ शकते. कविता-कथा-आत्मकथा-कादंबरी-नाटक या वाङ्मयप्रकारातील दलित जाणिवांचे स्त्रीवाद आणि दलित साहित्य या अनुषंगाने चर्चा करताना भिन्न अवलोकन निदर्शनास येईल. त्यासाठी निवडक उदाहरणांसह एका स्वतंत्र लेखाचीच मांडणी करावी लागेल. 'स्त्रीवाद आणि आधुनिक साहित्य' या विषयावरील चर्चासत्रातील माझा 'दलित साहित्य आणि स्त्रीवाद' हा विस्तृत लेख पाहावा.) सुरेखा भगत, प्रज्ञा लोखंडे, प्रतिभा राजानंद, हिरा बनसोड, ज्योती लांजेवार यांच्यासारख्या कवयित्री; शांताबाई कांबळे यांच्यासारख्या आत्मकथा निवेदिका; उर्मिला पवार, वामन होवाळ, अमिताभ असे कथाकार, बाबूराव बागुल किंवा नामदेव ढसाळांसारखे कादंबरीकार, संजय पवार, प्रेमानंद गज्वी, मि. शि. शिंदे, शिल्पा मुक्रीसवार इ .नाटककार यांचा या संदर्भात विचार करावा लागेल.

सारांश, स्त्रीवाद आणि दलित साहित्य या विषयाचा अभ्यास करताना स्त्रीवादाचा भारतीय समाजव्यवस्थेसंदर्भात विचार करणे गरजेचे आहे.

दलित साहित्याकडे स्त्रीजाणिवांच्या दृष्टीने पाहताना आपण या निष्कर्षाला येऊन पोचतो की, बहुतांश दलित लेखकांमध्ये स्त्रीवादी जाणिवांचे विकसन होत असून त्यांच्या लेखनातून स्त्रीविषयक सहसंवेदना प्रकट होतात. काही पुरुष लेखकांच्या लेखनावर लिंगभावाचा ठळक प्रभाव दिसतो, हे खरे असले तरी दलित साहित्याचा साकल्याने विचार करता, पुरुष लेखक स्त्री-लेखिकांपेक्षाही अधिक आक्रमक पद्धतीने स्त्रीवादाची मांडणी करताना दिसतात. १९७५ नंतर मात्र स्त्रीवादी चळवळीच्या कृतिशील होण्यातून दलित स्त्रीलेखिकांच्या लेखनकृतींतून स्त्रीवादी जाणिवा जास्त ठोस आणि मूलभूत रीतीने व्यक्त होताना दिसतात. सरतेशेवटी असे निश्चितपणे म्हणता येईल की, दलित साहित्याला लाभलेल्या वैचारिक आणि परिवर्तनवादी दृष्टिकोनामुळे मराठी साहित्याच्या तुलनेत दलित साहित्यात स्त्रीवादी जाणिवा प्रबळ दिसतात.

■

डॉ. अनिल सपकाळ
अधिव्याख्याता, मराठी विभाग, फर्ग्युसन महाविद्यालय, पुणे ४०० ००४.

# अभिनेत्रींचे ललितलेखन

❑

**ज्योत्स्ना आफळे**

❑

मराठी साहित्यात ललितलेखनाचा समावेश 'ललित गद्य' या वाङ्मय- प्रकारात होतो. काव्य, कथा, कादंबरी, नाटक, चरित्रे, आत्मचरित्रे या वाङ्मय-प्रकारात न बसणारे जे लेखन आहे, ते म्हणजे लघुनिबंध, ललित निबंध, अनुभव, आठवणी, व्यक्तिचित्रे, प्रवासवर्णने, पत्रे इत्यादी. यांचा समावेश 'ललितगद्य' या प्रकारात होतो.

१९२६ च्या जानेवारीच्या 'रत्नाकर' मासिकात कै. ना. सी. फडके यांची 'सुहास्य' हा लघुनिबंध प्रसिद्ध झाला, तसेच १९२७ साली कै. वि. स. खांडेकर यांनी सावंतवाडीच्या 'वैनतेय' या साप्ताहिकातून 'रानफुले' या शीर्षकाखाली लघुनिबंध लिहिण्यास सुरुवात केली होती. आणि येथूनच मराठी साहित्यात लघुनिबंध अवतरला. १९२६ ते १९५० या काळात लघुनिबंधाला भरपूर लोकप्रियता लाभली. या काळातील स्त्रियांच्या लघुनिबंध लेखनाचा शोध घेतला असता असे दिसून येते की, अनेक लेखिकांनी रत्नाकर, यशवंत, ज्योत्स्ना, माधुरी, मनोरंजन, किर्लोस्कर, स्त्री या मासिकांतून लेखन केले. यामध्ये ठळकपणाने नोंद घेण्याजोगे लघुनिबंधसदृश लेखन फक्त तिघींचेच आहे. त्या म्हणजे - कै. कुसुमावती देशपांडे, कै. डॉ. इरावती कर्वे आणि कै. शकुंतला परांजपे. वाङ्मयाच्या इतिहासाने नोंद घ्यावी असे सकस आणि दर्जेदार लघुनिबंध या लेखिकांनी लिहिलेले आहेत.

१९५० नंतर लघुनिबंधाची पीछेहाट झाली. त्याला अनेक गोष्टी कारणीभूत झाल्या. लघुनिबंधाची बंदिस्त रचना जाऊन तो पसरट होत गेला. 'मी'चे व्यक्तिमत्त्व केंद्रस्थानी आले. लालित्याच्या अंगाने तो विकसित होत गेला. आशयातले बदल स्वीकारत लघुनिबंधाला पोटात घेऊन हा वाङ्मयप्रकार १९५० नंतर 'ललितगद्य' या नावाने मराठी साहित्यात स्थिरावला आहे.

१९५० ते २००० या कालखंडातील स्त्रियांच्या ललितलेखनाचा शोध घेतला तर असे दिसून येते की, त्यात लेखिकांनी लक्षणीय भर घातली आहे. यामध्ये श्रीमती दुर्गा भागवत, शिरीष पै, विजया राजाध्यक्ष, डॉ. सरोजिनी वैद्य, डॉ. अरुणा ढेरे, मंगला गोडबोले यांचे लेखन विशेष नोंद घेण्याजोगे आहे. यामध्ये निसर्गविषयक लेख आहेत, गतकालात रमण्याच्या वृत्तीतून लिहिलेले स्मरणरंजनात्मक लेख आहेत, तसेच सामाजिक घटना आणि समाजातील विसंगती, बालपण, शाळा-कॉलेजचे दिवस, देशा-परदेशांतील अनुभव, स्वतःच्या कार्यक्षेत्रातील अनुभव हे प्रामुख्याने दिसून येतात. यामध्ये काही अभिनेत्रींनी स्वतःचे अनुभव शब्दबद्ध केलेले लेखनही आढळते.

नाटक आणि चित्रपटक्षेत्र हे सामान्य माणसाच्या दृष्टीने एक कुतूहलाचे जग आहे. या

जगातल्या घडामोडी जर रोचक पद्धतीने लिहिल्या गेल्या, तर त्या जाणून घ्यायला सर्वसामान्य माणसाला आवडतात. या क्षेत्रात काम करणाऱ्या अभिनेत्रींनी आपल्या कामात व्यग्र असतानादेखील अधूनमधून लेखणी हातात धरली आहे आणि आपला नाट्यचित्रपटप्रवास शब्दबद्ध केला आहे. यामध्ये प्रिया तेंडूलकर, निशिगंधा वाड, स्मिता तळवलकर आणि अश्विनी भावे यांचा समावेश आहे. त्यांची 'पंचतारांकित', 'असंही', 'फुलपंखी', 'बोन्साय', 'पिंपळपान', 'मनोभावे' अशी पुस्तके प्रकाशित झालेली आहेत. यामध्ये सहवासात आलेली माणसं आहेत, जाणवलेले प्रश्न आहेत, स्वतःची सुख-दुःखे आहेत. तसेच यश-अपयश, जय-पराजय, इच्छा-आकांक्षा यांचे मूल्यमापन आहे. त्यांच्या अनुभवांना एक वेगळेपणा आहे. त्यामुळे वाचकांसमोर एक वेगळे जग उलगडले गेले आहे.

'फुलपंखी', 'बोन्साय' ही निशिगंधा वाड यांची पुस्तके आहेत. आयुष्यात आलेल्या अनुभवांचे, नाटक-चित्रपटातील अनेक घटना-प्रसंगांचे, सहवासात आलेल्या माणसांचे चित्रण यात आढळते. या छोट्याशा कलाप्रवासात त्यांना अनेकांचे आशीर्वाद लाभले, प्रेक्षकांचे उदंड प्रेम लाभले. चाकोरीपेक्षा वेगळे आयुष्य जगायला मिळाले, याबद्दल त्या स्वतःला अतिशय सुदैवी समजतात.

त्यांनी सुरुवातीला बालनाट्यातून कामे केली, तेव्हा घडलेल्या गंमती-जमतीची वर्णने काही लेखातून येतात. अमोल पालेकरांची प्रथम वाटलेली भीती, अरविंद देशपांडे यांच्यातील प्रेमळ पण तितकाच कडक दिग्दर्शक, तालमीच्या वेळी धमाल किस्से ऐकवणारे आत्माराम भेंडे, वडील गेल्याचे दुःख आवरून, अश्रू गिळून काम करणाऱ्या रेखा कामत, सदाशिव अमरापूरकरांबरोबर काम करताना आलेले दडपण त्यांनी 'टेक इट इझी' म्हणताच कसं पळून गेलं, 'मदनबाधा' नाटकाच्या प्रयोगाला आलेल्या काशिनाथ घाणेकरांनी दिलेली दाद, 'शेजारी शेजारी' या चित्रपटाच्या डबिंगच्या वेळी तिथं आलेल्या अमिताभ बच्चनकडे बघून 'स्माईल' द्यायचे राहून गेले म्हणून वाटलेली रुखरुख, कॉलेजमध्ये असताना पाऊस पडत होता तेव्हा अभिनेत्री 'मालासिन्हा' यांना न ओळखून त्यांना छत्रीतून दिलेली लिफ्ट, प्रचंड वेगाने काम करणारे आणि जगण्यावर विलक्षण प्रेम करणारे ऋषिकेश मुखर्जी या सर्वांच्या अनुभव-आठवणी त्यांच्या लेखातून वाचावयास मिळतात.

आपल्या भूमिकांबद्दल त्या लिहितात की, 'आव्हान' या मालिकेतील वीणाच्या भूमिकेवर लोकांनी भरभरून प्रेम केले. वीणाचं दुःख हे कितीतरी नवपरिणित विवाहितांचे दुःख होते, हे त्यावेळच्या पत्रांच्या गठ्ठ्याकडे बघितलं की कळतं. आत्मविश्वासाची एक पायरी 'आव्हान'नं चढायला मदत केली. 'हद्दपार' या मालिकेतील मिसेस घाटे ही भूमिका लोकांना खरीच वाटायची. त्याबद्दल त्या लिहितात की, कलाकार भूमिका करतो, करून जातो पण प्रेक्षक त्यात स्वतःचं प्रतिबिंब बघतात. 'भूमिका' हा बाज वितळून जातो. ते सारं खरं वाटू लागतं.

शूटींगच्या वेळी घडलेल्या गंमतीदार प्रसंगांचीही वर्णने त्यांनी केलेली आहेत. 'युगंधरा' मालिकेत डोहाळजेवणाचा सीन होता. तेव्हा कॅमेरा ऑन झाला आणि नंतर कळलं की, पोटापाशी उशी बांधायला त्या विसरल्या होत्या. 'गृहप्रवेशा'च्या शूटींगच्या वेळी त्यांचा

वरातीचा शॉट चालू होता. त्यावेळी सजवलेला बंगला बघण्यात त्या इतक्या गर्क झाल्या की, नववधूनं लाजायचं असतं, हे त्या साफ विसरल्या होत्या. त्याचवेळी उंबऱ्यावरचं माप ओलांडून आत पाऊल टाकताना टुणकन उडी मारली गेली. कारण त्या तांदुळातून एक पाल सळसळत बाहेर पडली होती. पण नंतर कळले की तो कथानकाचाच एक भाग होता. पण हे आधी माहीत नसल्यामुळे शॉट अगदी रिॲलिस्टिक झाला होता. 'गृहप्रवेश'चा रिपोर्ट लिहिताना 'जी' मासिकाने लिहिले की, 'अखेर नितीशनं निशिगंधाशी लग्न केलं !' या बातमीमुळे खूप खळबळ माजली. त्या दिवशी घरचा फोन सारखा खणखणत होता. वेगवेगळ्या प्रतिक्रिया, आश्चर्योद्गार उमटत होते. पण 'गृहप्रवेश'ला प्रसिद्धी मिळवून देण्यासाठी तो एक स्कूप होता, एक खेळी होती. पण लोकांना ते सारे खरेच वाटले होते. 'ताराराणी' या चित्रपटाच्या शूटींगच्या वेळी 'कासारी' या घोडीवरून सराव करताना त्या आपटल्या. मग हॉस्पिटल, औषधे, ट्रॅक्शन, वजने, लाकडी पट्टे यात चार-पाच महिने गेले. हे सगळे वाचताना जाणवते की, एका कलावंतांचे आयुष्य किती विविध घटनांनी युक्त असे असते. निशिगंधा वाड यांनी अतिशय रोचक पद्धतीने ते व्यक्त केले आहे. त्यामुळे ते वाचनीय झालेले आहे. 'बोन्साय' मध्ये त्यांचे स्त्रियांचे प्रश्न, त्यांच्या जाणीवा, आत्मनिर्भरता, आर्थिक स्वावलंबन, आत्मबल या विषयांवरचे लेख आहेत. पुरुष जसा स्वत:चा धर्म सोडत नाही, तसा स्त्रियांनाही परधर्मातील पुरुषांशी लग्न केल्यावर स्वत:चा धर्म पाळण्याचे स्वातंत्र्य मिळायला हवे, असे मत त्या व्यक्त करतात. खूप शिकलेल्या मुलींनी फक्त चूल सांभाळत बसू नये, तर ज्ञानाचा उपयोग करून अर्थार्जन करावे आणि आर्थिकदृष्ट्या स्वावलंबी बनावे, असे त्यांना वाटते. बायकांनी फक्त स्वत:ला बदलवून तसेच आसपासच्या इतर बायकांना बदलून त्यांचे प्रश्न सुटणार नाहीत, तर त्यांनी स्वत:च्या घरातल्या पुरुषाला आधी बदलले पाहिजे. पुरुष बदलला की घर बदलेल, समाज बदलेल. परिणामी स्त्रीला समान हक्क मिळू शकतील. 'नाममात्र' या लेखात त्या लिहितात की, 'मदर इज सर्टंटी'. आईच फक्त खरी, तिचं आणि तुमचं रक्ताचं-आतड्याचं, हाडा-मासांचं नातं, ती सांगेल तेच तुमचे वडील... हे अजब सत्य आहे. म्हणूनच कदाचित पूर्वापार भ्यालेली पुरुषप्रधान संस्कृती पिढ्यांना वडिलांचे नाव लावायला शिकवते. खरे तर हा दिलासा कुणाला, समाजाला की स्वत: पुरुषाला ! अशा प्रकारे अनिष्ट रूढींवर त्यांनी प्रहार केले आहेत. यातून एका अभिनेत्रीची सामाजिक जाणीव स्पष्ट होते.

'पिंपळपान' हा स्मिता तळवलकरांच्या ललितलेखांचा संग्रह आहे. 'अभिनय' हा या अभिनेत्रीत बालवयापासूनच मुरलेला आहे, हे काही लेखांवरून दिसून येते. कारण शाळा-कॉलेजातील आठवणींचे धमाल किस्से सांगताना त्या लिहितात की, त्यांना बाईंच्या नकला करण्याची तसेच सतत इतरांच्या फिरक्या घेण्याची सवय होती. संसारातील काही प्रसंग, नवऱ्याचे आजारपण, मुलांच्या परीक्षा, अभ्यास, रिझल्टचे दिवस हे सर्व सांभाळत नाट्यचित्रपट क्षेत्रातील करियर करताना येणारे ताणही काही लेखातून त्या स्पष्ट करतात. तसेच नाटकाच्या तालमी, त्यांचे पहिले प्रयोग, कधी आनंद देणारे, तर कधी दडपण आणणारे यांचीही वर्णने येतात. नाटकात काम करताना कधी कधी अपघातालाही सामोरे जावे लागते, याचा एक प्रसंग

त्या लिहितात की, गडकरी रंगायतनला प्रयोगाच्या वेळी स्टेजवरच्या सिलींगची स्लॅब धाडकन स्टेजवरच पडली. तेथे दगड, विटा, सिमेंट यांचा खच पडला. त्या पटकन विंगेत पळाल्या म्हणून वाचल्या.

नाटकात काम करणाऱ्या लोकांच्याही काही समस्या असतात, पण सामान्य माणसांपर्यंत त्या पोचत नाहीत, अशी खंत त्या व्यक्त करतात. त्यासंबंधी त्या लिहितात की, नाशिकला कालीदास मंदिरात प्रयोग होता, तेव्हा वॉचमनच्या हलगर्जीपणामुळे, तसेच जनसंपर्क अधिकाऱ्यांनी दुर्लक्ष केल्यामुळे अतिशय मनस्ताप झाला. पण नंतर प्रयोगाला उभे राहिल्यावर हे मनातले किल्मिष दूर झालं. त्यावेळी आपण फक्त प्रेक्षकांसाठी असतो, हे लक्षात येते. तसेच नाटकाचे कंत्राटदार किंवा थिएटरवाले आरडाओरडा करतात, प्रेक्षकांचा रोष वेगळाच असतो. पण अशा वाईट प्रसंगातून आम्ही नाटकवाली मंडळी हसऱ्या चेहऱ्याने प्रयोग करतो, हे त्या माय-बाप प्रेक्षकांपर्यंत पोचत नाही.

प्रेक्षकांच्या प्रतिक्रियांबद्दल त्या खूप संतापतात. त्यावेळेस कलाकार किती असुरक्षित आहे, असे त्यांना वाटते. त्याचे एक उदाहरण त्या देतात की, चिपळूणला प्रयोग होता, तेव्हा गाडी नादुरुस्त झाली म्हणून सर्वांनी टेंपोतून प्रवास करून थिएटर गाठले. तेव्हा थोडा उशीर झाला होता. त्यावेळी एक प्रेक्षक म्हणाला, 'रात्री सगळ्यांनी बेवडा मारला असणार म्हणून यायला उशीर झाला. या कलाकारांना चौथ्या अंकाशिवाय निघताच येत नाही. मागे तो... कर नाही गोव्यात आडवा झाला होता !' हे असे ऐकले की त्यांचा राग अनावर होतो. त्या स्पष्ट करतात की, आम्ही कलाकार व्यक्तिगत अडचणी, मनस्ताप, प्रवास, दौरे, दगदग, अचानक बंद पडणारा थिएटरचा ए.सी. सगळे सोसून निव्वळ रसिकांसाठी जेव्हा प्रयोग करतो, तेव्हा अशा उद्‌गारांचे वाईट वाटते.

अशा प्रकारे स्मिता तळवलकरांनी आपल्या ललितलेखांतून स्वत:च्याच आयुष्यातील अनेक अनुभवांना टिपता टिपता नाटक आणि त्यातील कलाकार यांचेही अनुभव मांडले आहेत. त्यातील सत्यता पटत जाते आणि कलाकारांबद्दल आदर निर्माण होतो.

'पुरुष', 'आहुती', 'भैरवी', 'टिना' इ. चित्रपटात उत्कृष्ट भूमिका करणाऱ्या अश्विनी भावेंचे 'मनोभावे' हे ललित लेखांचे पुस्तक आहे. लेख खूपच त्रोटक आहेत. फक्त एक-दीड पानात सामावतील, असे त्यांचे स्वरूप आहे. पण तरी त्यातून व्यक्त होणारा जो विचार आहे, स्वमनाशी केलेला जो संवाद आहे, समाजाचे जे आकलन आहे, जीवनानुभव घेण्याची जी क्षमता आहे, ती वाचनीय आहे.

आपल्या स्वत:च्या खास आवडीनिवडी, आपले म्हणून असलेले छोटे छोटे आनंद, मनातले हळवे कोपरे, स्मृतिकोषात जपलेले क्षण, काही अविस्मरणीय गोष्टी, काही हरवल्याची खंत, काही मिळाल्याचे समाधान यांची नोंद काही लेखांतून घेतली गेली आहे. तेथे त्या स्वत:कडे कशा तऱ्हेने पाहतात, स्वत:च स्वत:ला अलिप्ततेने कशा निरखतात, तसेच इतरांच्या नजरेतूनही स्वत:ला कशा ओळखतात, याचे दर्शन होते.

'भैरवी' चित्रपटात त्यांनी अंध रागिणीची भूमिका केली, तेव्हा सारं काही स्पर्शातून

अनुभवण्याचं त्यांनी जे काही होमवर्क केले आहे, ते वाचताना आपल्यासमोर ती व्यक्तिरेखा साकार होते. 'टीना' चित्रपटातील 'आजावे माही' या गाण्याच्या चित्रीकरणाच्या वेळी आर. के. स्टूडिओतील आरशाने त्यांना त्यांची जी दोन रूपे दाखवली, त्याचे अंतर्मुख होऊन त्यांनी वर्णन केले आहे. तेथे आपणच आपल्याला कसे पाहात असतो, आपलं खरं स्वरूप काय आहे, हे त्यांनी टिपलं आहे.

अनेक माणसांवर त्यांनी लिहिलं आहे. त्यात परदेशात भेटलेली अनोळखी 'फरिया' आहे, अनमोल हिरा भेट देणाऱ्या 'सौदी अरेबियातील राणीसाहेबा' आहेत. 'बर्फीवाला' सारख्या विक्षिप्त आणि प्रकाशसारख्या संधिसाधू स्वार्थी माणसांचे किस्से आहेत. पु. ल. देशपांडे आणि माणिक वर्मा यांच्याशी असलेले प्रेमाचे नाते उलगडून सांगितले आहे. अरुण सरनाईक यांनी दिलेली शाबासकी आहे. कवी प्रदीप यांना योग्य सन्मान न मिळाल्याची खंत आहे. परमिटरूमविरुद्ध वसुधा सरदार यांनी दिलेल्या झुंजीचे कौतुकास्पद वर्णन आहे. माणसात रमणाऱ्या अश्विनी भावे येथे दिसतात.

निसर्ग नुसता पाहणं आणि निसर्ग अनुभवणं या दोन वेगळ्या गोष्टी आहेत. अश्विनी भावे निसर्ग अनुभवतात. अमेरिकेतला नायगारा पाहताना त्या लिहितात, "सगळी नाती, माझं नाव, माझी ओळख त्या कोसळत्या पाण्यात केव्हाच वाहून गेली होती. मनाची पाटी पार कोरी झाली होती. माझं मन अनुभवत होतं त्या मूर्तिमंत आनंदात बेधुंद उसळणं.' स्वतःचं भान हरपून निसर्गाशी एकरूप होण्याची वृत्ती येथे आढळते.

अश्विनी भावेंच्या सामाजिक जाणीवा प्रखर आहेत. 'सत्त्वपरीक्षा', 'फेरपरीक्षा', 'स्पर्धा हवी पण' या लेखातून त्यांनी आजच्या शिक्षणपद्धतीवर टीका केली आहे. 'विंचवाचे बिऱ्हाड' सारख्या लेखातून बांधकामावरच्या मजुरांचे हलाखीचे जीवन त्या टिपतात. बांधलेल्या मनोऱ्याकडे मान वर करूनसुद्धा ते बघत नाहीत. कारण पोटात प्रश्न फक्त भाकरीचा असतो. हे वास्तव त्यांनी चांगल्या प्रकारे व्यक्त केले आहे. गर्दीचे मानसशास्त्र उलगडून सांगणारा 'प्रकाशातला अंधार' हा लेख वाचनीय आहे. 'मामाच्या गावाला जाऊ या' मधील नॉस्टॅल्जिया, मनात साठवलेलं मूक-बधिर मुलीचं निरागस हास्य, इवल्याशा रोपाला लावलेला जीव, लहान मुलांच्या बालिशपणाचे असलेले आकर्षण, पाऊस अनुभवणं या सर्वांतून एका वेगळ्याच संवेदनाशील अश्विनी भावेंचे दर्शन होते.

या सर्व लेखातून अश्विनी भावे यांचे व्यक्तिमत्त्व कसे दिसते, याचा विचार केला तर ते विविध विषयांत रमणारे आहे. आयुष्यात छोटे छोटे आनंद उपभोगणारे आहे. जगातल्या निरनिराळ्या शहरांचा, तेथील संस्कृतीचा अनुभव घेणारे आहे. मनुष्यस्वभावातील संवाद विरोध टिपणारे आहे. निसर्गात रमणारे आहे. कलास्वरूपाचा आस्वाद घेणारे आहे.

प्रिया तेंडूलकरांनी अतिशय सकस आणि समृद्ध असे लेखन केलेले आहे. त्यांची 'पंचतारांकित' आणि 'असंही' अशी दोन पुस्तके प्रकाशित झालेली आहेत. एक वेगळे जग, त्यातल्या भल्या-बुऱ्या गोष्टींसकट त्यांनी वाचकांसमोर उलगडले आहे. प्रख्यात नाटककार विजय तेंडूलकरांची ही मुलगी. त्यांच्यासारखीच डोळसपणे जगाकडे पाहणारी आहे. कुठल्याही

गोष्टीबद्दल भाबडी मते व्यक्त करणारी नाही. नाण्याच्या दोन्ही बाजू निरखून, त्याचा खरे-खोटेपणा पडताळून मगच परखडपणाने आपले मत त्या व्यक्त करतात. नाटक-चित्रपटातील भूमिका, मॉडेलिंग, पंचतारांकित हॉटेलमधली नोकरी असे विविध क्षेत्रातील अनुभव शब्दबद्ध केले आहेत. नवा अनुभव घेण्याची, काहीतरी वेगळं करून बघण्याची प्रबळ इच्छा त्यांच्यामध्ये अगदी शाळा-कॉलेजात असल्यापासूनच होती. या क्षेत्रात शिरताना प्रथम मनात धाकधूक असायची; पण त्यांच्या बाबांनी 'हे तू करून पहा', 'हा अनुभव घेऊन पहा' असं सांगितल्यामुळे एक प्रकारचा आत्मविश्वास निर्माण झाला. एक आश्वासक खंबीर आधार मिळाला, असं त्या लिहितात. 'माझा मित्र' हा त्यांनी त्यांच्या वडिलांवर लिहिलेला लेख पुन: पुन्हा वाचावा, असा आहे. वडील आणि मुलगी या नात्यातले विविध पदर येथे दिसून येतात. आयुष्यातला एखादा प्रसंग, घटना घेऊन वडील म्हणून त्यांची मते काय आहेत आणि त्याच घटनेबद्दल मुलगी म्हणून स्वत:ला काय वाटते, याचे मूल्यमापन त्या करतात. आपल्या वडिलांमधील पिता, लेखक, मित्र, मार्गदर्शक अशी विविध रूपे व्यक्त करताना त्या लिहितात की, 'त्यांनी वारंवार दिलेल्या स्वातंत्र्यामुळे, प्रोत्साहनामुळे माझं अनुभवविश्व अधिकाधिक समृद्ध होत गेलं. माणूस म्हणून मी समृद्ध होत गेले आणि माझ्या नकळत माझ्यातल्या लेखकाला विषयही सापडत गेले. त्यात एक खरेपणा येत गेला. लेखक म्हणून मी किती यशस्वी किंवा अयशस्वी होईन, हे सगळं माझ्या हातात आणि नशिबात आहे. पण लेखक होण्यासाठी जे काही पोषक वातावरण, शिक्षण आवश्यक आहे, ते सारं त्यांनी मला भरपूर दिलं आहे.'

'पंचतारांकित' हॉटेलमध्ये नोकरी करताना त्यांना जाणवतं की, वरून चकचकीत दिसणारं जग आतून पोखरलेले आहे. तिथली धूर्त, ढोंगी, दुष्ट, लबाड माणसं, वखवखलेल्या नजरेनं येणारी गिऱ्हाईकं, पोटासाठी वाट्टेल ते करणाऱ्या वेट्रेसेस, काम झालं की माणसाला कचऱ्यासारखं फेकून देणारे व्यवस्थापक, माणुसकीशून्य जीवन, उबग आणणारी सगळी व्यवस्था. हे सगळं वाचताना सामान्य वाचक अस्वस्थ होतो. प्रिया तेंडूलकर लिहितात की, ''रेस्टॉरंट-रिसेप्शनिस्ट ही पोस्टच फार विचित्र होती. इथं 'देखणी बाई' असणं महत्त्वाचं नाही, तर 'बाई' असणं महत्त्वाचं आहे. 'शोभेची बाई' असा माझ्या पोस्टचा थोडक्यात अर्थ होता. इथे नेमलेली बाई आपल्या करमणुकीसाठी नेमलेली आहे, असाच सर्वांचा समज होता. चहाला बोलावणं, जेवायची, सिनेमाची आमंत्रणं देणं, डोळे मारणं किंवा मग सरळ 'हाऊ अबाऊट सम फन टुनाईट' असा सरळ प्रश्न टाकणं, हे सतत घडत असायचं.'' तिथं काम करणाऱ्या अनेक बायकांची दु:ख त्यांनी वर्णिली आहेत. पहिल्या प्रथम नोकरीला येणारी बाई कशी बुजलेली असते आणि नंतर मग ती कशी सराईत बनते, हेही त्यांनी दर्शवून दिलं आहे. उबग आणणारं किळसवाणं जग या लेखातून सामोरं येतं.

मॉडेलिंगच्या क्षेत्रात काम करताना त्यांच्या मनात अनेक प्रश्न निर्माण झाले. त्याबद्दल त्या लिहितात की, स्वयंपाकघरात किंवा बाथरूममध्ये काम करताना आदर्श गृहिणी इतकी कशी नीटनेटकी दिसू शकेल, कारण भाजी चिरताना, कपडे धुताना केस विस्कटतात, घाम येतो, कपडे खराब होतात आणि सुंदर दिसणं केवळ अशक्य होतं. म्हणून धुलाईच्या साबणाच्या



अनुक्रमणिका

जाहिरातीत गृहिणीऐवजी एखादी मोलकरीण दाखवली तर ती जास्त वास्तववादी होईल. कनिष्ठ मध्यमवर्गीयांसाठी खास बनविलेल्या जाहिरातीत अलिशान घर, सजवलेल्या नाजुक बायका दाखविण्याऐवजी चाळ किंवा झोपडपट्टी दाखवली आणि खास कनिष्ठ मध्यमवर्गीय दिसेल अशी काहीशी अव्यवस्थित साधी बाई दाखवली तर ते उत्पादन त्या ग्राहकवर्गाला आपल्या आवाक्यातलं नि आपलं वाटण्यास मदत होईल. तसेच पुरुषांच्या सूटींग, शर्टींग, टाय आणि आफ्टर शेव्ह लोशनसारख्या उत्पादनांच्या जाहिरातीत सुंदर स्त्रियांचा केलेला वापर स्त्रीच्या आजच्या सामाजिक स्थानाबद्दल नक्की काय सूचित करतो, असे असंख्य प्रश्न त्या निर्माण करतात. तेथे काम करताना आलेल्या अडचणींचे निवारण आपण प्रत्येक वेळी कसे करत गेलो, हेही सांगतात.

*या अभिनेत्रींच्या ललितलेखनांतून असे दिसून येते की, प्रिया तेंडूलकर जास्त अंतर्मुख होतात. 'स्व'चा शोध घेताना दिसतात. 'तिची गोष्ट' या लेखातून त्या व्यक्त करतात की, ''मी एक अभिनेत्री आहे. त्यामुळे सतत समाजात वावरताना वेगळी वागणूक मिळत गेली. त्यामुळे माझ्यातली 'मी' हरवत गेले.'' त्या इच्छा व्यक्त करतात की, मला या सभोवतालच्या गर्दीत हरवायचे आहे. या सगळ्यांच्यामधली एक व्हायचं आहे. 'अभिनेत्री' असण्यामुळे पैसा, प्रतिष्ठा, प्रसिद्धी, मान-मरातब सगळं काही मिळत गेलं, पण त्यात साधं, सरळ, सामान्य जीवन हरवलं, असं त्यांना वाटतं.*

*स्मिता तळवलकर स्वत:मधल्या मुलीचा, पत्नीचा, आईचा, गृहिणीचा आणि शेवटी अभिनेत्रीचा शोध घेतात. अशा अनेक भूमिका करताना जी काही कसरत करावी लागते, ती करत असताना आपल्या हातात काय मिळालं, काय हरवलं, काय निसटलं याचीही बेरीज-वजाबाकी करतात.*

*निशिगंधा वाड या क्षेत्रात आल्याबद्दल स्वत:ला सुदैवी समजतात. भूमिकेत जीव ओतून काम करणं, त्यातला आनंद भरभरून लुटणं, लोकांच्या प्रेमाचा स्वीकार करणं आणि असे अनेकविध जीवनानुभव टिपत स्वत:वर जाम खूष असणं, असे त्यांचे प्रसन्न, दिलखुलास व्यक्तिमत्त्व त्यांच्या लेखनातून दिसून येते.*

*एकूणच या अभिनेत्रींचे ललितलेखन वाचनीय आहे. अनेकविध अनुभवांचे दर्शन येथे होते. एका वेगळ्या जगाचा परिचय होतो. एखाद्या क्षेत्रातील व्यक्तिमत्त्वाची कशी जडणघडण होत जाते, हे कळून येते. दुरून दिसणारे जग किती खरं, किती खोटं हे कळते. या सगळ्या अभिनेत्रींचे 'कलावंत' म्हणून जगणे, कलेचे प्रेम, त्यांच्या अडचणी, प्रश्न, त्यांच्या समाजाकडून असलेल्या अपेक्षा, समाजाच्या त्यांच्याबद्दलच्या समजुती-गैरसमजुती या सर्वांचा आलेख त्यांच्या पुस्तकातून आलेला आहे.*

■

ज्योत्स्ना आफळे
७६/१०, 'सुयोग', शांतिशीला सोसायटी, लॉ कॉलेज रस्ता, पुणे ४. दूरध्वनी : ५४२४११६.



अनुक्रमणिका






# <u>हा तों साहित्यकुसुमांचा आस्वादु</u>

## आद्य तेलुगु साहित्यकाराच्या मराठी साहित्यातील 'कर्तृत्वाचा महामेरू'

❑

डॉ. अरविंद कोरबा

❑

*(कर्तृत्वाचा महामेरू : कै. के. व्ही. लक्ष्मणराव - चरित्र व वाङ्मय*
*लेखक व संपादक : प्रा. द. पं. जोशी , प्रकाशक : मराठी साहित्य परिषद, ईसामिया बझार, हैद्राबाद ५०० ०२७. आंध्रप्रदेश. पाने ३१२ मूल्य : रु. २५०/-)*

तेलुगु साहित्याचे 'मेरुमणी' म्हणून नावाजलेले आणि 'विज्ञान सर्वस्वमु' या प्रथम तेलुगु ज्ञानकोषाचे निर्माते कै. के. व्ही. कोमर्राजु वेंकट लक्ष्मणराव यांचा 'शिवाजी चरित्रमु' (१९०१) हा तेलुगु भाषेतील छत्रपती शिवाजीवरील पहिला आणि प्रमाण ग्रंथ मानला जातो. अवघ्या ४५ वर्षांचे आयुष्य लाभलेल्या (१८७६-१९२३) या महान साहित्यिकाचे लेखन मराठी व तेलुगु या दोन्हींमध्ये सारखेच तळपले होते. परंतु, एका भाषेतील त्यांचे कर्तृत्व दुसऱ्या भाषेतील वाचकांना फारसे माहीत नसावे, हा दैवदुर्विलासच म्हणावा.

आता तर मराठी भाषिकांनाही त्यांची ओळख विस्मृतीत गेली आहे. कारण, १९०२ मध्ये ते महाराष्ट्रातून आंध्रमध्ये गेल्यावर, त्यांचे महत्त्वाचे कार्य तेलुगुमध्येच झाले होते. या पार्श्वभूमीवर हैद्राबादच्या मराठी साहित्य परिषदेने, प्रा. द. पं. जोशी यांनी लिहिलेले लक्ष्मणरावांचे चरित्र आणि त्यांनीच संपादिलेले त्यांचे वाङ्मय प्रकाशित करून, एका महान व्यक्तीचे मराठी ऐतिहासिक व काव्यविषयक लेखन प्रकाशझोतात आणण्याचे मोठे कार्य केले आहे.

त्या मानाने आंध्रप्रदेशात कै. लक्ष्मणरावांच्या कार्याचा खूप दबदबा आहे. तिथे ग्रंथालय-चळवळ सुरू करण्यात त्यांचा मोठा सहभाग होता. हैद्राबादचे मध्यवर्ती 'श्री कृष्णदेवराय आंध्र भाषा निलयमु' अर्थात तेलुगु लायब्ररी (सन १९०१) स्थापन करण्यात ते आघाडीवर होते. त्यांचे सर्वांत मोठे कार्य म्हणजे तेलुगु ज्ञानकोष. दुर्दैवाने त्यांच्या निधनामुळे ते काम अर्धवट राहिले. 'विज्ञान सर्वस्वमु' नावाच्या त्या ज्ञानकोषाचा पहिला खंड १९१५ मध्ये निघाला. १९२३ मध्ये त्यांच्या मृत्यूपर्यंत त्याचे तीन खंड निघाले होते. पुढे त्यांच्या मित्रांच्या व अनुयायांच्या सहकार्याने १९६० पर्यंत त्याचे १४ खंड निघाले, असे समजते. त्यांचे समवयस्क व मित्र डॉ. श्री. व्यं. केतकर यांना महाराष्ट्रीय ज्ञानकोष रचण्याची प्रेरणा तेलुगु ज्ञानकोषापासून मिळाली होती, असे ते म्हणाले होते. सुदैवाने, आपल्या वाईच्या मराठी ज्ञानकोषाप्रमाणे, तिकडे १९८० च्या दशकात सुरू झालेल्या पोट्टी श्रीरामुलु तेलुगु विद्यापीठाने,

एक नूतन ज्ञानकोष तयार करण्यास सुरुवात केली असून, त्याचे पाच-सहा खंड निघाले आहेत. (लक्ष्मणराव हे साऱ्या दाक्षिणात्य भाषांतील पहिले ज्ञानकोषकार होते.)

कै. लक्ष्मणरावांचे दुसरे महत्त्वाचे कार्य म्हणजे उत्तमोत्तम पुस्तके प्रकाशित करण्यासाठी 'विज्ञान चंद्रिका मंडळी'ची स्थापना. दरवर्षी, प्रत्येकी १०० पानांची, चार पुस्तके फक्त चार-चार आण्याला तिने दिली होती.

हैदराबादच्या तेलुगु अकादमीचे, डॉ. अक्किराजु रमापतीराव यांनी त्यांचे तेलुगु चरित्र लिहिले असून ते 'विशालांध्र पब्लिशिंग हाऊस', विजयवाडा, यांनी जानेवारी १९७८ मध्ये प्रकाशित केले. कै. लक्ष्मणरावांचे इंग्रजी चरित्र, जी. कृष्णा यांनी लिहिले असून ते हैद्राबादच्या इंटरनॅशनल तेलुगु इन्स्टिट्यूटने १९८४ मध्ये प्रकाशित केले. त्यांच्या साहित्यावर किमान एक पीएच्. डी. प्रबंध तयार झाला असून त्याचे लेखक आहेत, डॉ. पालकुर्ति मधुसूदनराव. उस्मानिया विद्यापीठ, हैद्राबादला १९८० साली सादर केलेला तो प्रबंध त्यांनीच १९८४ साली प्रकाशित केला. मराठीत नुकत्याच प्रकाशित झालेल्या प्रस्तुत ग्रंथाचे वैशिष्ट्य म्हणजे त्यात आतापर्यंत कुठेही प्रसिद्ध न झालेले काही दुर्मिळ फोटो छापले आहेत. त्यातील एकात लक्ष्मणरावांच्या भार्या रामकोटांबा दिसतात. त्यांचे लग्न १८९९ मध्ये झाले होते.

प्रा. द. पं. जोशी यांनी मराठीतील लक्ष्मणरावांच्या पहिल्याच चरित्रात वाचकांच्या सोयीसाठी, सुरुवातीला 'आंध्र देशाचा इतिहास आणि भूगोल' दिला आहे. आंध्रच्या इतिहासात सातवाहन काल (इ. स. पूर्व २२५ ते इ. स. २००), वरंगळची काकतीय राजवट (इ. स. १००० ते १३२३ - देवगिरीनंतर अल्लाउद्दीन खिलजीने तिचा पाडाव केला) आणि हंपीचे विजयनगर साम्राज्य (इ. स. १३३६ ते १५६५ - जेव्हा दक्षिणेतील तुर्की शाह्यांनी तालिकोटाच्या लढाईत तिचा पराभव केला), हे तीन काल महत्त्वाचे आहेत. दुसऱ्या 'आंध्र देशातील साहित्य व इतिहास संशोधन परंपरा' या प्रकरणात प्रा. जोशी यांनी आद्य तेलुगु संशोधक वेंकट बोरय्या, मेकेंझी, बी. राघवाचार्यलु, वीरेश लिंगम् यांची ओळख करून दिलेली आहे.

के. व्ही. लक्ष्मणराव यांचा जन्म १८ मे १८७६ रोजी नंदीगुडेम् येथे झाला. त्यांचे वडील वेंकटप्पय्या मुनूगला संस्थानचे दिवाण होते. लक्ष्मणराव दोन वर्षांचे असताना त्यांच्या वडिलांचे निधन झाले. पदरात तीन मुलगे व एक मुलगी घेऊन त्यांची आई गंगाम्मा हिने आपला सावत्र पुत्र शंकरराव यांच्याकडे आसरा घेतला. शंकरराव नलगोंडा जिल्ह्यातील भोंगीर येथे काम करीत असत. तिथेच लक्ष्मणरावांचे प्राथमिक शिक्षण झाले. त्यानंतर पुढील शिक्षणासाठी ते नागपूर येथे आपली बहिण अच्चमांबाकडे गेले. तिचे पती भंडारु माधवराव मध्यप्रांतात नोकरीला होते. त्यावेळी १८८४-८५ साली लक्ष्मणराव ८ वर्षांचे होते. नंतर सुमारे १८ वर्षे ते नागपूरला राहिले. तिथल्या प्रख्यात 'नेएल सिटी हायस्कूल'मध्ये त्यांनी शिक्षण घेतले. नंतर ते मॉरिस कॉलेजमधून १८९९ साली बी. ए. झाले. नागपूरमध्ये त्यांनी हिंदी व इंग्रजी भाषांत शिक्षण घेतले. नंतर त्यांनी कलकत्ता विद्यापीठातून एम्. ए. (बहिर्गत) केले. विषय होते, तत्त्वज्ञान व संस्कृत.

महाराष्ट्रात आल्यावर लक्ष्मणरावांचे मराठी लेखन सुरू झाले. हरी माधव पंडित यांच्या

'विविध ज्ञान विस्तार' या नियतकालिकात ते लिहू लागले. बहुशा इतिहास व काव्यमीमांसा या विषयावर ते लिहीत. पुढे ते त्या मासिकाचे सहसंपादक झाले.

आपले वडील जिथे दिवाण होते, त्या मुनूगला (जिल्हा : खम्मम्) संस्थानच्या राजाने लक्ष्मणरावांना १९०२ मध्ये दिवाण नेमले व त्यांनी नागपूरहून आपला मुक्काम आंध्रमध्ये नेला. पुढे संस्थानाधिपतींच्या हुकूमावरून ते मद्रासला गेले व तिथे संस्थानाची कायदेविषयक कामे बघू लागले. मुनूगला व मद्रासला त्यांनी आपली तेलुगु साहित्यसेवा सुरू केली.

नागपुरातून आंध्रकडे प्रयाण केल्यावरही लक्ष्मणराव स्फूट मराठी ऐतिहासिक लेखन करत राहिले. तसेच काव्यपरिशीलनही. त्यांचा अखेरचा निबंध होता, 'दंडीची अवंती सुंदरी कथा.' मृत्यूपूर्वी काही तास अगोदर त्यांनी हे लेखन पूर्ण केले होते. त्यांचा मृत्यू १३ जुलै १९२३ रोजी झाला. मृत्यूसमयी त्यांच्या छातीवर गो. स. सरदेसाई यांचे 'मराठी रियासत' हे पुस्तक होते. डॉक्टरांनी त्यांना मनाई केलेली असतानाही 'तुम्ही अजून का वाचताहात ?' असे विचारले असता लक्ष्मणराव उत्तरले, 'माझे खरे औषध हेच आहे.'

तेलुगु ज्ञानकोषाच्या विषयांचे वर्गीकरण अकारविल्हेरित्या करण्यात आले होते. प्रत्येकी ६०० पानांच्या तीन खंडांत लक्ष्मणरावांनी ३३ लेख लिहिले हेते. त्यांपैकी १७ ऐतिहासिक, ११ वाङ्मयावर आणि ९ धर्मशास्त्रावर होते. त्याशिवाय इतरत्र त्यांनी किमान १७ स्वतंत्र तेलुगु लेख व काही इंग्रजी निबंध लिहिले.

विज्ञान चंद्रिका मालेत, १९१६ पर्यंत, त्यांनी ४१ पुस्तके प्रकाशित केली होती. त्यातली काही त्यांनी लिहिली होती. लोकमान्य टिळकांच्या 'आर्क्टिक होम इन द वेदाज्' आणि 'ओरायन' यांच्या आधारे लिहिलेले 'वैदिकी निलयमु' (निवास) हे त्यापैकी एक होते. (ही माहिती तेलुगु अकादमीचे माजी डायरेक्टर बी. राधाकृष्णा यांच्या सौजन्याने.)

प्रा. द. पं. जोशी यांच्या पुस्तकात लक्ष्मणरावांच्या तेलुगु व मराठी लेखनाचा रसास्वाद घेतलेला आहे. परंतु, तारखांच्या बाबतीत थोडा घोळ दिसतो. पान १९ वर, ते १८९५ साली बी. ए. व १८९७ साली एम्. ए. झाले, असे आहे. (त्यांच्या तेलुगु व इंग्रजी चरित्रात १८९९ व १९०२ हे सन आहेत.)

प्रा. द. पं. जोशी यांनी पुस्तकाच्या पहिल्या भागात, सुमारे ७० पानांत लक्ष्मणरावांचे आटोपशीर चरित्र लिहिले आहे. उरलेल्या सुमारे सव्वादोनशे पानांत त्यांनी लक्ष्मणरावांचे सारे उपलब्ध मराठी वाङ्मय छापले आहे. त्याचे पुनर्मुद्रण मूळ शंभर वर्षांपूर्वीच्या लेखनपद्धती व शुद्धलेखनानुसार कायम ठेवले आहे.

या दुसऱ्या भागाची सुरुवात 'प्रिये !' या मृत भार्येस उद्देशून लिहिलेल्या एका कवितेने होते. ती कविता १८९५ साली 'करमणूक' साप्ताहिकात प्रसिद्ध झाली होती. त्यावेळी त्यांचे लग्नही झाले नव्हते. त्या काळी रूढ होत चाललेल्या काव्याभिरुचीची टर उडविण्यासाठी त्यांनी ही कविता लिहिली होती. त्यातली काही वाक्ये अशी :

"प्रिये ! अशी हाक कुणास मारू ?
*'ओ' कान देशी मजलागि भीरु ?"*

*विद्या जरी फार तुला न येई*
*तू जाणसी किंचित सर्व काही !*
*संपूर्ण तू जाणसि आंध्र भाषा*
*किंचिन्महाराष्ट्रहि आंग्ल भाषा !!*

*(मॉरिस कॉलेज, नागपूर, २९।४।१८९५)*

त्यानंतर लक्ष्मणरावांचे सात मराठी लेख व एक इंग्रजी निबंध आहे. शिवाय त्यांच्या काही लेखास प्रत्युत्तर, चर्चा व टिप्पणी म्हणून वि. का. राजवाडे, हरी माधव पंडित (संपादक : विविध ज्ञान विस्तार) प्रभृतींचे साहित्य आहे.

'थोरल्या शाहू महाराजांस शिवाजी हे नाव होते की नव्हते ?' हा लक्ष्मणरावांचा लेख म्हणजे इतिहासाचार्य वि. का. राजवाडे यांच्या 'मराठ्यांच्या इतिहासाची साधने' (दुसरा खंड) यात दिलेल्या 'शाहू' या शब्दाची त्यांनी दिलेल्या व्युत्पत्तीवर टीका आहे. तो लेख 'भारतवर्ष'मध्ये १८९७ मध्ये प्रसिद्ध झाला. त्याला ग्रंथमालेत लिहिलेले प्रत्युत्तर, त्यास लक्ष्मणरावांचे प्रत्युत्तर असे एकंदर चार लेख या ग्रंथात छापलेले आहेत. राजवाडे यांच्या व्युत्पत्तीप्रमाणे संभाजीच्या मुलाचे नाव 'साव - शाव' किंवा 'शहाजी' असावे व 'शाहू' हा शब्द त्याचा अपभ्रंश असावा. अर्थात मुलाला संभाजीने आजाचे नाव दिले होते. लक्ष्मणरावांचे म्हणणे हे आहे की, ते मूळ 'शिवाजी' असावे. त्यासाठी दोन्ही पक्षांनी अनेक आधार दिले आहेत. त्यामुळे चर्चा उद्‌बोधक झाली आहे.

त्यानंतर, बापूसाहेब कुरुंदवाडकर यांच्या 'पंचवटीस्थलनिर्णय' या पुस्तकावर 'विविधज्ञानविस्तार'चे संपादक हरि माधव पंडित यांचा लेख आणि लक्ष्मणराव यांचा त्याच विषयावर एक विस्तृत, ५१ पानांचा लेख छापला आहे. महाराष्ट्रीयांची समजूत अशी आहे की, पंचवटी एकच आहे व ती नाशिकजवळ गोदावरी तीरावर आहे. त्याला लक्ष्मणरावांचे मजेशीर उत्तर आहे की, 'प्रस्तुत वादाचा पूर्णपणे विचार करावयाचा असेल, तर हिंदुस्थानातल्या भाषेत व इंग्रजी भाषेत या सर्व लेखांची भाषांतरे होऊन सर्व हिंदुस्थानावर हा वादविवाद पसरला पाहिजे... आता पंचवट्या दोन झाल्या. कदाचित हा वाद देशोदेशी पसरला म्हणजे पंचवट्यांची संख्या वाढत जाईल... म्हणजे महत्त्वाच्या अशा एका जुन्या स्थलाचा शोध लागेल.

कै. लक्ष्मणरावांचे मराठी साहित्यातील एक महत्त्वाचे कार्य आहे त्यांनी सहसंपादित केलेले मोरोपंतांचे 'कर्णपर्व'. त्यांचे सहसंपादक होते कै. न. चिं. केळकर. त्याविषयी, लक्ष्मणरावांच्या निधनानंतर प्रसिद्ध झालेल्या तिसऱ्या आवृत्तीच्या संपादकांनी दिलेला त्यांचा परिचय व आणखी एक परीक्षणात्मक लेख, 'हे कर्णपर्व की नरनारायण विजयग्रंथ ?' दिलेले आहेत.

'आंध्रवाङ्मय' या लेखात लक्ष्मणरावांनी तेलुगु भाषेचे मार्दव, वैशिष्ट्य आणि काव्य करण्याच्या रीतीवर प्रकाश पाडला आहे. तसेच प्रख्यात तेलुगु कवी नन्नयभट्ट, तिक्कनसोमयाजी, एरप्रिगड, नाचनसोम, श्रीनाथ, आणि कृष्णदेवराय या विजयनगर सम्राटाच्या पदरी असलेले



अनुक्रमणिका






'अष्टदिग्गज' यांच्या वाङ्मयाचा परिचय करून दिलेला आहे. 'मोल्ला' या कुंभार जातीच्या कवयित्रीची पण ओळख दिली आहे. तिने लिहिलेले रामायण 'मोल्लारामायण' या नावाने आंध्र देशात प्रसिद्ध आहे.

इतिहासाचार्य राजवाड्यांनी संपादित केलेल्या 'राधामाधव विलासचंपू' या काव्यग्रंथावर लक्ष्मणरावांनी लिहिलेल्या दोन लेखांपैकी एक इथे दिला आहे. त्याला राजवाड्यांनी दिलेले उत्तरही छापले आहे.

लक्ष्मणरावांचा अखेरचा लेख, 'महाकवी दंडीची अवंति सुंदरी कथा' हा त्यांच्या निधनानंतर ऑगस्ट १९२३ मध्ये प्रसिद्ध झाला. तोही इथे छापला आहे.

शेवटी, पुलकेशिन (दुसऱ्या) याच्या कोप्पारम येथील तीन ताम्रपटांवर लक्ष्मणरावांचा इंग्रजी लेख आहे. अशा या उत्तुंग व्यक्तिमत्त्वाचे सम्यक् दर्शन करून दिल्याबद्दल प्रा. द. पं. जोशी आणि हैद्राबादची मराठी साहित्य परिषद यांचे आभार मानावेत, इतके थोडे आहेत.

■

डॉ. अरविंद कोरबा
४ अ, गायत्री, आळंदी रोड, विश्रांतवाडी, पुणे ४११ ००६. दूरध्वनी : ६६९७१२३





अनुक्रमणिका









॥ ॐ नमो श्रीआद्या ॥

श्रीज्ञानदेव सिद्धबेट तपोवन

ज्ञान-योग-अध्यात्म विद्यापीठ प्रतिष्ठानचा एक उपक्रम,

# ॥ बापरखुमादेविवरु ॥

सद्‌गुरु श्रीसंत ज्ञानेश्वर महाराजांच्या तत्त्वज्ञान आणि साहित्यपरंपरेच्या सर्वांगीण अभ्यासाला वाहिलेले एकमेव मराठी मासिक

**प्रेरक आणि संस्थापक : प.पू.श्री.श्री.द.(मामा) देशपांडे**

संपादक : शिरीष शांताराम कवडे; सहसंपादक : सौ.शकुंतला जयंत आगटे

कार्यकारी संपादक : डॉ.प्रल्हाद वडेर; व्यवस्थापक : अरविंद वसंतराव अवचट

**वर्षारंभ अंक : प्रत्येक विजयादशमीला (आश्विन महिन्यापासून.)**

**वार्षिक शुल्क : १७५ रु.; द्विवार्षिक शुल्क : ३०० रु.**

**प्रथम वर्षाचे १२ अंक : दोन खण्डात (हार्ड बाऊंड) उपलब्ध.**

प्रथम खण्ड पूर्वार्ध (अंक १ ते ६); प्रथम खण्ड उत्तरार्ध (अंक ७ ते १२)

**मूल्य : दोन्ही खण्डांचे एकत्र रुपये ३०० फक्त (एकत्र सवलत मूल्य रुपये २५० फक्त.)**

**☐ 'बापरखुमादेविवरु' मासिकाची वैशिष्ट्ये ☐**

- श्रीज्ञानेश्वरीच्या पाठभेदांची चिकित्सक चर्चा.
- श्रीमाउलींच्या साहित्यातील साधनरहस्ये उलगडून दाखविणारे लेख.
- अभ्यासक, चिकित्सक, भाविक आणि तत्त्वनिष्ठ; तसेच साधक आणि सिद्धांचेही परस्पर-संवादाचे लडिवाळ व्यासपीठ.
- संदर्भमूल्ये असलेले नामवंतांचे दर्जेदार लेखन.
- माउली भक्तांची, सिद्ध संतांची परिचयात्मक, वेधक चरित्र-टिपणे.
- साहित्य, संस्कृती, सौंदर्य, तत्त्वज्ञान, अंतरानुभूती आदी विविध अंगांनी श्रीसंत ज्ञानेश्वर महाराजांच्या समग्र वाङ्मयाचा चिकित्सक अभ्यास.
- सद्‌गुरु श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या परंपरेतील अप्रकाशित-प्रकाशित साहित्याचाही चिकित्सक परामर्श.



श्रीपादराजं शरणं प्रपद्ये



**॥ श्रीवामनराज प्रकाशन ॥**

'श्रीगुरुकृपा', आनंदनगर, हिंगणे खुर्द, सिंहगड रस्ता, पुणे ४११०५१

**दूरध्वनी : (०२०) ४३५८१२३, ४३५८१२४, ४३५६९१९;**

**टेलिफॅक्स : ४३५६७३८; ई-मेल : ssmandal@pn3.vsnl.com**



अनुक्रमणिका







# एक सत्यान्वेषी शैक्षणिक आत्मकथन

❑

डॉ. अ. पां. दाणी

❑

*(माझे शैक्षणिक अनुभव व काही विचार : प्रा. डॉ. वि. ना. ढवळे प्रतिमा प्रकाशन, पुणे २००१, पृष्ठे १३६. मूल्य १००/- रुपये.)*

फर्गसन् महाविद्यालयातील इंग्लिश वाङ्मयाचे प्रथितयश प्राध्यापक आणि प्राचार्य डॉ. वि. ना. ढवळे ह्यांचे शैक्षणिक आत्मकथन नुकतेच प्रसिद्ध झाले आहे. ऑक्सफर्ड विद्यापीठाची डी. फिल्. पदवी संपादन करून अध्यापन आणि संशोधनाच्या क्षेत्रात लक्षणीय कार्य करणाऱ्या डॉ. ढवळ्यांचे आत्मवृत्त हे परिचित आत्मवृत्तांपैकी नाही. प्रामुख्याने त्यामध्ये त्यांनी शैक्षणिक क्षेत्रातील प्रदीर्घ अनुभवांवर आधारलेल्या शैक्षणिक विचारांचे आणि समस्यांचे विवेचन केलेले आहे.

आत्मचरित्रात लेखक आपले जीवनविषयक अनुभव आणि स्वत:चे व्यक्तिमत्त्व यांचा शोध घेत असतो. परंतु, निर्भयपणे आणि प्रामाणिकपणे जीवनातील सत्यांचे आणि त्यांच्या आत्मानुभूतीचे निरीक्षण करून त्यांचे यथार्थ प्रतिपादन करणे, हा यशस्वी आत्मचरित्राचा आत्मा आहे. पण असे तटस्थ अवलोकन आणि प्रतिपादन सहजसाध्य नसते, ह्याची जाणीव डॉ. ढवळे ह्यांना आहे. ते म्हणतात, ''मनुष्याच्या संकल्पात आणि संकल्पसिद्धीत बरेच अंतर असते. मनुष्याला सत्य मनोगत व्यक्त करावयास परमेश्वर नावाच्या अदृश्य शक्तीचे साहाय्य लागते. असे साहाय्य मला लाभले किंवा नाही, हे सांगता येणार नाही.'' त्यानुसार शैक्षणिक अनुभव आणि विचार ह्यांना केंद्रबिंदू मानून त्या अनुषंगाने येणारे आवश्यक आत्मवृत्तच आपण देत आहोत, असे त्यांनी आपल्या मनोगतात प्रथमच स्पष्ट केले आहे. आपले सत्यान्वेषी आत्मवृत्त परिपूर्ण आहे, अशी ग्वाही आपण देऊ शकत नाही, असे प्रामाणिक निवेदन त्यांच्या पारदर्शी व्यक्तिमत्त्वाची साक्ष देते.

''विषय व लेखनतंत्र या बाबतीत मराठी आत्मचरित्रपर साहित्य प्रगत झाले असले तरी 'सत्य असत्यासी मन केले ग्वाही' हा दृष्टिकोन कमी आढळतो आणि खऱ्या व्यक्तिमत्त्वाचा वेध अल्पांशाने घेतलेला दिसतो,'' हे रा. ग. जाधव ह्यांचे मत बरेचसे ग्राह्य वाटते. **(मराठी विश्वकोश** खंड - २, पृष्ठे ११-१३) साहित्यिकांच्या आत्मचरित्रांचा विचार केल्यास तर ते सार्थ वाटते. अत्रे आणि फडके ह्यांची आत्मचरित्रे बहुधा स्वत:च्या विशिष्ट प्रतिमा पूर्वनिश्चित करून आत्मकथन केल्यासारखी वाटतात व त्यात निर्भयपणे जीवनविषयक सत्यांचे आणि स्वत:चे अवलोकन आणि प्रतिपादन करण्याचा निर्धार आढळत नाही. केवळ कलात्मक शैलीसौंदर्याने युक्त अशा निवेदन-पद्धतीने रंजकता वृद्धिंगत करावी, असा मुख्यत: प्रयत्न

दिसतो. आत्मचरित्राचे सत्यान्वेषण कदाचित् समकालीन चिकित्सक करू शकतील, परंतु भूतकाळाचे असे सत्यशोधन करणे इतरांना सहज शक्य नसते. प्रा. बाळ गाडगीळांचे **'वळचणीचे पाणी'** हे आत्मचरित्र साहित्यिकाचे आत्मचरित्र आहे, ते या अर्थाने. त्यांनी आपल्या आत्मचरित्रातील व्यक्ती, घटना, प्रसंग इ. यांचे प्रतिपादन करताना सत्यशोधनाला महत्त्व दिलेले नाही, असे त्यांच्या समकालीनांना वाटणे साहजिक आहे. सत्यान्वेषणाची ग्राह्यता व यथार्थता वाढावी, असा प्रयत्न विश्राम वेडेकरांच्या **'एक झाड, दोन पक्षी'** ह्या आत्मवृत्तात आढळतो. विसाव्या शतकात स्त्रियांच्या आत्मवृत्तातही हा प्रयत्न काही प्रमाणात आढळतो. शंकरराव खरातांचे **'तराळ-अंतराळ'** सत्यान्वेषणाच्या पुष्कळ जवळ जाते.

डॉ. ढवळे ह्यांनी आपल्या शिक्षणक्षेत्रातील प्रदीर्घ अनुभवावर आधारलेल्या शिक्षणविषयक समस्यांचा विचार मूलगामी पद्धतीने केला आहे. शिक्षणाची संकल्पना, ध्येये, प्राथमिक, माध्यमिक, महाविद्यालयीन, विद्यापीठीय स्तरावरील शिक्षण, शिक्षणाचे शिस्तीशी व समाजाशी असणारे संबंध आणि स्त्रीशिक्षण अशा विविध पैलूंचे तर्कनिष्ठ पद्धतीने विवेचन करून काही निष्कर्ष मांडण्याचा प्रयत्न त्यांनी केलेला आहे. त्यांचा अनुभव मुख्यत: शाळा, कॉलेजातील पारंपरिक बौद्धिक शिक्षणाशी संबंधित असल्याने 'सर्व शिक्षणाचा पाया बौद्धिक शिक्षण हाच असतो' असे मत ते प्रकट करतात. आपली मते व निष्कर्ष ह्यांना योग्य त्या आधारांचा व संदर्भग्रंथांचा निर्देश प्रत्येक ठिकाणी करण्याची शिस्त त्यांनी कटाक्षाने पाळली आहे.

कुशल अध्यापन, विद्वत्ता व ज्ञानार्जनाचा व्यासंग ह्यांचा वारसा तीर्थरूपांकडून मिळणे आणि पुण्यात प्राथमिक, माध्यमिक आणि महाविद्यालयीन शिक्षण मिळणे, तसेच निष्णात शिक्षक लाभणे, ह्या सद्भाग्याबरोबरच तत्कालीन सामाजिक व आर्थिक परिस्थितीनुसार दारिद्र्याचे आणि इतर आपत्तींचे साहचर्य असण्याच्या दुर्भाग्याचा उल्लेख डॉ. ढवळे ह्यांनी केला आहे. आपल्या जडणघडणीत ज्यांनी महत्त्वाचा वाटा उचलला व ज्यांच्या सहकार्याने अडचणींवर मात करता आली, त्यांच्या कृतज्ञतापूर्वक उल्लेखात गो. कृ. मोडकशास्त्री, प्रो. अय्यर, प्रो, दांडेकर, प्रो. जी. एच्. केळकर, प्रि. महाजनी व प्रि. डी. जी. कर्वे ह्यांचा समावेश त्यांनी केला आहे.

आत्मवृत्तातील सर्वात हृद्य भाग हा ऑक्सफर्ड येथील शिक्षणानुभवाचा आहे. तेथील व्याख्याने, सत्रनिबंध (Tutorials), चर्चासत्रे (Seminars) यांची वैशिष्ट्ये, तसेच शिस्त - परंपरांचा उल्लेख करताना डॉ. ढवळे त्या शिक्षणप्रणालीची तुलना प्रचलित भारतीय शिक्षण पद्धतीशी करून भारतीय शिक्षण पद्धतीतील उणीवांची आणि दोषांची अपरिहार्यता येथील सामाजिक, राजकीय, शैक्षणिक आणि सांस्कृतिक संदर्भातच आहे, असे प्रतिपादन करतात. इंग्लिश पद्धतीतील 'बोर्डिंग स्कूल'चे वैशिष्ट्य आणि विद्वत्तेचे सर्वोच्च स्थान यांचा उल्लेख करून सर्वांसाठी आणि समाजाभिमुख शिक्षण यांचा विसर न पडता विद्यापीठांनी ज्ञानार्जन व विद्वत्ता यांची परंपरा जतन करण्याचे काम आपल्याकडील विद्यापीठांना करावयाचे आहे, ही गोष्ट ते आवर्जून सांगतात. संशोधन अध्यापन, व्यवस्थापन, परीक्षा पद्धती यांचा विचार










करताना सामाजिक, मानसशास्त्रीय व नैतिक संदर्भ विचारात घ्यावे लागतात. विद्यार्थी, शिक्षक-पालक व्यवस्थापन ह्या प्रत्येक घटकाच्या स्थैर्यासाठी व उन्नतीसाठी शिस्त आवश्यक असून सर्व घटक परस्परपूरक व परस्परावलंबी आहेत. नव्या शतकात शिक्षण आंतरविद्याशाखीय (Inter disciplinary), बौद्धिक स्वातंत्र्याभिमुख, ज्ञानार्जनाच्या सातत्यामुळे आनंददायी, चारित्र्यसंपन्न, उदारमतवादी आणि विद्यार्थीकेंद्रित असावे, असा आशावाद डॉ. ढवळे ह्यांना वाटतो.

ह्या शैक्षणिक आत्मचरित्रात डॉ. ढवळे आदर्श शिक्षक, साक्षेपी शिक्षणतज्ञ दिसतात, तसेच त्यांच्या व्यक्तिमत्त्वातील नम्रता, ऋजुता, बुद्धिनिष्ठता, नर्मविनोदप्रचुरशैली हे गुणही प्रकर्षाने जाणवतात. त्यांचा उपरोध आणि उपहास प्रसन्न वाटतात. कारण त्यात कोठेही उपमर्द किंवा कटुता नाही. (विशेषतः पृष्ठे २३, ४१, ५१, ५७, ९०, ९१ पहावीत.)

प्रतिमा प्रकाशनचे श्री. अरुण पारगांवकर यांनी पुस्तकाचे स्वरूप आकर्षक ठेवले आहे.

■

डॉ. अ. पां. दाणी
प्लॉट क्र. १४, युनायटेड वेस्टर्न सोसायटी, कर्वेनगर, पुणे ४११ ०५२.फोन : ५४४५५१६.

---

## मुक्ताई पुरस्कार

'चेतना प्रकाशन, अमळनेर'च्या विद्यमाने दरवर्षी वर्षभरातील वैचारिक-समीक्षात्मक एका ग्रंथाची मुक्ताई पुरस्कारासाठी निवड करण्यात येते. या वर्षी प्रा. द. ता. भोसले यांच्या 'संस्कृतीच्या पाऊलखुणा' या ग्रंथास देण्यात आला असून, या वर्षापासून पुरस्काराचे स्वरूप रु. एक हजार व रु. एक हजारांची पुस्तके, शाल, मानचिन्ह इत्यादी देण्यात येणार आहे.

दरवर्षी हा पुरस्कार दि. १४ फेब्रुवारी रोजी जाहीर केला जातो.

आतापर्यंत मुक्ताई पुरस्कार श्री. अविनाश धर्माधिकारी, डॉ. बाबा आढाव, प्रा. डॉ. भा. ज. कविमंडन, डॉ. भा. ल. भोळे, डॉ. गजमल माळी, डॉ. लीला दीक्षित यांना देण्यात आला आहे.

या पुरस्कारामुळे आपलाच गौरव होत असल्याची भावना चेतश्री प्रकाशनाचे सूत्रधार श्री. वा. रा. सोनार यांनी व्यक्त केली आहे.

प्रा. द. ता. भोसले यांचे मन:पूर्वक अभिनंदन.

लवकरच अमळनेर येथे समारंभपूर्वक हा पुरस्कार देण्यात येणार आहे.

---

## स्वागत

**राबर्टसनचं माणिक :** मूळ लेखक-सत्यजित राय, मराठी अनु.-नीलिमा भावे.

**गोमंतकीय कविता-२००१ :** संपा. अशोक मणगुतकर, प्रकाशक-प्रकाश शंकर वेलीप. केपे-गोवा.

**स्वदेशी :** राज अहेरराव, सुयश प्रकाशन, नवी सांगवी.

**संध्यारंग :** डॉ. अमला गोडे (इंदौर), प्रकाशक महाराष्ट्र साहित्य सभा, इंदौर.

---



अनुक्रमणिका

# अजब तुझे सरकार : प्रत्ययकारी काव्यसंग्रह

❑

**श्री. पु. गोखले**

❑

*(**'अजब तुझे सरकार'** : अनुवाद : श्रीमती अनुराधा गानू, 'ग्रंथाली' प्रकाशन, दादर, मुंबई, २८.)*

अनेक क्षेत्रांत अग्रगण्य स्थान मिळविलेले माननीय प्रभाकर देवधर यांचा **'कॅपिटल पनिशमेंट'** नावाचा इंग्रजी कवितासंग्रह आणि **'अजब तुझे सरकार'** हा श्रीमती अनुराधा गानू यांनी त्याचा केलेला मराठी अनुवाद अचानकपणे माझ्या हातात पडला. त्याचबरोबर त्याच्यावर मी काही ना काही लिहावे, असा आग्रहही आला.

दोन्ही कविता वाचताना अनेक विचार मनात गोंगावू लागले. 'कवि हा द्रष्टा असतो' हे वाल्मिकी ऋषींचे वचन आठवले. 'जे देखे न रवि ते देखे कवि' ही अतिपरिचित म्हण समोर आली. तेवढ्याने भागले नाही ! 'कवितेचं भाषांतर करताच येत नाही. त्यासाठी नवीन कविताच करावी लागते', हे जर्मन तत्त्वज्ञ शोपेन हॉवरचं प्रतिपादन मनाला धक्के देऊ लागलं ! 'जुन्या कवितांचं भाषांतर करणं हे मेलेल्याला पुन्हा मारण्यासारखं आहे' असं 'एफ्राम मोझेस कुट्ट' यांनी म्हटलं असलं तरी काय झालं! असा विवेक करून देवधरांच्या कविताही तशा नव्याच असल्यामुळे अनुराधा गानू यांनी हाणामारी किंवा मारामारी तरी कशी केली आहे, याचं कुतूहल जागं होऊन मी इंग्रजी आणि मराठी कविता वाचायला सुरुवात केली.

राजधानी दिल्लीचा मला पुष्कळ परिचय झालेला असल्यामुळे 'मख्ख दिल्ली' नावाच्या पहिल्याच विभागातली कविता वाचली. मी खरोखरच थक्क झालो. कविता जुनी असो की नवी असो. मूळ इंग्रजी काव्य असो की त्याचं मराठी रूपांतर (!) केलेलं असो ! आमच्या मख्ख किंवा निगरगट्ट दिल्लीला अनेक शतकं मार खाणंच अंगवळणी पडलं आहे. तलवारींनी आणि तोफगोळ्यांनी झालेला भडिमार यांना दिल्लीनं तोंड दिलं, मोगलांना मराठ्यांनी पिटाळलं, मराठ्यांना हाकलून साहेब आला, महायुद्धानं साहेब गलितगात्र झाला, दिल्लीतून साहेबानं पलायन केलं, गोरासाहेब जाऊन काळासाहेब आला, गोऱ्याची काळी सावली राहिली, तरीही दिल्ली मख्ख आणि मठ्ठच राहिली. मग आलं काय ?

*आली... तपशीलांची खोगिरभरती*
*मिळे न ज्यातुन काहि माहिती*
*... हवी माहिती ज्ञानासाठी*
*ज्ञान हवे हे कामासाठी...*

*संगणकाचे नवयुग आले*
*तंत्रज्ञानहि प्रतिदिनि बदले*

*... आजवरी या नवतंत्राने*
*काय दिले या समाज-देशा ?*

असे विचारून कवि सांगतो,

*'पढीक मूर्ख, फसव्या गरजा*
*पश्चिम संस्कृती भाषा वेषा !*

कवी असा आक्रोश करीत असताना त्याला आधुनिक 'इडियट बॉक्स' नजरेसमोर उभी राहणे साहजिकच होते !

*परमेशाहुन महान शक्ती*
*आज कोणती (ते) जाणा*

*आणि विचारतो,*

*कुठे चालला देवदर्शना ?*
*दूरदर्शना या ना !*
*कृपा करी का कोप करी ?*
*हे त्याला कसे कळावे ?*
*किल्लीच्या बाहुलीपरी तो, फिरवू तसा धावे !*

सतत घरोघर गरजणाऱ्या दूरदर्शनचा जनतेच्या मनावर जो पगडा कळत नकळत बसला आहे, त्यातले धोके कसे आहेत, त्याबद्दल कवी कळवळून लिहितो,

कपडालत्ता, विचार, गरजा
*जाणिव तशाच सुविधा*
*सगळे ठरवी तुमच्यासाठी*
*...कल्पक, आणि कलात्मक शक्ती याची कोण ओळखे ?*

दूरदर्शनच्या लाभापेक्षा चाललेल्या हानिकारक परिणामांचे कवीने फार सुंदर दर्शन घडविले आहे. ते असे :

*मस्त जेवुनी सुस्त जाहले*
*टीव्ही पुढती सगळे जमले*
*नकोत चर्चा, नकोत विचारहि*
*अक्कलखांती कुलुप लावले*

घराघरात पूर्वी चालणारा संवाद आज थांबला असून त्यांची जागा

*नशा चढविती विविध वाहिन्या*
*ध्यास आज ना कुणा वेगळा !*

*सर्वांना सतत सलणारे असे दुःख व्यक्त केले आहे !*

'दूरदर्शन' विषयी इंग्रजी कवितेत श्री देवधर म्हणतात,

*Our own distant vision,*
*is more distant*
*with less of vision !*



अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



सुस्त आणि मख्ख दिल्ली राजधानीत श्री. प्रभाकर देवधर पाच वर्षे राज्यकर्त्यांच्या जवळ राहिले. इलेक्ट्रॉनिक आयोगाचे अध्यक्ष असल्यामुळे राज्यमंत्र्याचे पद भूषवित होते. पाच मंत्रालयांचे सचिव त्या आयोगात सहभागी होते. त्यामुळे खऱ्या सत्ताधाऱ्यांशी वारंवार संबंध येत असल्यामुळे आपले लोकशाही सरकारचे कार्य कसे चालते, हे त्यांना जवळून दिसत होते, समजत होते. आयोगाला सल्ला देण्यावाचून इतर अधिकार नव्हता. तरी ते स्वत: पंतप्रधान राजीव गांधी यांचे खास मित्र असल्यामुळे त्यांना विशेष स्थान होते ! असा अधिकार वापरून आपली तुंबडी भरून घेत समाधान मानण्याइतकी देवधर यांची क्षुद्र भूमिका नव्हती. त्यांची मनाची ठेवण एका शास्त्रज्ञाची होती. आधुनिक तंत्रज्ञानाच्या साहाय्याने स्वतंत्र हिंदुस्थानाला जगातील प्रगत देशांसारखे मानाचे स्थान मिळवून देण्याच्या उच्च ध्येयाच्या स्वप्नाने ते पछाडलेले होते! राजधानीत येनकेन प्रकाराने निवडून गेलेले सत्तांध राजकीय नेते आणि त्यांनाही गुंडाळून ठेवणारे नोकरशहा यांच्या मगरमिठीत देश सापडला होता. या कराल दाढांत अनेकांच्या अनेक स्वप्नांचा चुराडा होत असलेला ते खिन्न आणि क्रुद्ध होऊन बघत होते. देवधरांचे स्वत:चेही स्वप्न भंगले होते आणि उमेद खचली होती. अशा व्यथित अवस्थेत त्यांच्या मनाने काव्याचा आधार शोधलेला दिसतो. कदाचित त्यांनी आपल्या व्यथा आपल्या पंतप्रधान मित्राजवळ उघडही केल्या असतील, पण तरुण राजीव गांधी तरी मुक्त कोठे होते ? त्यांनाही स्वार्थी नोकरशहांनी आणि होयबा खुषमस्करी मंडळींनी वेढून टाकलेले होते. राजधानीतील काळात देवधर किती अस्वस्थ असतील, याची कल्पना आपल्याला त्यांनी काव्यसंग्रहाला दिलेल्या 'कॅपिटल पनिशमेंट', 'देहदंड' या नावावरूनच लक्षात येते.

व्यथित आणि व्यग्र मन मोकळे करीत कागदावर उतरलेल्या काव्यपंक्तींचा तितक्याच समर्थपणे केलेला अविष्कार 'अजब तुझे सरकार' या श्रीमती अनुराधा गानू यांच्या भाषांतरात दिसतो.

एखादी नवी कल्पना सुचविली की, 'बॉस' शाबासकी देऊन स्तुती करतो, उत्साहाने सगळे कामाला लागले की, नाकर्ता हुकूमशहा शिताफीने टोलवाटोलवी कशी करतो, याचे वर्णन 'फाईल प्रतीक्षा' या कवितेत सापडते.

*तपशील, माहिती, फॅक्टस् अँड फिगर्स*
*काही न सोडले करण्याबिगर*
*सुंदर राबण्याजोगी योजना*
*ऐटीत सादर केली त्यांना*
*पुन्हा उधळली स्तुतिसुमने*
*हरकून गेली आमची मने*

हसत हसत अशी फाईल सचिवाच्या हातात दिल्यावर ती आता पुढे जाईल, असे साहजिकच वाटते.

*पण हाय् रे हाय,*
*तो तर मागे नवी माहिती !*

*ती पुरविली तरी काय होते ?*

*त्यावर सरती अनेक मास*
*तरी न संपला सासुरवास !*

*फाईलीच फाईली झाल्या तरी योजना तशीच अडकून राहिल्यावर काय होणार ?*

*राग आला, संताप झाला*
*चीड तर अगदी अनावर झाली*
*निषेध केला, तक्रार नोंदली*
*तरी न फाईल जराहि हलली !*

अशा प्रकारांनी कामे करणारांचा उत्साह कसा हाणून पाडण्यात येतो, ते फाईलींचे विश्व जवळून पाहायला हवे, असे कवी स्पष्ट सांगतो. एखाद्याने फारच चिकाटी धरून पाठपुरावा केला तर काय होते ?

*फारच टुरटुर करणाऱ्याची*
*टिंबक्टूला बदली !*

इंग्रज मागे ठेवून गेलेली नोकरशाही लोकशाहीची जणू सवत झाल्यासारखे वर्तन करते. त्याचे वर्णन 'उदे उदे ग नोकरशाही' या कवितेत कसं सुंदर केलं आहे, त्याचा नमुना असा :

*सुमार करणे प्रत्येकाला*
*ध्येय असे हे तिचे निरंतर*
*दगडालाहि फुटेल पाझर*
*द्रवण्याआधी हिचेच अंतर*

अधिकाराची नशा चढलेल्यांना ढोंगी आणि लबाड मंडळी पाठीशी घालीत असताना पाहून कवी विचारतो,

*भारतात या कसे तगावे ?*
*धोपटमार्गी नेक नि सच्चे ?*

कोणी नवखा राजकारणी पुढे सरसावून नव्याने घडी बसवायचा प्रयत्न करू लागलाच, तर छद्मीपणाने गालात हसत आणि गंमत बघत ते सांगतात :

*कितीक नेते आले गेले*
*गळून पडले सगळे थाट*
*उन्मादाने विचारते ही*
*कोण आडवे माझी वाट ?*

श्री. देवधर यांच्या 'माय लॉर्ड' या इंग्रजी कवितेला अनुराधाताईंनी चढविलेला मराठी साज, मराठी वाचकाच्या मनाला जाऊनच भिडतो, असे म्हणावेसे वाटते !

कोणाची चाकरी, ताबेदारी नको म्हणून नेहमीची चाकोरी सोडून कोणी लघुउद्योग (स्मॉल स्केल इंडस्ट्री) सुरू केला, तर त्याचे दुर्दैव ओढवते. ते असे :

*गि-हाइकांच्यापेक्षा माझा*
*इन्स्पेक्टरांशीच संयोग !...*
*एक तपासे विक्रीकर*
*दुसरा पाही प्राप्तिकर*

या जंजाळातच गुरफटल्यावर प्राप्ती करायला वेळ कसा मिळणार आणि प्राप्तीकर कुठून (कसा) भरणार ? या कटु अनुभवाने लघुउद्योगाचे काय होते ?

संतापाने थरथरलो मी
*मागे जेव्हा तो मज लाच*
*दिली नाही तर कळे न मजला*
*कसा संपवू मी हा जाच ?*

*लाज सोडुनी म्हणे कसा तो*
*जगू कसा मी सांग मला*
*गरजा भागति पगारातुनी*
*लाच हवी मज चैनीला !*

*तात्पर्य काय ?*

*खाजव माझी पाठ जरा तू*
*मीहि खाजविन पाठ तुझी*
*तपासातुन सगळ्या सुटशील*
*तत्त्व जाऊ दे चुलिमाजी !*

*अशा तत्त्वहीन देवाण-घेवाणीची अखेर काय ?*

*कर जोडोनी भर सर्व कर*
*नंतर करूया मुख्य विचार*
*वाढवायचे उत्पादन का ?*
*बंद करू या आपुले दार !*

खुर्चीसाठी असा नंगा नाच घालणाऱ्या राजकारण्यांना काय म्हणावे ? निर्लज्ज, लाचार, कारस्थानी, टोपी फिरवणारे विदूषक, लुटालूट करणारे तस्कर का चोर ?

कवी अखेर वैतागून म्हणतो,

*प्रेताचे लचके तोडणारी गिधाडे !*
*का असाहाय्यांना ओलीस ठेवणारे हरामखोर ?*

भरीव राष्ट्रकार्य करून दाखविण्यासाठी राजधानीत गेलेला कवी विचारतो :

*कुठलं राष्ट्र, फुलणं काय ?*
*कुणाचा बळी ? बरळताय काय ?*
*हव्या त्या खुर्चीवर हवा तो ठोकळा*
*एवढंच माफियाला ठाऊक हाय !*

*दुभंगलेला देश, हरवलेली जनता,*
*उद्या नसलेले आज, तेव्हा भूतकाळ फक्त त्राता !*
*शहाणेही हतबुद्ध, हात चोळीत करती खेद !*
*कोण धनुर्धर येईल पुढे*
*करावया लक्ष्यभेद !!*

टोपी (आणि पक्ष) फिरविणाऱ्या राजकारणी विदूषकांना पाडता, झोडता येते. पण सगळ्या अनर्थांच्या मागे असलेली नोकरशाही कधी जनतेला दिसत नसली तरी सगळी सत्ता तिच्या हातात असते. त्याबद्दल कवि म्हणतो :

*पडद्यामागे राही सदा*
*जाब कुणा देत नाही*
*फासे पडू देत कसेही*
*ती जिंकल्याशिवाय राहात नाही*

*असं आहे दिल्लीचं लोढणं. तिथे काय होतंय !*

*जनतेच्या जिवावर*
*चालतोय हा देश*
*पुढाऱ्यांचे नुसते, पोकळ आवेश !*

घामाच्या थेंबातून संपदा येते. हे मर्म जोपर्यंत दिल्लीला समजणार नाही, तोपर्यंत पायात पाय अडकून आपण पडत राहणार ! हे ध्यानात येऊन वैतागून कवी सांगतो :

*झुगारून दिलं (दिल्लीचं लोढणं) तरी*
*अडणार नाही*
*त्याला खीळ तरी पडणार नाही !*

दिल्लीतल्या राजकारणाबद्दल विटलेल्या मनाने असे उद्‌गार काढणारे कवी प्रभाकर देवधर संवेदनशील असल्यामुळे भारावलेल्या त्यांच्या मनाने काव्याची कास धरली असावी, असे वाटते. मन मोकळे करायला कवितेचे माध्यम सोयीचे असते. एकांतात बसून आलेल्या कडू-गोड अनुभवांवर चिंतन करीत कवीला प्रहार करता येतो. इतकेच नव्हे तर हळूवार भावनाही समर्थपणे व्यक्त करता येतात. जे लांबलचक लेखाने साधत नाही, ते काम चित्रकार ब्रशाच्या एखाद्या फटकाऱ्याने साधून मर्मावर आघात करतो. तोच प्रकार मोजक्या शब्दांत कवीला करता येतो. चित्रकाराच्या फटकाऱ्याला जसे आघात करणारे किंवा मनोहारी चित्राचे रूप येते, तशीच कवीच्या शब्दाला कधी शस्त्राची धार येते आणि शब्दाचाही स्पर्श सहन न होणारी हळुवार भावना व्यक्त करता येते.

वेगळ्या दृष्टिकोनातून पाहिले, तर शास्त्रज्ञही कवीसारख्या मनाच्या भराऱ्या मारीत असतो. अशा कल्पनाविहारातूनच त्यांना नव्या-नव्या कल्पना सुचतात. कवीची भरारी कल्पनासृष्टीतच राहिली तरी चालते. पण शास्त्रज्ञाला कल्पनेच्या टप्प्यावरच थांबता येत नाही. केलेली कल्पना प्रत्यक्ष सत्यसृष्टीत उतरवून दाखविण्याची जबाबदारी त्याच्यावर असते.

श्री. प्रभाकर देवधर यांना मात्र सहसा कोणाला कल्पना करता येणार नाहीत, अशा गोष्टी बघाव्या, अनुभवाव्या लागल्या. विदारक अनुभवांनी व्यथित झालेल्या त्यांच्या संवेदनाशील मनाला जे धक्के बसले, तो आक्रोश काव्याच्या स्वरूपात बाहेर पडलेला पदोपदी स्पष्टपणे जाणवतो.

प्रस्तुत संग्रह वाचत असताना मला अर्धशतकापूर्वी वाचलेल्या 'सरोवर पुरंध्री' या कवितेची आठवण झाली. वयाच्या सतराव्या वर्षी सावरकरांनी स्कॉटच्या 'लेडी ऑफ दी लेक' या इंग्रजी कवितेचे सारांशात्मक भाषांतर केले होते. त्यालाही एकशे एक वर्षे उलटली. हे भाषांतर त्यांनी भुजंगप्रयात, शार्दूलविक्रिडीत, स्वागता आणि मालिनी अशा वृत्तांत केलेले होते.

स्वा. सावरकर यांच्यावर त्यावेळी कविवर्य मोरोपंतांच्या काव्याचा प्रभाव होता. त्यामुळे प्रत्येक ओळीच्या शेवटच्या शब्दात यमक साधण्याची 'मोरोपंती पद्धत' त्यांनी अनुसरलेली होती. यमके, अनुप्रास, उपमा, उत्प्रेक्षा यांनी साधलेले काव्य वाचताना माणूस रंगून जातो. ते कलाकुसरीचे काम अवघड असते. त्यात कल्पनांचा आणि शब्दसागराचा खेळ असतो. त्याचा परिणामही वेगळा असतो.

वृत्तांचे आणि छंदांचे बंधन नसलेले काव्य निराळ्या प्रकारचे असते. त्यांचे बंधन नसलेले काव्य करण्याचे कामही सोपे नसते ! 'अजब तुझे सरकार' हा काव्यसंग्रह तर मूळ इंग्रजी कवितांचा अनुवाद आहे. मूळ अन्य भाषेतील कलाकृतीच्या आशयाशी समरस झाल्यावाचून अनुवाद करणे शक्य नसते. त्यामुळे अनुवाद करणाराची जबाबदारी अधिकच वाढलेली असते. तसेच प्रत्येक लेखकाची आणि भाषेची शैली असते. मूळ लेखनाचा आस्वाद आणि आनंद स्वत: घेतल्यानंतर तो दुसऱ्या भाषेतून उतरावयाचा असतो. ते साधं निरोप्याचं काम नसतं. त्याला स्वतंत्र कलात्मक निर्मितीइतकंच मूल्य असतं !! हे सारं अवघड काम समरस होऊन अनुराधाताईंनी मराठी वाचकांना सादर केलं आहे. त्याबद्दल त्यांचं अभिनंदन करावं, तितकं थोडंच आहे. कोणी काव्यसमीक्षक कलात्मक काव्याची कसोटी लावू पाहतीलही, परंतु; स्वत: देवधर यांनी 'प्रेरणा' या प्रास्ताविकात व्यक्त केलेले विधान अत्यंत महत्त्वाचे आहे.

ते म्हणतात, ''माझ्या मूळ गर्भित विचाराला आणि कवितेमागच्या भावनेला मुळीसुद्धा धक्का न लावता त्यांनी अतिशय बेमालूमपणे माझ्या साऱ्या कवितांना खरा मराठी साज चढविला आहे.''

हुकूमशाहीच्या असहकाराने हताश झालेले कवीचे मन, काही शाश्वत नाही, क्षणभंगुर आहे, असे सांगून तात्त्विक समाधान मानू लागते. स्वत: शोषितही, इतरांचे शोषण करण्यात एक विकृत आनंद भोगताना, कवीला दिल्लीमध्ये दिसले. आदर्शवादाचा सतत बळी पडत असलेला पाहून कवीला राजधानीतलं वास्तव्य नजरकैदेसारखं जाचक वाटू लागलं. पण मला या तुरुंगवासानेच अंतर्मुख आणि चिंतनशील केलं, असं स्वत: कवीनंच नोंदवून ठेवलं आहे. त्याचं प्रत्यंतर आपल्याला 'अंतर्मुख' या विभागातल्या कवितांमधून चांगलं येतं !

पंतप्रधान राजीव गांधींच्या मैत्रीमुळे श्री. देवधर दिल्लीत गेले. दुर्दैवाने 'मानवी बॉंब'च्या रूपाने राजीव गांधींचा बळी घेतला. त्यामुळे त्या स्नेहाचा बंध तुटताच देवधर मुंबईतल्या मूळ व्यवसायात परतले. या आशा-निराशेच्या आंदोलनात उमटलेल्या भावनांचे चित्रण वाचकाचे मन हेलावून टाकते.

हिंदुस्थानातील एका नामवंत शास्त्रज्ञाचा आपल्या राजधानीच्या वातावरणातील अनुभवामुळे कवी झाला. शालेय जीवनापासून इंग्रजी कवितांचे रूपांतर करण्याचा छंद असलेल्या अनुराधाताईंनी देवधरांच्या इंग्रजी काव्याचा अनुवाद करणे हे काम तसे सोपे नव्हते. गेली पंचवीस वर्षे त्या अमेरिकेत राहात आहेत. अकाउंटंट आणि आर्थिक सल्लागार म्हणून त्या आकड्यांत अडकलेल्या असल्यामुळे त्यांचा मराठी भाषेशी संपर्क फारसा राहिलेला नाही. राजकारण आणि समाजकारण हे त्यांचे विषयही नाहीत. तरी निरनिराळ्या माध्यमांतून हिंदुस्थानातील राजकीय अंदाधुंदीच्या वार्तांनी परदेशातील भारतीय अस्वस्थ होतो. आपण दूर अंतरावरून काही करू शकत नाही, याची खंत त्यांच्या मनात सलत असते. 'कॅपिटल पनिशमेंट' हा इंग्रजी काव्यसंग्रह वाचताच त्यांना त्यात आपलेच विचार आणि भावना यांचे प्रतिबिंब दिसले. 'विचारांची वेव्हलेंग्थ' जुळल्यामुळे त्यांनी सहज त्यांना मराठी साज चढविला. या कवितांना भाषांतर किंवा अनुवाद म्हणण्यापेक्षा कविवर्य मंगेश पाडगावकर यांनी 'अनुसर्जन' असे म्हटले आहे, तेच योग्य आहे.

मराठी भाषेतील ग्रंथांचा प्रसार अधिकाधिक व्हावा, या उदात्त भावनेने स्थापन झालेल्या 'ग्रंथाली' या संस्थेने हा संग्रह प्रकाशित केला आहे. श्री. दिनकर गांगल आणि त्यांच्या मित्रांनी स्थापन केलेल्या संस्थेने नुकताच रजत महोत्सव साजरा केला. गेल्या पाव शतकात अनेक पद्धतींनी त्यांनी कार्य चालू ठेवलेले आहे. सर्वसाधारण प्रकाशकांपेक्षा कमी किंमतीमध्ये पुस्तके वाचकांना पुरविण्याचे अवघड काम त्यांनी बऱ्याच प्रमाणात यशस्वी केले आहे. त्यासाठी 'ग्रंथाली' संस्था आणि त्यांचे सदस्य यांचे मराठी प्रेमीजनांनी अभिनंदनच केले पाहिजे.

**'अजब तुझे सरकार'** हे ग्रंथालीचे सर्वांगसुंदर असे २४९ वे प्रकाशन आहे. त्यात नाणावलेले व्यंगचित्रकार कै. श्याम जोशी यांनी काढलेली समर्पक रेखाचित्रे जागोजागी घातलेली आहेत. त्यामुळे परिणामकारक काव्यसंग्रहाला अधिक बोलके रूप आलेले आहे. सर्वांनी संग्रह करावा, असा हा काव्यसंग्रह आहे.

■

श्री. पु. गोखले
कमलश्री, ३०, पारिजात सोसायटी, विवेकानंद रोड,
बिबवेवाडी, पुणे ४११ ०३७.
फोन : ४२१४२६८, ४२१२२५९.



अनुक्रमणिका

# निळी वाटचाल :
# परिवर्तनवादी चळवळीचा सम्यक आढावा

❑

प्रा. डॉ. कमलाकर कांबळे

❑

*('निळी वाटचाल', लेखक : डॉ. दत्ता भगत, प्रतिमा प्रकाशन, पुणे ३०, पृ. २१०, मूल्य रु. १५०)*

पुण्याच्या प्रतिमा प्रकाशनाचे 'निळी वाटचाल' हे पुस्तक बाज़ारात आले आहे. महाराष्ट्रातील ख्यातनाम विचारवंत व समीक्षक प्रा. दत्ता भगत यांचे हे पुस्तक परिवर्तनवादी चळवळीचे सम्यक चित्रण करणारे आहे. यात जवळपास सोळा लेख असून त्यातील पाच लेख 'नाटका'बद्दल आहेत. लेखक एक समर्थ आणि अभ्यासू नाट्यसमीक्षक असल्याने मराठीतील 'तृतीय रत्न', 'नीचौच्च जातिविवाहनाटक', 'डॉ. आंबेडकर आणि गांधीजी', 'गांधी-आंबेडकर' आणि 'मी नथुराम बोलतोय' या महत्त्वाच्या पाच नाटकांचे मूल्यमापन करून यातील सामर्थ्यस्थळे आणि मर्यादा यांच्या नोंदी केल्या आहेत.

'तृतीय रत्न' हे महात्मा फुले यांचे नाटक 'पहिले आधुनिक मराठी नाटक' आहे, हे निर्विवादपणे नोंदवून प्रा. सीताराम रायकर, डॉ. कल्पना पराजंपे यांचे शंकानिरसन केले आहे! 'तृतीय रत्न' नाटकाबद्दल लेखकाने अतिशय विस्तृत आणि मुद्देसूद विवेचन केल्याने महात्मा फुले हेच पहिले आधुनिक नाटककार ठरतात. लक्ष्मण गोपाळराव देशमुख नावाच्या लेखकाने 'नीचौच्च जातिविवाह नाटक' लिहून जवळपास ८८ वर्षांपूर्वी आंतरजातीय विवाहाचे समर्थन केले असल्याची नोंद लेखकाने घेतली आहे. परिवर्तन चळवळीसाठी ज्यांनी ज्यांनी हातभार लावला, त्यांची नोंद या निमित्ताने घेतल्याचे दिसून येते. डॉ. भालचंद्र फडके हे दलितसाहित्याचे अत्यंत प्रभावी भाष्यकार; त्यांनी लिहिलेल्या 'डॉ. आंबेडकर आणि गांधीजी' या नाटकाची नोंद लेखकाने घेतली आहे.

डॉ. आंबेडकर आणि गांधीजी या उभयतांवर श्रद्धा ठेवणारा फार मोठा वर्ग आपल्या देशात आहे; पण हा वर्ग विभागलेला आहे, हे सत्य सांगून प्रा. भगत पुढे लिहितात, गांधीजींवर श्रद्धा असणाऱ्यांना डॉ. आंबेडकर देशद्रोही वाटतात, तर डॉ. आंबेडकरांवर श्रद्धा असणाऱ्यांना गांधीजी दलितद्वेष्टे वाटतात. ही विभागणी अजूनही संपली नसल्याबद्दलची खंत ते बोलून दाखवतात. गांधीजी आणि डॉ. आंबेडकर यांच्या मनातील दुखऱ्या जागा शोधून हे नाटक केवळ नाट्यकलाकृती नसून हे एक 'विचारनाट्य' आहे, असा गौरवही त्यांनी केला आहे. प्रेमानंद गज्वी यांचे गांधी-आंबेडकर हे नाटक संघर्षाचे आव्हान पेलणारे आहे. विदुषकाची व्यक्तिरेखा निर्माण करून नाटककाराने सामान्य माणसांच्या मनातील प्रश्न उपस्थित केले आहेत, असा योग्य गौरव करून या नाटकातील मर्यादा विस्ताराने सांगितल्या आहेत.

श्री. प्रदीप दळवी यांचे 'मी नथुराम बोलतोय' या नाटकाची संहिता प्रा. भगत यांनी वाचल्यानंतर त्यांच्या हाती जे निष्कर्ष लागले, ते भयानकच आहेत, याची कल्पना येते. — या नाटकाचे प्रयोग गेल्या दहा वर्षांपासून खाजगीत चालू असावेत. नथुराम आपले वय ८८ वर्षे सांगायला हवे, पण तो ७८ वर्षं सांगतो. नथुरामचे पूर्वायुष्य नाटककार सांगत नाही. गोपाळ गोडसे यांच्या 'गांधी हत्या आणि मी' हे पुस्तक श्री. दळवी यांच्यासमोर आहे. गांधीहत्येशी सावरकरांचा नेमका संबंध होता का ? असल्यास कोणत्या स्वरूपाचा ? या प्रश्नांची उत्तरे श्री. दळवी लपवतात. गांधीजींच्या खुनानंतर ब्राह्मणांच्या कत्तली झाल्या, हे म्हणणे अनैतिहासिक आणि अतिशयोक्त आहे. हिरवी चादर मुस्लिम धर्मीय कुठे चढवतात, ह्या ठिकाणाला काय म्हणतात, हे दळवींना माहीत नाही! गांधीजींच्या खुनाचं केवळ उदात्तीकरण या नाटकात करण्यात आले आहे. साधारणत: हे वरील निष्कर्ष नोंदवून गांधीहत्येचं नेमकं मर्म काय आहे, याची महत्त्वपूर्ण नोंद येथे घेतल्याचे लक्षात येईल.

डॉ. धनंजय कीरकृत 'डॉ. बाबासाहेब आंबेडकर' चरित्रात चरित्रलेखकाने ज्या 'लबाड्या' केल्या आहेत, त्याचे सप्रमाण दर्शन प्रा. भगतांनी पहिल्याच लेखात घडवले आहे. श्री. कीर यांच्या चरित्रलेखनाच्या मर्यादा नोंदवून त्यांची सावरकरवादी भूमिका या चरित्रात कशी व्यक्त होते, हेही सांगितले आहे. डॉ. कीर सावरकरवादी आहेत आणि त्यांच्या मनात महात्मा गांधींवद्दल एक सुप्त राग आहे. डॉ. कीरांनी आपल्या या व्यक्तिमत्त्वाचे रंग या चरित्रात मिसळले आहेत, असा स्पष्ट आरोप प्रा. भगत यांनी पुराव्यानिशी केला आहे. आज डॉ. कीर असते तर त्यांनी प्रा. भगतांना भेटून अथवा पत्र लिहून चूक कबूल केली असती !

'निळी वाटचाल'मध्ये जवळ जवळ १५ पुस्तकांचा आस्वाद असून एक स्वतंत्र लेख 'डॉ. बाबासाहेब आंवेडकर : एक राष्ट्रभक्त' या नावाने लिहिला आहे. आज महाराष्ट्रामध्ये स्वातंत्र्यचळवळीचा अन् स्वातंत्र्यसैनिकांचा 'उदो उदो' चालला आहे. याचा कधी थेट तर कधी अप्रत्यक्ष रोख दलित चळवळीवर आणि डॉ. आंबेडकर यांच्यावर असतो. डॉ. आंबेडकर हे स्वातंत्र्यसैनिक नाहीत, त्यांनी स्वातंत्र्य चळवळीत भाग घेतला नाही, असे त्यांना म्हणावयाचे असते. ही विश्लेषण पद्धतीच कशी चुकीची आहे, याबद्दल प्रा. भगत महाराष्ट्रभर फिरून सांगताहेत. 'स्वातंत्र्य' याचा अर्थ काय ? केवळ राजकीय स्वातंत्र्य की सर्वंकष स्वातंत्र्य ? दलित, स्त्रिया, आदिवासी यांच्या स्वातंत्र्याचे काय ?

इंग्रज जिथे चुकले तेथे डॉ. बावासाहेबांनी त्यांनाही सोडले नाही. राष्ट्रहित की दलितहित ? असा प्रश्न निर्माण झाला, तेव्हा त्यांनी राष्ट्रहितालाच प्राधान्य दिले आहे. अंबेजोगाई येथे 'भारतीय स्वातंत्र्याची चळवळ आणि डॉ. बाबासाहेब आंबेडकर' या विषयावर प्रा. भगत यांनी तीन व्याख्याने देऊन डॉ. आंवेडकर हे प्रखर राष्ट्रभक्त होते, हा मुद्दा मांडला होता. या लेखातही हाच मुद्दा सप्रमाण मांडलेला आहे.

बाबुराव बागूल यांचे 'दलित साहित्य : आजचे क्रांतीविज्ञान' हा ग्रंथ निळ्या वाटचालीतील एक दीपस्तंभ आहे, असा गौरव करून त्यांच्या प्रतिभेचा, विचारांचा, भूमिकेचा आढावा घेतला आहे. बाबुराव बागूल मार्क्सवादी आहेत, असा अपप्रचार जाणीवपूर्वक केला गेला.

तो खोडून काढून 'बाबुराव, मार्क्स आणि बाबासाहेब या उभय विचारवंताच्या दर्शनाच्या तौलनिक प्रकाशात स्वत:ला अधिक स्पष्ट आणि रेखीव करतात, हे त्यांच्या समीक्षालेखनाचे महत्त्वाचे वैशिष्ट्य मानावे लागेल,' अशी नोंद लेखकाने घेतली आहे.

'हिंदूंच्या अवनतीस जबाबदार कोण ?' या लो. टिळकांनी लिहिलेल्या चार अग्रलेखांची मुद्दाम नोंद घेऊन 'स्वराज्य' हा माझा जन्मसिद्ध अधिकार आहे आणि तो मी मिळविणारच' असे म्हणणारे टिळक 'राणी सरकारचे राज्य आमच्या देशावर चिरकाल राहिले, तर त्याबद्दल वाईट वाटण्याचे कारण नाही. राणी सरकारचे राज्य यावच्चंद्रदिवाकरौ राहिले, तरी आम्हास पाहिजेच आहे. आमची तक्रार काय ती राज्यपद्धतीबद्दल आहे. ती पद्धत सुधारली, तर इंग्रजी राज्याबद्दल कोणासही कधी वाईट वाटण्याचा संभव नाही' असेही म्हणाले होते. यावर आमचा विश्वास बसत नाही, पण टिळकच असे म्हणाले होते. टिळक ब्राह्मणांसह सर्व हिंदू समाजाच्या एकसंधतेचे स्वप्न पहात होते. त्यासाठी आवश्यक त्या तडजोडी करीत होते. इंग्रज हा शत्रू आहे, त्याविरुद्ध सर्वांना संघटित करण्याचा प्रयत्न ते करीत होते. ही नवी माहिती या लेखामुळे उजेडात आली आहे.

प्रभाकर वैद्य यांचे 'महात्मा फुले आणि त्यांची परंपरा' हे पुस्तक केवळ वर्गीयतेच्या रिंगणातील विवेचन असून त्यांच्या कार्याचे व विचारांचे मार्क्सवादी पद्धतीने केलेले हे विश्लेषण सदोष आहे, हेच लेखकाने दाखवून दिले आहे.

'महात्मा फुले आणि न्या. रानडे' या विषयावर खा. मधु दंडवते यांची जी व्याख्याने झाली, त्याची पुस्तिका आज उपलब्ध आहे. याचे मूल्यमापन करताना ही तुलना म्हणजे पगडी — पटक्याची अनाठायी सांगड आहे, अशा मार्मिक शब्दांत आपली नापसंती प्रा. भगत यांनी व्यक्त केली आहे. अशीच नापसंती त्यांनी डॉ. स. ह. देशपांडे यांच्या ग्रंथाबद्दल व्यक्त केली आहे.

महात्मा फुले यांनी 'शेतकऱ्याचा असूड' हा ग्रंथ लिहून महाराष्ट्रातील मंडलजातीची व्यथा अगोदरच कशी मांडली होती, याचे विवेचन एका लेखात आहे. 'सानेगुरुजी आणि अस्पृश्यता' या लेखात त्यांच्या वाङ्मयातील दलितांचे, अस्पृश्यांचे जीवन व त्यांची भूमिका काय होती, याचा आढावा घेतला आहे. दलित साहित्यात दलित जीवनाचा बोचरा, वास्तववादी अनुभव आला तो मराठी वाचकांनी स्वीकारला. कारण सानेगुरुजींच्या वाङ्मयाने एक अभिरुची तयार केली होती, अशी नोंदही लेखकाने घेतली आहे.

'मराठवाड्यातील दलित चळवळ आणि हैद्राबादचा स्वातंत्र्यसंग्राम' हा डॉ. नरेंद्र गायकवाड यांचा संशोधनपर ग्रंथ एक महत्त्वाचा साधनग्रंथ आहे, अशी नोंद घेऊन या मुक्तिसंग्रामात डॉ. बाबासाहेब आंबेडकर आणि दलितांचे योगदान किती होते, हे प्रा. भगत यांनी अन्य संदर्भ देऊन नोंदवले आहे.

'जीवनरेखा' या डॉ. जे. एम्. वाघमारे यांच्या पुस्तकात वीस व्यक्तींवरील लेख आहेत. डॉ. राधाकृष्णन यांच्यापासून ते दि. लीं. होळीकर यांच्यासारख्या सामान्य माणसांपर्यंतच्या व्यक्तिरेखा यात आहेत. यातील आंतरिक सुसंगती शोधण्याचा प्रयत्न लेखकाने केला आहे.

कोणत्याही चळवळीला एक वा अनेक समर्थ भाष्यकार लागतात. आज महाराष्ट्रात ज्यांचे नाव नि:पक्षपाती, तटस्थ, राजकारणाशी बांधील नसूनही राजकारणाचे अभ्यासक, सृजनशील लेखक, समीक्षक म्हणून घ्यावे, असे दत्ता भगत हेच आहेत. दलितांच्या चळवळीचे योग्य असे मूल्यमापन दलितेतर करणारच नाहीत, असे म्हणता येणार नाही. पण 'सोनाराने कान टोचलेले अधिक बरे' या न्यायाने मला दत्ता भगत यांचे मूल्यमापन मोलाचे वाटते. 'निळ्या वाटचाली'त अनेक ठिकाणी त्यांना रत्नपारख्याचे व सुवर्णकाराचे काम करावे लागले आहे ! उदा. 'डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणजे तपोनिष्ठ भीमाबाईला वैरागीबुवाने दिलेल्या आशीर्वादाचे फळ आहे' असे कीर म्हणतात. त्याहीपुढे जाऊन 'रामजी सकपाळाच्या पुत्राच्या घडणीत नियतीचा देखील बराच हात असला पाहिजे' या वाक्याबद्दल खरे तर आंबेडकर अनुयायांनी काहूर उठवायला हरकत नव्हती. 'व्यासपीठा'सारखा औपचारिकता व्यक्त करणारा शब्ददेखील ज्या साहित्यिकांना चालत नाही, एवढ्या टोकदार भावना असणाऱ्या विचारवंतांना बाबासाहेबांच्या कर्तृत्वाचे अर्धे श्रेय नियतीला देऊन टाकणे कसे मान्य होऊ शकते ? (पृ. १०) असा प्रश्न प्रा. भगत यांनी विचारला आहे. महाराष्ट्रातील दलित नेते काशिराम यांची नोंद घेत नाहीत. लेखकाने मात्र काशिराम देशातील तिसरी शक्ती संघटित करणारे दलित नेते आहेत, अशी नोंद अगदी सहज घेतली आहे (पृ. ३६). महाराष्ट्रातील तथाकथित आंबेडकरवाद्यांनी बाबुराव बागूल यांना मार्क्सवादी ठरवले अन् वेगळे पाडण्याचा प्रयत्न केला. प्रा. भगत यांनी मात्र न्यायोचित मूल्यमापन केले आहे (पृ. ५१). खा. मधु दंडवते यांना सबुरीचा सल्ला देण्याचे धाडस लेखकच करू जाणे ! गांधीजींना वगळून दलितमुक्तीच्या चळवळीचा विचार सवर्णांनी व दलितांनीही करू नये, असे स्पष्ट मत त्यांनी नोंदवले आहे. हैद्राबाद मुक्तिसंग्रामाच्या संदर्भात प्रा. गायकवाड यांच्या संशोधन ग्रंथाचे महत्त्व सांगून मर्यादाही नोंदवल्या आहेत. (कै.) अहिताग्नी राजवाडे यांचे आत्मवृत्त प्रा. गायकवाड यांना उपलब्ध झाले नसावे, अशा सुसंस्कृत शैलीत मर्मावर बोट ठेवले आहे. प्रेमानंद गज्वी यांच्या गांधी-आंबेडकर नाटकातील संदिग्धपणा सांगून मी असमाधानी आहे, अशी हक्काने तक्रार केली आहे.

प्रा. भगत हे ख्यातनाम वक्ते आहेत. भगवान बुद्धाने 'चरतभिक्खवे चरिकम्' फक्त त्यांनाच उद्देशून म्हटले असावे ! सतत महाराष्ट्रभर फिरून ते व्याख्याने देतात. त्यांची शैली व्याख्यात्याची आहे. ते जसे ओघवते बोलतात, तसेच लिहितात. त्यांचे व्याख्यान मुद्देसूद, प्रवाही, दृष्टांत-रूपककथा यांचा चपखल वापर असणारे असते. तसेच त्यांचे लेखनही आहे. लेखनात पुरेसा चिवटपणा असतो. ते दुराग्रही नाहीत, पण आग्रही आहेत; कडू औषधाला साखरेचा लेप देऊन रोग बरा करतात ! निळ्या वाटचालीला शुभेच्छा.

■

प्रा. कमलाकर कांबळे
जातकविहार, जोतीनगर, अंबाजोगाई.

# काही साहित्यिक व्यक्ती : जशा भावल्या तशा

❑

डॉ. पंडित टापरे

❑

*(काही साहित्यिक व्यक्ती — जशा भावल्या तशा (व्यक्तिचित्रसंग्रह) : अनंत कदम, सप्तर्षी प्रकाशन, वसई, प्रथमावृत्ती २५ जुलै २००१, मूल्य रु. १४०, पृ. १५५.)*

अनंत कदम हे साहित्यविश्वात प्रामुख्याने कादंबरीकार व कवी म्हणून प्रसिद्ध आहेत. त्यांच्या 'किडे', 'स्रोत', 'कॅन्सर', 'विद्यापीठ' ग्या कादंबऱ्या साठोत्तरी कादंबरीप्रवाहात जातात. त्याचप्रमाणे त्यांचे 'बासरी', 'हृदयताल' इत्यादी काव्यसंग्रहही प्रसिद्ध आहेत. गौतम बुद्धाच्या धम्मपदाचा पालीतून त्यांनी मराठीत अनुवाद केलेला आहे. त्याचप्रमाणे 'माय, बाप आणि ही...' व्यक्तिचित्रे आणि 'भिंग' हा ललितलेखसंग्रह यांद्वारे त्यांनी ललितलेखनही केले आहे. या ललितलेखनाचा मनोहारी आविष्कार त्यांच्या 'काही साहित्यिक व्यक्ती - जशा भावल्या तशा' या व्यक्तिचित्रसंग्रहातूनही आढळतो. आधुनिक मराठी साहित्यात व्यक्तिचित्रांचे दालन वि. द. घाटे, पु. ल. देशपांडे, विद्याधर पुंडलिक, शान्ता शेळके, रवींद्र पिंगे आदींनी समृद्ध केलेले आहे. श्री. अनंत कदम यांच्या प्रस्तुत संग्रहात साहित्य व शिक्षण-क्षेत्रातील तेवीस गुणीजनांचे गुणसंकीर्तन ऐकावयास मिळते.

या गुणीजनांत लेखक, कवी, कादंबरीकार, समीक्षक, प्राचार्य, तत्त्वचिंतक अशा आपल्या सांस्कृतिक जीवनातील महत्त्वाच्या व्यक्तींचा समावेश होतो. हा स्वातंत्र्योत्तर कालखंड अनेकविध वृत्ती-प्रवृत्तींनी साक्षात् झालेला आहे. येथे सुसंगतीपेक्षा विसंगती, संथपणापेक्षा गतिमानता, सरळपणापेक्षा व्यामिश्रता यांचाच प्रत्यय येतो. त्यामुळे कलावंत असणाऱ्या या संवेदनाक्षम व्यक्ती प्राप्त परिस्थितीत जीवनाच्या विविध प्रश्नांना कधी व्यावहारिक पातळीवर तर कधी कलात्मक पातळीवर झुंज देतात आणि त्यातून त्यांच्या व्यक्तिमत्त्वाच्या छटा दृग्गोचर होतात.

या व्यक्ती आपल्या आचार-विचारातून त्यांना प्राणप्रिय असणारी जीवनमूल्येच अधोरेखित करतात. संयुक्त महाराष्ट्राच्या आंदोलनाच्या वेळी विद्यार्थ्यांवर अन्याय करणाऱ्या पोलिसांविषयीचा निषेध सभा घेऊन नोंदवणारे अनंत काणेकर, 'मुलांची शाळेची गैरसोय होत असेल, तर त्यांना माझ्या घरी राहू दे' (पृ. १०१) असा लेखकास पत्रातून धीर देणारे कृ. रा. सावंत मानवता या मूल्याचाच वेगळ्या शब्दांत उच्चार करतात.

या व्यक्तिचित्रांचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे त्या त्या साहित्यिकाची वाचकाला अनभिज्ञ असणारी माहिती येथे एखाद्या प्रसंगातून समोर येते. प्रिन्सिपल खामकरांचे चांगल्या अर्थी पुनर्वसन होण्यासाठी धडपडणारे, त्यांच्या मृत्यूनंतर कदमांनी त्यांच्यावर लिहावे, म्हणून अपेक्षा व्यक्त करणारे, मैत्री हे मूल्य मानणारे सुभाष भेंडे जसे येथे भेटतात, तसेच आपल्या

सहकाऱ्यांनी मुंबई विद्यापीठात विभागप्रमुख पदासाठी अर्ज केले असताना आपण मुलाखतीला जाणे इष्ट नाही, असा निर्णय घेणारे; सुसंस्कृतपणाचा आदर्श आचारातून दर्शवणारे गंगाधर पाटीलही भेटतात. साहित्यिक व त्याची साहित्यकृती, साहित्यिक व त्याचे दैनंदिन जीवन यांच्यातला सहसंबंध कसा असतो, त्याचे प्रत्यक्षाप्रत्यक्ष दर्शन येथे घडते.

या संग्रहाचे वैशिष्ट्य म्हणजे यातील व्यक्तिचित्रांची शीर्षके विलक्षण अन्वर्थक आहेत. उदा. 'मनोहर ओक : गरळ न ओकणारा कवी.' येथे कदमांनी लेखकाची भावलेली वृत्ती दोन-तीन शब्दांत मांडलेली आहे. यातून मनोहर ओकांच्या अव्यवहारी, व्यसनी या सकृतदर्शनी जाणवणाऱ्या व्यक्तिमत्त्वापाठीमागे असणारे निर्व्याज, नितळ, साहित्यावर उत्कट प्रेम करणारे संवेदनाक्षम मन आपल्यासमोर येते. तर दुर्गा भागवतांचा 'सत्त्वशील दुर्गा' असा उल्लेख जेव्हा कदम करतात, तेव्हा धम्मपद कथांचा अनुवाद कदमांनी करावा, हा त्यांनी धरलेला आग्रह सांस्कृतिक उत्थानाची त्यांची तळमळच स्पष्ट करतो. तर कदमांच्या सोनी कुत्रीच्या निधनाने व्यथित झालेले, पत्रातून भेटणारे नेमाडे 'काही कादंबरीकार संतांजवळचे असू शकतात', (पृ. २१) या लेखकाच्या म्हणण्याची सत्यताच पटवतात.

या व्यक्तिचित्रातील व्यक्ती कधी प्रत्यक्ष संवादातून, कधी पत्रातून, तर कधी त्या साहित्यिकाच्या साहित्यातील एखाद्या ओळीतून उदा. 'आरशातल्या आरशात मेले बेवारशी' (पृ. ३७) भेटतात. साहित्याला आपण जीवनाचा आरसा म्हणतो. या विसाव्या शतकातील सारी असुरक्षितता, सारे मूळापासून उपटून पडलेले अधांतरेपण 'बेवारशी' या शब्दातून व्यक्त होते.

ही पात्रे सतत यशस्वी होतात, असे नाही. श्रमजीवीच्या जीवनाशी समरस होताना अविनाश सहस्रबुद्धेंना जाणवणाऱ्या मर्यादा, कदमांच्या कादंबरीच्या प्रकाशनास आपण साहाय्य न करू शकल्यामुळे नारायण सुर्व्यांना जाणवणारे अपराधीपण जसे येथे आहे, तसेच विंदा करंदीकरांना वयामुळे आलेली असहाय्यता ऐकून कदमांना झालेले दु:खही येथे भेटते.

ही व्यक्तिचित्रे रसिकांची साहित्यिक अभिरुची अधिक प्रगल्भ करतात. लेखक आणि त्याचे सांस्कृतिक पर्यावरण यांचा संबंध कसा असतो, व्यक्तीचे राग, लोभ आणि त्याच्या सभ्यतेच्या, सुसंस्कृतपणाच्या संकल्पना यात कोणाचा विजय होतो, लेखकांच्या मैफली, त्यात होणारे खानपान हे मानवी जीवनाच्या उभारीसाठी, प्रोत्साहनासाठी कसे प्रेरणादायी ठरू शकते, याचेही दर्शन या संग्रहातून घडते.

विसाव्या शतकाच्या उत्तरार्धाचा वाङ्मयीन इतिहास लिहिणाऱ्या इतिहासकारालादेखील हा संग्रह साहाय्यभूत ठरणार आहे. पु. आ. चित्रे, वसंत दावतरांसारखे संपादक केवढ्या व्रतस्थ वृत्तीने वाङ्मयीन नियतकालिकाचा प्रपंच करीत होते, हे या संग्रहातून आपणाला समजते. थोडक्यात, अनंत कदमांचा हा व्यक्तिचित्रसंग्रह एकाच वेळी साहित्यिकातला माणूस व माणसातला साहित्यिक कलात्मकतेने आपणासमोर उभा करतो. आणि हे सारे घडत असताना अनंत कदम या लेखकाची साहित्यिक जडणघडणही साकार करतो. ■

डॉ. पंडित टापरे
प्राध्यापक कॉलनी, वाई (जि. सातारा)



अनुक्रमणिका

## मराठी भावगीताशी नाते जोडणारी पांडुरंगाची गीता

❑

प्रा. दीपा देशपांडे

❑

*(पांडुरंगाची गीता : प्रा. पांडुरंग देशपांडे, कोल्हापूर. प्रकाशक : महाराष्ट्र ग्रंथ भांडार, कोल्हापूर. पृष्ठे १००, किंमत रु. ५०/-)*

आजचे युग हे विज्ञान-तंत्रज्ञानाचे आहे. आमच्या काळात माणसाने उत्तुंग झेप घेऊन आकाश ठेंगणे केले आहे. लौकिक अर्थाने त्याने सारी सारी सुखं प्राप्त केली आहेत. सगळं जग जवळ आलंय. ज्ञानदेवांनी 'हे विश्वचि माझे घर' असे म्हटले, त्याची लौकिक अर्थाने प्रचिती आली. बहिरंगाने माणूस क्षितिजापर्यंत पोहोचला पण, अंतरंगाने मात्र 'रात्रंदिन आम्हां युद्धाचा प्रसंग' याच भूमिकेतून जगताना दिसत आहे. अशा वेळी विज्ञानाबरोबरच त्याला त्याच्या आत्मरूपाची जाणीव झाली तर, तो अंतर्बाह्य सुखी होईल. 'तुझे आहे तुजपाशी परि तू जागा चुकलासी.' अशी त्याची झालेली अवस्था, मनोवृत्ती बदलावयाची असेल तर त्याला विज्ञानाबरोबरच अध्यात्माचाही विचार करावा लागणार आहे. चिरंतन सुख, समाधान मिळण्यासाठी त्याला व्यवहारवाद शिकवणारी 'गीता' अनुभवावी लागेल, यात वादच नाही. ज्ञान, कर्म, भक्ती याचा नंदादीप म्हणजे भगवद्गीता. गीता जीवनापासून अलग नाही. मानवी जीवनाचा ती दीपस्तंभ आहे. हताश, निराश झालेल्या माणसाला मार्ग दाखवणारी गीता माणसाला पलायनवाद न सांगता येणाऱ्या वादळांना, संकटांना सामोरे कसे जायचे आणि किनारा कसा गाठायचा हेच शिकवते. म्हणूनच जीवनात गीतेचे महत्त्व अनन्यसाधारण आहे. अशा या गीतेवर आजवर अनेक विचारवंतांनी, विद्वानांनी, पंडितांनी भाष्य केले आहे. अगदी ज्ञानोबांपासून ते विनोबांपर्यंत. त्याच प्रेरणेने प्रा. पांडुरंग देशपांडे यांनी साध्या, सोप्या प्रासादिक भाषेत गीतेचे भाष्य काव्यात्मक स्वरूपात तयार केले आहे. 'पांडुरंगाची गीता' या नावाने त्यांनी अलीकडेच लिहिलेले पुस्तक अतिशय प्रांजलपणाने व सुबोधपणाने त्यांनी लिहिले आहे.

गीतेचे अठरा अध्याय त्यांनी अवघ्या ९० ते १०० पानांमध्ये भावगीतातून भाषांतरित केले आहेत. दैनंदिन जीवनात अगदी थोड्या वेळात दररोज एक अध्याय वाचण्यास अवघा दोन मिनिटांचा वेळ पुरेसा व्हावा, इतक्या संक्षेपाने पण व्यापक अर्थाने मराठी काव्यामध्ये त्यांनी शब्दबद्ध केला आहे. लघुत्व असूनदेखील गीतेच्या आशयाच्या बाजाला कुठेही बाधा आलेली नाही. अगदी मोजक्या शब्दांत महान अर्थ व्यक्त करण्याचे सामर्थ्य त्यांनी वापरले आहे. एकूणच 'पांडुरंगाची गीता' हा संस्कृत भगवद्गीतेचा मराठी अवतार आहे. देववाणीचा लोकवाणीतील अविष्कार म्हणून ही 'पांडुरंगाची गीता' अवतरली आहे. लोकसाहित्याच्या अभ्यासाच्या अनुषंगाने विचार करता लोकांना वाचण्यास, आकलनास सुबोध, सरल वाटावी










इतपत या भावकवितेचे लोकरंग आहे. उदा.

*युद्ध जीवनी, सतत चालते*
*जो तो बनतो अर्जुन तेथे*
*कृष्ण परंतु कुठे दिसावा*
*गीतेमधुनी तो भेटावा।*

*गीतेला नित उरी जपावे।*
*रूप आपुले तिथे पहावे।*
*गीतेला अन् साक्ष ठेवुनी।*
*भवसागर हा जावा तरूनी॥*

म्हणूनच दैनंदिन जीवनाला निर्धाराने आणि आत्मविश्वासाने सामोरे जाण्याचे सामर्थ्य 'पांडुरंगाची गीता' वाचताना यावे, इतक्या प्रासादिकतेने तिचे नेटकेपण प्रा. पांडुरंग देशपांडे यांनी उभे केले आहे. सहज पठण करावेत इतकी लयबद्धता, नादमाधुर्य त्यातील भावकवितेतून प्रकट झाले आहे. भावाविष्कार बेमालूम व्यक्त झाला आहे. 'गीता' आणि 'पांडुरंगाची गीता' यात एक प्रकारचे 'अद्वैत' झाले आहे. संस्कृतमधली गीता वाचण्यास, समजून घेण्यास जो काळ लागेल, तो अगदी थोड्या वेळामध्ये सहजपणाने भावाविष्कार या पुस्तकात अभिव्यक्त झालेला दिसतो. जीवनाचा सहजसुंदर आस्वाद घेणारी ही कलाकृती झाली आहे.

पुस्तकाचे अंतरंग जेवढे मार्गदर्शक झाले आहे, तेवढेच बहिरंगही देखणे, प्रतिकात्मक झाले आहे. महाराष्ट्र ग्रंथ भांडार, कोल्हापूर यांनी भक्तीपूर्वक, ग्रंथाचे मुद्रण व प्रकाशन केल्याने पुस्तक पाहताक्षणी उचलून घ्यावे, असे देखणेपण त्याला प्राप्त करून दिले आहे, अर्पणपत्रिकेतही एका शिष्याने आपल्या गुरूला ही शब्दओवी समर्पित केली आहे. भगवद्गीतेचा सामान्य माणसासाठी केलेला सहजबोध म्हणजे 'पांडुरंगाची गीता' होय.

म्हणूनच मिताक्षरी पण आशयघन, सुबोध पण लयबद्ध, परमार्थपर पण प्रापंचिकांनाही तारून नेणारी अशी ही रचना सर्वांनाच निरामय आनंद देणारी आहे.

■

परीक्षण : प्राचार्य डॉ. दीपा देशपांडे
कला व वाणिज्य महाविद्यालय, कासेगाव.

---

**गंगाधर विष्णु ठेकेदार यांच्याकडून ग्रंथालयास सप्रेम भेट**

**शिवराज गीतमाला :** गंगाधर ठेकेदार, काल प्रकाशन, पुणे.
**भावदर्पण :** गंगाधर ठेकेदार, काल प्रकाशन, पुणे.

**स्वागत**

**दलित नाटक-प्रेरणा व विकास :** शैलेश त्रिभुवन, पॅपिलॉन प्रकाशन, पिंपरी, पुणे.
**दत्ता भगत यांची नाटके :** शैलेश त्रिभुवन, पॅपिलॉन प्रकाशन, पिंपरी, पुणे.
**भीमाचंरान :** आ. कि. सोनोने, सुषमा प्रकाशन, अकोला.

---










# 'फॅक्टरी गेट': भारतीय उद्योगजगतावरील ललितभाष्य

❑

अरविंद वामन कुळकर्णी

❑

*(फॅक्टरी गेट : लेखक : रंगा मराठे, प्रकाशक : मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे ३०. पृ. २५८, मूल्य १५० रुपये.)*

स्वातंत्र्यप्राप्तीनंतर भारतात - विशेषतः महाराष्ट्रात औद्योगिकरणाची लाट आली. मुंबई शहर हे अर्थातच त्याचे प्रधान कारण होते. पण असे दिसते की, मराठी साहित्याने या लाटेकडे द्यावे असे लक्ष दिले नाही. वास्तविक हे जीवनाचे अनोखे आणि नवीन क्षेत्र होते. रुचिपालटाची विशेष रुची असलेला मराठी लेखक-वाचक त्यासाठीं तरी या क्षेत्राकडे वळायला हवा होता. पण एखादे ह. मो. मराठे सोडले तर या क्षेत्रातील व्यवहारावर कथात्म व्यूह बेतणे इतर लेखकांनी केलेले दिसत नाही. मात्र गंगाधर गाडगीळ यांच्यासारख्या कथाकाराने आणि अरुण कोलटकर , दि. पु. चित्रे, मन्या ओक वगैरे कवींनी यंत्रोद्योगाच्या केंद्रीकरणाचे फलित असणाऱ्या महानगरी संवेदनेची वेगळी दखल घेतली आणि माणसाच्या व्यक्तित्वलोपाला - Loss of identity - अधोरेखित केले.

रंगा मराठे यांची ही पहिलीच कादंबरी आहे: आजवर त्यांनी अल्पसे, पण सकस असे कथालेखन केलेले आहे. सी. ए. असणाऱ्या आणि टेल्कोसारख्या नामवंत कंपनीच्या हिशेबविभागात अनेक वर्षे काम केलेल्या मराठ्यांनी आपल्या व्यावसायिक ज्ञानाचा 'फॅक्टरी गेट'मध्ये चांगला वापर करून घेतलेला आहे. विशेषतः अशा यंत्रोद्योगांची अंतर्गत रचना, अधिकारीवर्गाची श्रेणी, वास्तूची वेगवेगळ्या विभागातील विभागणी आणि मुख्य म्हणजे कुठल्याही यंत्रोद्योगवास्तूचे कुंकवासारखे ठळक ठळक फॅक्टरी गेट या संबंधीची तपशीलवार माहिती ही कादंबरी देते. पण अशा माहितीला मराठे वरचढ होऊ देत नाहीत. कथेच्या निवेदनाच्या ओघात या माहितीला ते बसवितात. उद्योगजगात नोकरी करीत असतानाही त्या क्षेत्राबद्दलचे कलात्मक कुतूहल शाबूत राहणे ही मराठ्यांच्या संवेदनशीलतेची खूणच मानावी लागेल !

औद्योगिक क्रांतीनंतर यंत्रोद्योग ही जगभर होत गेलेली एक जटिल अशी समस्या होय. कार्ल मार्क्सने त्याचा शोषक-शोषित अशा संबंधांचा आधार घेत एक इहवादी अशा शोषणविधीचा अन्वयार्थ लावला. त्यातून सुटण्याऐवजी गुंते वाढतच गेले, असे इतिहास सांगतो. मराठ्यांनी मात्र तत्त्वाच्या आधारावर कामगार संघटना उभी राहण्याचा काळ संपलेला आहे, या बिंदूला पकडलेले आहे. ते कालोचितही म्हणता येईल. एखादा उद्योग, तीमधील



अनुक्रमणिका






कामगार आणि त्यांचे हितसंबंधच फक्त जपणारी त्यांची संघटना; ते जपताना विधायक दृष्टिकोन ठेवणे, त्यासाठी व्यवस्थापनाशी संवाद साधणे, व्यक्तिगत आकांक्षा बाजूला ठेवणे, स्वत:बरोबरच उद्योगाच्या भल्याची इच्छा धरणे हा याबाबतीत मराठ्यांच्या दृष्टीने वैध असा मार्ग. त्यांनी वस्तुस्थिती म्हणून पुण्याजवळच्या पिंपळगाव येथील एम् अँड डब्ल्यू कंपनी कल्पिलेली आहे. तीमधील शर्मा आणि नाईक यांच्या कामगार संघटनेचा हाच दृष्टिकोन आहे. यामुळे उद्योग आणि कामगार या दोघांचेही चांगले चाललेले आहे.

पण व्यवस्थापनाच्या पातळीवर कोण्या एका देशमुख नावाच्या पर्सोनेल ऑफिसरचा प्रवेश होतो आणि त्याच्या आधारावर नंतर कुण्या एका केशव मेनन नावाच्या कामगाराचा. दोघेही वैयक्तिक महत्त्वाकांक्षेने झपाटलेले. कपाडिया या जाणत्या संचालकाचा सल्ला बाजूला ठेवून हे देशमुख शर्मा-नाईक यांचा प्रभाव कमी करण्यासाठी मेननला जवळ करतात. हा मेनन पुढे कामगारांना चिथावतो. शर्मा-नाईक यांना निष्प्रभ करतो आणि देशमुखासह सर्वच व्यवस्थापनाला डोईजड होतो. कामगार बेताल होत जातात आणि M. & W.ची घसरगुंडी सुरू होते. बरे-वाईट असे अनेक प्रसंग पिंपळगाव आणि मुंबईचे मुख्य कार्यालय इथे घडतात. पुढे मेजर कदम आणि दयाळ या कार्यक्षम अधिकाऱ्यांची नियुक्ती होते. मेननच्या बाबतीत अनेक गोष्टी घडतात. वृत्तपत्रे या असंतोषात आग ओतण्याचेच काम करतात. कंपनीच्या खालावलेल्या स्थितीचा कामगारावरही परिणाम होतो. शेवटी मेनन उपोषणाचा मार्ग अवलंबितो. प्रारंभी त्याला साथ देणारे राजकारण पुढे विरोधात जाते आणि त्याचा सारा खेळ विस्कटून जातो.

असा हा सारा व्यूह 'फॅक्टरी गेट'मध्ये आणायचे काम कठीणच म्हणायला हवे. कारण त्याला reportageचे स्वरूप येणे अपरिहार्य होते. त्यादृष्टीने माहितीपर अणि वृत्तांतवजा असा खूप तपशील 'फॅक्टरी गेट'मध्ये दिसतो.

पण मराठ्यांचे वैशिष्ट्य असे की, त्यांना 'कादंबरी'च्या किंवा 'ललित आवाहन'च्या स्वरूपाचे चांगले भान आहे. त्यामुळे आपोआप 'वृत्तांता'हून अधिक असे त्यांच्या लेखनात उतरत जाते आणि लेखनाला 'कादंबरी'ची परिमाणे लाभू लागतात.

मुख्य म्हणजे M. & W.या 'मेहरुमजी अँड वाडिया' या उद्योगाला — ज्याला त्यांनी management of workers असेही शाब्दिक कोटीचा आधार घेत म्हटलेले आहे — स्वतंत्र व्यक्तिमत्त्व देण्याचा प्रयत्न उल्लेखनीय आहे. एका अविभक्त कुटुंबाचे स्वरूप या M. & W.ला लाभलेले दिसते.

तसेच कथेचा व्यूह उभा करण्याच्या दृष्टीने आवश्यक असणाऱ्या व्यक्तींना नुसते चिन्हरूप न देता, त्यांना त्यांच्या भावविश्वासह मूर्त करण्याचा त्यांनी यशस्वी प्रयत्न केलेला आहे. शर्मा, नाईक, सुळे मास्तर, सरुबाई, बाजीराव माळी, देशमुख, वेंकटकृष्णन, गायकवाड, बाबूनंदन अशा अनेक व्यक्तिरेखा वानगीदाखल पाहता येतील. राधा पोतनीस, सतीश राव, वेणुगोपाळ असा एक प्रेमाचा त्रिकोणही योजिला गेला आहे. या बरोबरच मुंबईच्या कार्यालयात बसणारे मेहरुमजी आणि वाडिया यांच्यासारखे उच्चपदस्थ — या सर्वांच्या परस्परसंबंधांतून M. & W. चे व्यक्तिमत्त्व साकार होत जाते.

केशव मेनन ही व्यक्तिरेखा विशेष लक्ष द्यावी अशी उतरलेली आहे. त्याचा केरळातील पूर्वेतिहास — विशेषत: ललितागौरीच्या आत्महत्येमुळे त्याचे विस्कटून गेलेले भावविश्व, त्याचे मद्याच्या आहारी जाणे इत्यादी तपशील त्यांच्या चित्रणात मानवी रंग भरत जातो. तो नुसताच बुद्धिमान, नेतृत्वाचे गुण अंगी असलेला आणि आपल्याला हवे ते साध्य करण्यासाठी काहीही करू शकणारा फक्त महत्त्वाकांक्षी कामगार नेता राहात नाही. फ्राईडच्या भाषेत सांगायचे तर, तो एक मनोरुग्णच वाटायला लागतो.

या मेननच्या हालचाली वाढीला लागतात आणि तो कामगार संघटना प्रचंड बहुमताने ताब्यात घेतो. तिथून 'फॅक्टरी गेट' ही 'कादंबरी' पुन्हा 'वृत्तांता'च्या किंवा 'बातम्यां'च्या जाळ्यात अडकल्यासारखी होते. कदाचित् हा १९८९-९० साली टेल्को कंपनीत राजन नायर या नेत्याच्या नेतृत्वाखाली पुण्यात झालेल्या अभूतपूर्व संपाच्या 'घटिता'चा परिणाम असावा. M. & W. म्हणजे टेल्को कंपनी, केशव मेनन म्हणजे राजन नायर, गोल्फ मैदान म्हणजे शनिवार वाडा पटांगण, पिंपळगाव म्हणजे चिंचवड, दैनिक पहाट म्हणजे दैनिक सकाळ अशी समीकरणे पक्की होत जातात आणि 'घटिता'च्या स्थलकालसापेक्ष चौकटीत 'कादंबरी'चे निवेदन गुंतत जाते. तसेच १९७० ते १९९० या कालखंडात महाराष्ट्रात वा देशात महत्त्वाचे जे घडले, त्याच्या तीन नोंदी कादंबरीच्या तीन भागांच्या प्रारंभी दिल्या आहेत. त्याचे प्रयोजन समजत नाही. प्रश्न इतकाच जाणवतो की, त्या कादंबरीच्या व्यूहाला नेमकी मदत काय करतात? उदा. २८ सप्टेंबर १९७० — 'वि. स. खांडेकर यांना भारतीय ज्ञानपीठ पुरस्कार जाहीर' किंवा १६ जानेवारी १९७८ — 'हजार व अधिक किंमतीच्या नोटा चलनातून रद्द' किंवा ६ जानेवारी १९८७ — 'संगीतकार जयदेव यांचे निधन' इत्यादी इत्यादी. या नोंदींमुळे कादंबरीच्या 'कॅनव्हास'च्या कक्षा रुंदावतील असे 'मनोगता'त म्हटलेले आहे ! तसेच पृ. २४७ वर मेननच्या आत्मचिंतनात इंदिरा गांधींचा आणि त्यांच्या १९७२ ते १९८४ या काळातील घसरणीचा संक्षिप्त आलेख दिलेला आहे. तो कशासाठी हा प्रश्नही सतावतो. या सोबतच आणखी एक डाचणारी गोष्ट जाणवते. ती म्हणजे कळत न कळत कादंबरीचे एकूण लेखन व्यवस्थापनाच्या बाजूला झुकलेले वाटते. कथेच्या व्यूहाची मांडणीच अशी होत जाते की, वाचकांचा कौल कंपनीच्या बाजूने पडावा.

असे काही मतभेदांचे किरकोळ मुद्दे बाजूला ठेवले तर एक मान्य करावे लागते की, रुचिपालटाच्या सापळ्यात न अडकता श्री. रंगा मराठे यांनी समकालीन अशा एका अतिशय महत्त्वाच्या जीवनांगावर फार चांगल्या तऱ्हेने प्रकाशझोत टाकलेला आहे. ही कादंबरी त्यामुळे वाचनीय आणि उल्लेखनीय झालेली आहे. श्री. रंगा मराठे यांना धन्यवाद देतानाच श्री. सुनिल मेहता या प्रकाशकानाही धन्यवाद द्यायला हवेत. मोठ्या देखण्या स्वरूपात त्यांनी 'फॅक्टरी गेट' पेश केलेले आहे. अस्तु.

■

अरविंद वामन कुळकर्णी
१४, स्वयंसिद्धा सोसायटी, पौड रस्ता, पुणे ४११ ०३८.












## कार्यवृत्त (१ ऑक्टोबर २००१ ते ३१ डिसेंबर २००१)

संकलन : **दीपक करंदीकर,** स्थानिक कार्यवाह

***५ नोव्हेंबर २००१ :***

**रंगभूमीदिन व कै. व. ह. गोळे स्मृतिनिमित्त परिसंवाद**

महाराष्ट्र साहित्य परिषद व ललितकला केंद्र, पुणे विद्यापीठ यांच्या संयुक्त विद्यमाने टिळक स्मारक मंदिराच्या सेमिनार हॉलमध्ये 'मराठी प्रायोगिक रंगभूमी : सद्यस्थिती' या विषयावर परिसंवाद आयोजित करण्यात आला. परिसंवादाचे संयोजन व सूत्रसंचालन प्रसिद्ध लेखिका मेघना पेठे यांनी केले व नाटककार सतीश आळेकर यांनी प्रास्ताविक व आभार मानले. कार्याध्यक्ष डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी कै. व. ह. गोळे स्मृतिदिनाचे औचित्य आपल्या निवेदनात सांगितले. या रंगलेल्या परिसंवादात मकरंद साठे, अतुल पेठे, प्रवीण भोळे, संदेश कुलकर्णी, राजीव नाईक या तरुण पिढीच्या रंगकर्मींनी भाग घेतला. ❑

***६ नोव्हेंबर २००१ :***

थोर समीक्षक प्रा. श्री. के. क्षीरसागर यांच्या जन्मशताब्दीचा समारोप 'आठवणीतले श्रीकेक्षी' या विषयावर प्रा. द. ना. धनागरे यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या कार्यक्रमाने झाला. प्रा. डॉ. सौ. सुमती कुलकर्णी, सौ. प्रतिभा कुलकर्णी, श्रीमती सुभाताई डोळे, शुभदा कुंटे, माधव फळणीकर, रा. प. नेने, शंकर सारडा इत्यादींनी श्रीकेक्षींबद्दलच्या आपल्या आठवणी सांगितल्या. आनंद यादव, म. श्री. दीक्षित व चंद्रशेखर बर्वे यांची विशेष उपस्थिती होती. डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी सूत्रसंचालन केले व श्रीमती शकुंतला क्षीरसागर यांनी वर्षभराच्या कार्यक्रमांचा आढावा घेतला. अध्यक्षीय समारोप प्रा. द. ना. धनागरे यांनी केला. ❑

***७ नोव्हेंबर २००१ :***

**कवि केशवसुत स्मृतिदिन**

निमंत्रित कवींचे कविसंमेलन आयोजित करून यंदाचा केशवसुत स्मृतिदिन साजरा केला गेला. नंदूरबारचे प्रसिद्ध कवी श्री. वा. न. सरदेसाई यांना प्रमुख पाहुणे कवी म्हणून निमंत्रित करण्यात आले होते. कवी केशवसुतांच्या निवडक कवितांचे वाचन प्रारंभी परिषदेच्या कार्यवाह नंदा सुर्वे यांनी केले. नंदकुमार पुरोहित, विद्या अन्यापनावर, डॉ. विवेकानंद मोरे (देहू), अश्विनी गुरव, मीनल बाठे, स्वाती सामक, कविता कुलकर्णी, सुधाकर रिठे, रूपाली अवचरे, सुहास घुमरे, संजीवनी तोफखाने इ. कवींनी सहभाग घेतलेल्या या कवीसंमेलनाचे सूत्रसंचालन डॉ. मिरदेव गायकवाड व दीपक करंदीकर यांनी केले. ❑

***२७ नोव्हेंबर २००१ :***

**आहिताग्नि राजवाडे स्मृतिदिन**

'निरीश्वरवादाची माझी भूमिका' या विषयावर सुप्रसिद्ध अभिनेते डॉ. श्रीराम लागू यांचे व्याख्यान आयोजित करण्यात आले होते. व्याख्यानानंतर उपस्थित श्रोत्यांनी विचारलेल्या प्रश्नांना डॉ. लागू यांनी उत्तरे दिल्यामुळे ह्या कार्यक्रमास वेगळेच परिमाण लाभले. दीपक करंदीकर यांनी आभार मानले.



अनुक्रमणिका

***२९ नोव्हेंबर २००१ :***

माधव जूलियन यांचा ६२ वा स्मृतिदिन 'गझलेचे रंग' या निमंत्रित गझलकार कवी-कवयित्रींच्या कविसंमेलनामुळे चांगल्या प्रकारे साजरा करण्यात आला. गझलचे ज्येष्ठ अभ्यासक डॉ. सुरेशचंद्र नाडकर्णी यांच्या अध्यक्षतेखाली रंगलेल्या या संमेलनात रमण रणदिवे, दीपक करंदीकर, घन:श्याम धेंडे, मीनल बाठे, सुलभा कामत, केदार पाटणकर, अरुण चिंचकर यांनी भाग घेतला. कविसंमेलनाचे सूत्रसंचालन सौ. संगीता जोशी यांनी व डॉ. कल्याण इनामदार यांनी माधव जूलियन यांच्या निवडक गझलांचे वाचन केले. तसेच प्रास्ताविक डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी केले. ('गझलेचे रंग' ह्या कवीसंमेलनाचा काही ध्वनिमुद्रित अंश रविवार दि. ९ डिसेंबर २००१ रोजी पुणे आकाशवाणी केंद्रावरून प्रसारित करण्यात आला.) कार्यवाह दीपक करंदीकर यांनी आभार प्रदर्शन केले.

❑

***१६ डिसेंबर २००१ ते २४ डिसेंबर २००१ :***

**मासिक मनोरंजनकार का. र. मित्र व्याख्यानमाला :**

यंदाचे खास महिला सक्षमीकरण वर्ष लक्षात घेऊन "स्त्री जीवन : आज आणि उद्या" या विषयावर खालीलप्रमाणे ९ व्याख्याने आयोजित केली होती. श्रोत्यांच्या भरघोस प्रतिसादामुळे ही व्याख्यानमाला खूपच गाजली.

१. १६।१२।२००१
स्त्रीजीवनातील बदलते टप्पे :
डॉ. विद्युत भागवत

२. १७।१२।२००१
पत्रकारिता आणि स्त्री : वसुंधरा पेंडसे-नाईक

३. १८।१२।२००१
प्रसारमाध्यमातील स्त्री : वासंती वर्तक

४. १९।१२।२००१
कायदा आणि स्त्री : अॅड. सुप्रिया सरवटे

५. २०।१२।२००१
स्त्रियांचे साहित्य : डॉ. अश्विनी धोंगडे

६. २१।१२।२००१
राजकारणातील स्त्री - प्रा. ज्योत्स्ना सरदेशपांडे

७. २२।१२।२००१ श्रमजीवी स्त्री : मेधा सामंत

८. २३।१२।२००१
स्त्रियांचे आरोग्य : डॉ. वैजयंती खानविलकर

९. २४।१२।२००१
उद्याची स्त्री : विद्या बाळ

नऊ दिवस अव्याहतपणे चाललेल्या ह्या ज्ञानसत्राचे संयोजन परिषदेच्या कार्यवाह श्रीमती नंदा सुर्वे व डॉ. कल्याणी दिवेकर यांनी केले. तसेच कोषाध्यक्ष रत्नाकर कुलकर्णी, कार्यवाह दीपक करंदीकर, डॉ. गं. ना. जोगळेकर, डॉ. कल्याण इनामदार, डॉ. अ. वा. कुळकर्णी, डॉ. अरविंद लेले इत्यादींनी प्रास्ताविक/आभार इत्यादी कामे केली.

❑

***२५ डिसेंबर २००१ :***

**कै. बापूसाहेब माटे स्मृतिदिन :**

'आठवणीतील बापूसाहेब माटे' या विषयावर ज्येष्ठ लेखक श्री. भा. द. खेर यांचे व्याख्यान झाले. श्री. रत्नाकर कुलकर्णी यांनी प्रास्ताविक केले व दीपक करंदीकर यांनी आभार मानले.

**दीपक करंदीकर,** स्थानिक कार्यवाह

❑



अनुक्रमणिका






## पारितोषिक समारंभ

***दि. ६ ऑक्टोबर २००१ :***

कै. द. वा. पोतदार यांच्या स्मृतिदिनाच्या निमित्ताने इतिहास किंवा तत्सम पुस्तकास रु. १०००/- चा पुरस्कार दिला जातो. यावर्षी डॉ. सदाशिव शिवदे यांना त्यांच्या 'ज्वलज्ज्वलनतेजस संभाजीराजा' या कादंबरीबद्दल हा पुरस्कार देण्यात आला. कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी डॉ. शोभना गोखले होत्या. परीक्षकांतर्फे पां. ना. बलकवडे यांचे भाषण झाले. म. श्री. दीक्षित हे सहपरीक्षक होते. प्रमुख कार्यवाह ह. ल. निपुणगे यांनी प्रास्ताविक केले. कार्यवाह दीपक करंदीकर यांनी आभार मानले. नंदा सुर्वे यांनी सूत्रसंचालन केले. ❑

***दि. ९ ऑक्टोबर २००१ :***

कै. विद्याधर पुंडलिक स्मृतिदिनानिमित्त एकांकिका किंवा व्यक्तिचित्र यांना आलटून पालटून हा रु. १०००/- चा पुरस्कार दिला जातो. यावर्षी सतीश कळमकर यांना त्यांच्या 'पूर्ण सत्य आणि इतर एकांकिका' या एकांकिका संग्रहाला हा पुरस्कार देण्यात आला. कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी प्रसिद्ध नाटककार सतीश आळेकर होते. डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी प्रास्तविक केले. सहपरीक्षक म्हणून डॉ. अजेय जोशी यांनी काम पाहिले. सूत्रसंचालन नंदा सुर्वे यांनी केले तर दीपक करंदीकर यांनी आभार मानले. ❑

***दि. १२ डिसेंबर २००१ :***

महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे 'समाजविज्ञान कोश' पारितोषिक दिले जाते. लेखकास रु. ५०००/- व प्रकाशकास रु. २५००/- असे त्याचे स्वरूप आहे. यावर्षी या पारितोषिकासाठी मे. ज. शशिकांत पित्रे यांच्या 'डोमेल ते कारगिल' या ग्रंथाची निवड करण्यात आली. प्रकाशकाचे पारितोषिक 'राजहंस प्रकाशन'ला देण्यात आले. या ग्रंथाच्या निवडीसाठी डॉ. गं. ना. जोगळेकर आणि डॉ. अरविंद कुळकर्णी यांनी परीक्षक म्हणून काम पाहिले.. कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी प्रा. ग. प्र. प्रधान हे होते. डॉ. अरविंद वा. कुळकर्णी यांनी परीक्षक म्हणून भाषण केले. डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी प्रास्ताविक केले. नंदा सुर्वे यांनी सूत्रसंचालन केले व आभार मानले. ❑

**नंदा सुर्वे,** स्थानिक कार्यवाह

## पिंपरी-चिंचवड शाखा

महाराष्ट्र साहित्य परिषद, पिंपरी चिंचवड शाखेतर्फे दि. ११।९।२००१ रोजी कवी आत्माराम रावजी देशपांडे उर्फ अनिल यांचे जन्मशताब्दी वर्षानिमित्त हास्यकविसंमेलन आयोजित करणेत आले. कार्यक्रमाचे अध्यक्षस्थानी कविवर्य नारायण सुर्वे हे होते. कार्यक्रमाचे उद्घाटन हेमंत शहा यांचे हस्ते झाले. नंतर अनुजा जोशी व गुंफा कोकाटे यांनी गणेशवंदन केले. सदर कविसंमेलनात घन:श्याम धेंडे, मधुजी साळुंखे, ज्ञानेश्वर कोळी, नारायण सुमंत, दीपक करंदीकर, अमृत पऱ्हाड, संदीप अवचट, कैलास भैरट, मीनल बाठे, रूपाली अवचरे, कमलिनी जगताप यांचा सहभाग होता. कवी अरविंद भुजबळ आणि प्रकाश पठारे यांनी कविसंमेलनाच्या बहारदार सूत्रसंचालनाने रसिकांची मने जिंकून घेतली.

रसिकांची उपस्थिती व भरघोस प्रतिसाद हे या कार्यक्रमाचे वैशिष्ट्य ठरले. सदर

कार्यक्रमास अशोक चाफेकर, अनिल गुगळे, तात्या चिंचवडे, ज्ञानेश्वर तापकीर, अशोक इनामदार यांची प्रमुख उपस्थिती लाभली. कार्यक्रमाचे प्रास्ताविक शाखेच्या अध्यक्षा ललिता पावळकर यांनी केले. तर शाखेच्या कार्यवाह किरण लाखे यांनी कार्यक्रमाचे सूत्रसंचालन केले तर पाहुण्यांचे स्वागत कार्याध्यक्ष गुलाबराव बिरदवडे व उपाध्यक्ष सुनील यादव यांनी केले. शाखेचे कोषाध्यक्ष सुहास घुमरे यांनी आभार मानले.

**रूपाली अवचरे,** कार्यवाह

❑

## श्रीरामपूर शाखा

शाखेची वार्षिक सर्वसाधारण सभा गुरुवार दि. २६ जुलै २००१ रोजी पार पडली. या सभेत मागील इतिवृत्त वाचून सभेची मंजुरी घेण्यात आली. अहवालवाचन, जमाखर्च इत्यादी बाबी पूर्ण करण्यात आल्या. त्यानंतर कार्यकारिणीची निवड होऊन पुढील पदाधिकारी निवडले गेले.

१) अध्यक्ष - ॲड. रावसाहेब शिंदे
२) उपाध्यक्ष - डॉ. रवींद्र कुटे
३) कार्याध्यक्ष - श्री. के. एल. खाडे
४) कोषाध्यक्ष - प्रा. सौ. मंजिरीताई सोमाणी
५) कार्यवाह - १) श्री. दिनकरराव पोखरकर
२) प्रा. बाबुराव उपाध्ये

कार्यकारिणीतील सदस्य पुढीलप्रमाणे :

१) ॲड. रावसाहेब पांडुरंग शिंदे
२) श्री. किसनराव लक्ष्मणराव खाडे
३) डॉ. रवींद्र बापूराव कुटे
४) श्री. दिनकरराव नाना पोखरकर
५) प्रा. बाबराव दत्तू उपाध्ये
६) प्रा. सौ. मंजिरीताई मदनलाल सोमाणी
७) प्रा. डॉ. सदाशिव दत्तात्रय कदम
८) प्रा. सौ. विजयाताई नंदकुमार कुऱ्हे
९) प्रा. डॉ. शंकरराव बाळकृष्ण गागरे
१०) प्रा. प्रकाश आबाराव देशमुख
११) सौ. शांता दामोदर ठुवे
१२) सौ. मंगला राजाराम कांजळे
१३) सौ. वर्षा अशोक आगाशे
१४) श्री. सुखदेव विश्वनाथ सुकळे
१५) प्रा. विनायक तुकाराम बंगाळ

शाखेची बैठक प्रत्येक महिन्याच्या ३० तारखेला व फेब्रुवारीच्या शेवटच्या तारखेस सायंकाळी ६ वाजता घेण्यात यावी, असा ठराव मंजूर करण्यात आला.

गुरुवार दि. ३० ऑगस्ट २००१ रोजी मराठी साहित्यातील थोर विचारवंत मा. डॉ. यशवंत पाठक (मनमाड) यांचे 'येणें वाग्यज्ञें तोषावें' या विषयावर व्याख्यान झाले.

मा. ॲड. रावसाहेब शिंदे अध्यक्षस्थानी होते. कै. व्यंकटेश माडगूळकर यांना श्रद्धांजली वाहण्यात आली. प्रारंभी कार्याध्यक्ष श्री. के. एल. खाडे यांनी स्वागत-प्रास्ताविक केले. पाहुण्यांचा परिचय कार्यवाह श्री. दिनकरराव पोखरकर यांनी करून दिला. उपाध्यक्ष डॉ. रवींद्र कुटे यांनी आभार मानले.

गुरुवार दि. ८।११। २००१ रोजी कार्यवाह दिनकरराव पोखरकर यांच्या 'जीवनदर्शन' या निवासस्थानी कार्यकारिणीची बैठक झाली. या बैठकीत साहित्यचर्चा झाली. तसेच रा. ब. ना. बोरावके महाविद्यालयाचे प्राचार्य व शाखेचे आधारस्तंभ प्राचार्य टी. ई. शेळके यांना 'इंडिया इंटरनॅशनल फ्रेंडशिप सोसायटी, नवी दिल्लीचा 'भारतज्योती' पुरस्कार












मिळाल्याबद्दल उपाध्यक्ष डॉ. रवींद्र कुटे, कार्याध्यक्ष के. एल. खाडे व कार्यवाह दिनकरराव पोखरकर यांनी त्यांचा सत्कार केला.

तसेच अखिल भारतीय साहित्य संमेलनाचे नवनिर्वाचित अध्यक्ष म्हणून श्री. राजेंद्र बनहट्टी यांची निवड झाल्याप्रित्यर्थ अभिनंदनाचा ठराव मांडण्यात आला व तो सर्वानुमते पास झाला. शाखेच्या वतीने मा. बनहट्टी यांचे हार्दिक अभिनंदन करण्यात आले. स्वागत-प्रास्ताविक कार्यवाह दिनकरराव पोखरकर यांनी केले. सूत्रसंचालन प्रा. बाबुराव उपाध्ये यांनी केले तर प्रा. विलास तुळे यांनी आभार मानले.

**दिनकर ना. पोखरकर,** कार्यवाह.

❑

## सोलापूर शाखा

**१) कै. कवी मा. गो. काटकर स्मृतिदिन :** म.सा.प. शाखेच्या वतीने आणि काटकर कुटुंबियांच्या सहकार्याने हा कार्यक्रम सादर झाला. कै. मा. गो. काटकर यांनी वयाच्या ८५ वर्षांपर्यंत ८५ पुस्तके लिहिली. त्यांच्या निधनानंतर, त्यांच्या इच्छेनुसार त्यांच्या अप्रकाशित कवितांचा 'भैरवी' या शीर्षकाने काव्यसंग्रह प्रकाशित झाला. या कार्यक्रमास डॉ. निर्मलकुमार फडकुले, प्रा. निशिकांत ठकार आदी मंडळी प्रमुख पाहुणे म्हणून उपस्थित होती. सदरहू कार्यक्रम दि. ५ मे २००१ रोजी 'इंडियन मेडिकल हॉल' येथे संपन्न झाला. या कार्यक्रमास साहित्य रसिकांची गर्दी होती.

**२) कै. कवी कुमार कोठावळे प्रतिष्ठान सोहळा :** सोलापूरचे जुन्या पिढीतले कवी, पत्रकार, नाटककार, नट अशा विविध गुणलक्षणांनी संपन्न असलेल्या कै. कवी कुमार कोठावळे स्मृती दिनानिमित्ताने पुरस्कार सोहळा आणि कवी संमेलन आदी कार्यक्रम पार पडले. या सोहळ्यात श्री. राजगुरू आगरकर यांना उत्कृष्ट कादंबरी-लेखनाबद्दल ('वडवानल'), श्री. हेमकिरण पत्की यांना उत्कृष्ट काव्यलेखनाबद्दल ('एकांत वाटेने'), सौ. शोभा बोल्ली यांना उत्कृष्ट रंगकर्मी पुरस्कार आणि श्री. रजनीश जोशी यांना उत्कृष्ट पत्रकार असे पुरस्कार देण्यात आले. या कार्यक्रमास डॉ. गो. मा. पवार (भूतपूर्व कार्य. सदस्य, साहित्य अकादमी, दिल्ली), श्री. अनंत दीक्षित - मुख्य संपादक 'दैनिक सकाळ' पुणे आदी मंडळी प्रमुख पाहुणे म्हणून उपस्थित होती. हा कार्यक्रम १७ मे २००१ रोजी ज्ञान प्रबोधिनीच्या भव्य उपासनागृहात संपन्न झाला. सुमारे तीन तास चाललेल्या या कार्यक्रमास रसिकांनी मोठ्या संख्येने प्रतिसाद दिला.

**३) कालिदास दिन :** 'आषाढस्य प्रथम दिवसे' कालिदास दिनानिमित्ताने सोलापुरातील जुन्या व नव्या कवींच्या काव्यवाचनाचा रसिला कार्यक्रम झाला. महाकवी कालिदास यांच्या जीवनावर साहित्य परिषदेचे कार्य. सदस्य श्री. बी. एस. कुलकर्णी यांचे अभ्यासपूर्ण व्याख्यान झाले. तदनंतर कवी श्री. दत्ता हलसगीकर यांच्या अध्यक्षतेखाली काव्यवाचनाचा कार्यक्रम झाला. यात लक्ष्मीनारायण बोल्ली, सौ. विजया जहागीरदार, नारायण कुलकर्णी, माधव पवार, डॉ. अजीज नदाफ आदींसह अनेक कवींनी सहभाग घेतला. हा कार्यक्रम दि. २२ जून २००१ रोजी ग. ल. कुलकर्णी हायस्कूलच्या सभागृहात झाला.

**४) चांदणवेल :** महाकवी बा. भ. बोरकर यांच्या स्मृतिदिनानिमित्ताने कवीश्रींच्या निवडक कवितांचा दृक्, श्राव्य, संगीत, प्रकाश आदींचा सहज सुंदर वापर करीत 'काव्याविष्काराचा' रंगतदार कार्यक्रम झाला. यात सौ. शोभा बोल्ली, रजनीश जोशी, अनिरुद्ध जोशी, सीमा चाफळकर आणि साहिर नदाफ आदी काव्यप्रेमी मंडळींनी काव्यवाचन केले. एक अभिनव कार्यक्रम म्हणून हा कार्यक्रम समस्त सोलापुरात गाजला. शेकडो काव्यरसिकांनी साहित्य परिषद-शाखेचे अभिनंदन केले. हा कार्यक्रम दि. १८ ऑगस्ट २००१ रोजी विकासनगर सभागृहात झाला.

**५) निबंधस्पर्धा :** साहित्य परिषदेच्या 'महिला साहित्य मंच' या विभागाच्या वतीने खास महिलांसाठी 'घर कुणाचे ?' या शीर्षकाने निबंधस्पर्धा आयोजित करण्यात आली. या स्पर्धेत ३९ निबंध-लेखिकांनी भाग घेतला. श्रीमती शांता बुद्धिसागर आणि सौ. विजया जहागीरदार यांनी परीक्षणाचे काम पाहिले. यातील यशस्वी निबंध लेखिकांना 'स्व. चंचलादेवी गांधी पुरस्कारा'ने सन्मानित करण्यात आले. यातील उत्कृष्ट निबंधांना 'दैनिक संचार'मधून प्रसिद्धी देण्यात आली. सोलापुरातील समस्त लेखिका आणि कवयित्रींनी पुढाकार घेऊन हा कार्यक्रम यशस्वी केला. हा कार्यक्रम ९ सप्टेंबर २००१ रोजी 'सारस्वत ब्राह्मण सभागृहा'त झाला.

याचबरोबर या कालावधीत चंद्रभूषण कुलश्रेष्ठ, व्यंकटेश माडगूळकर, व. दि. कुलकर्णी, व. पु. काळे, मालती बेडेकर, श्रीनिवास सूर्यवंशी, चंद्रशेखर कपाले, नामदेव वठारे, चंद्रकांत पोरे आदी लेखक, कवी, नाट्य कलावंत, चित्रकार मंडळींच्या दु:खद निधनानिमित्त शोकसभा घेण्यात आल्या.

सोलापूर साहित्य परिषदेच्या साहित्य चळवळीला उभारी येण्यासाठी शाखेच्या कार्यभागाचे चार विभाग केलेले आहेत. ते पुढीलप्रमाणे :-

**१) महिला साहित्य मंच :** या विभागाच्या वतीने निंबध स्पर्धा (वरीलप्रमाणे) आयोजली गेली.

**२) युवा साहित्य मंच :** साहित्य परिषदेत युवकांचा सहभाग हवा, म्हणून सोलापुरातील सर्व कॉलेजच्या विद्यार्थी-विद्यार्थिनींच्या साहित्यगुणांना विकसित करण्यासाठी हा विभाग असून येत्या २१ ऑक्टोबरला कॉलेज साहित्यप्रेमी युवतीसाठी उत्स्फूर्त वक्तृत्व स्पर्धा संगमेश्वर कॉलेजात आयोजित केली आहे.

**३) आंतरभारती :** सोलापुरातील मराठीबरोबर तेलुगु, कन्नड, उर्दू, तामिळ, गुजराथी आदी भाषिक साहित्यिकांची व्याख्याने, परिसंवाद, चर्चासत्रे, संमेलने या विभागात आयोजिली जातील. येत्या दिवाळीस आंतरभारती कवी संमेलन आयोजित करण्यात येत आहे.

**४) शब्दस्वराचा आविष्कार :** दृक्, श्राव्य, प्रकाश, संगीत यातून साहित्यकृतीचा वेगळ्या तऱ्हेने आविष्कार यातून केला जाईल. बा. भ. बोरकरांच्या कवितांवरील वर निर्देशिल्याप्रमाणे 'चांदणवेल' कार्यक्रम या विभागाच्या वतीने झाला.

परिषदेची सोलापूर शाखा शहराच्या विविध भागात जात, तेथील लोकांना सामावून घेत आपले कार्यक्रम करते आहे आणि समाजातल्या विविध स्तरातील साहित्यिकांना



अनुक्रमणिका






एकत्र बांधते आहे. 'साहित्यिकांना व्यासपीठ आणि रसिकांना कार्यक्रम' हा साहित्य परिषदेचा मुख्य उद्देश आहे.

**श्री. लक्ष्मीनारायण बोल्ली**

**महाराष्ट्र परिषद पुणे, शाखा सोलापूर आणि लोणकरणजी जगन्नाथजी चंडक ट्रस्ट, सोलापूर**

यांच्या विद्यमाने सोमवार दिनांक १७ डिसेंबर २००१, मंगळवार दिनांक १८ डिसेंबर २००१ व बुधवार दिनांक १९ डिसेंबर २००१ रोजी सोलापूर शहराचे माजी नगराध्यक्ष 'कै. लोणकरणजी चंडक स्मृती व्याख्यानमाला' आयोजित करण्यात आली होती.

या व्याख्यानमालेचे पहिले व्याख्यान सोमवार दिनांक १७ डिसेंबर २००१ रोजी प्रख्यात समीक्षक-लेखक मा. श्री. म. द. हातकणंगलेकर यांचे 'कादंबरी आणि लघुकथा : साहित्यप्रकारातील श्रेष्ठ आणि कनिष्ठ' या विषयावर अभ्यासपूर्ण व्याख्यान झाले.

मंगळवार दिनांक १८ डिसेंबर २००१ रोजी सुप्रसिद्ध नाट्य अभिनेत्री श्रीमती लालन सारंग यांच्या मुख्यत्वाखाली 'या जगण्यावर शतदा प्रेम करावे' या विषयावर सुसंवाद झाला. प्रारंभी कवयित्री विजया जहागीरदार यांनी स्वागत केले तर सौ. प्रमिला राऊत यांनी लालन सारंग यांचा परिचय करून दिला. यावेळी सौ. तारा चंडक यांनी व कविवर्य दत्ता हलसगीकर यांनी त्यांचा सत्कार केला. शेवटी प्रा. सुहास पुजारी यांनी आभार मानले.

बुधवार दिनांक १९ डिसेंबर २००१ रोजी ज्येष्ठ पत्रकार श्री. अरुण साधू यांचे '११ सप्टेंबर नंतरचे जग' या विषयावर व्याख्यान झाले. प्रारंभी किशोर चंडक यांनी प्रास्ताविक केल्यानंतर पत्रकार संजय आवटे यांनी साधू यांचा परिचय करून दिल्यानंतर गिरीश चंडक व नागेश सुरवसे यांच्या हस्ते साधू यांचा सत्कार करण्यात आला. कार्यक्रमाचे सूत्रसंचालन पद्माकर कुलकर्णी यांनी केले तर आभार ॲड. जे. जे. कुलकर्णी यांनी मानले.

या तीनही व्याख्यानांना नामवंत वक्ते, साहित्यिक, कलावंत, समीक्षक, राजकीय नेते आवर्जून उपस्थित होते. तसेच सदर कार्यक्रम यशस्वी होण्यासाठी 'लोणकरणजी जगन्नाथजी चंडक ट्रस्ट'चे कार्यवाह डॉ. गिरीश चंडक व विश्वस्त श्री. किशोर चंडक आणि म. सा. प. सोलापूर शाखेचे अध्यक्ष श्री. दत्ता हलसगीकर, कार्याध्यक्ष श्री. लक्ष्मीनारायण बोल्ली, कार्यवाह ॲड. जे. जे. कुलकर्णी यांनी परिश्रम घेतले. श्रोतृवर्गाची उपस्थितीही मोठ्या प्रमाणात होती.

**डॉ. गिरीश चंडक**

**धुळे शाखा**

म. सा. प. धुळे जिल्हा शाखा, गरुड वाचनालय सांस्कृतिक विभाग व चेतश्री प्रकाशन, अंमळनेर यांच्या संयुक्त विद्यमाने कै. इंदिरा संत यांच्या स्मृतिदिनी 'इंदिरा संत यांचे काव्यविश्व' या डॉ. म. सु. पाटील लिखित ग्रंथाचा प्रकाशन समारंभ म. सा. प. पुण्याच्या 'साहित्य पत्रिके'चे संपादक मा. डॉ. अरविंद वामन कुळकर्णी (पुणे) यांच्या हस्ते झाला. कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी कविवर्य प्रा. पुरुषोत्तम पाटील होते. कार्यक्रमाचे प्रास्ताविक श्री. वा. रा.

सोनार यांनी केले. स्वागत प्रा. ओमप्रकाश होळीकर, परिचय डॉ. सौ. शशिकला पवार, आभार प्रा. सौ. राजश्री शेलकर आणि प्रा. दिलीप चव्हाण यांनी सूत्रसंचालन केले.

माजी आमदार मा. राजवर्धन कदमबांडे (धुळे) यांनी दिलेल्या देणगीतून कै. मातोश्री श्रीमंत पद्माराजे रघुजीराव कदमबांडे यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ राजर्षी शाहू महाराज जयंतीनिमित्त औरंगाबाद येथील स्वरूप प्रकाशनाचे प्रकाशक व सुप्रसिद्ध ग्रामीण लेखक प्रा. डॉ. वासुदेव मुलाटे यांचे व्याख्यान झाले. अध्यक्षस्थानी कविवर्य प्रा. पुरुषोत्तम पाटील होते. कार्यक्रमाचे स्वागत व प्रास्ताविक प्रा. ओमप्रकाश होळीकर व परिचय प्रा. अनिल बैसाने, आभार प्रा. प्रदीप कुलकर्णी व सूत्रसंचालन प्रा. सौ. राजश्री शेलकर यांनी केले.

कै. प्राचार्य अनंतराव पाटील स्मृतिदिनानिमित्त दि. ३० ऑक्टोबर रोजी प्रा. डॉ. सुधीर गव्हाणे, (विभाग प्रमुख, वृत्तपत्र विद्या विभाग, डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद) यांचे 'ग्रामीण पत्रकारिता आणि समाज' या विषयावर व्याख्यान झाले. अध्यक्षस्थानी प्रा. परुषोत्तम पाटील होते. प्रास्ताविक प्रा. ओमप्रकाश होळीकर, परिचय प्रा. प्रदीप कुलकर्णी, आभार प्रा. अनिल बैसाने व सूत्रसंचालन प्रा. सौ. राजश्री शेलकर यांनी केले.

**प्रा. अ. मा. बैसाने**

## डोंबिवली शाखा

***शनिवार दि. ७ जुलै २००१ :***

विख्यात लेखिका मालतीबाई बेडेकर यांना भावपूर्ण आदरांजली वाहण्यात आली. या प्रसंगी आघाडीच्या लेखिका मेघना पेठे यांचे 'कथालेखनाची वाटचाल' या विषयावर भाषण झाले. हा कार्यक्रम 'भारतीय स्त्री-शक्ती आणि महाराष्ट्र साहित्य परिषद, डोंबिवली यांच्या संयुक्त विद्यमाने आयोजित करण्यात आला होता.

***२८ ऑक्टोबर २००१ :***

डॉ. जी. के. देशपांडे यांचे 'शिकार' कथाकथन झाले. त्यावेळी व्याघ्र-जीवनावरील चित्रफीत दाखविण्यात आली.

***८ डिसेंबर २००१ :***

श्री. व सौ. ज्योती श्रीराम पिटके यांचे 'बहिणाबाईची कविता' या विषयावर विवेचन आणि काव्यवाचन झाले.

**श्री. द. शं. रानडे**

■

**डॉ. न. म. जोशी यांच्या साहित्यावर आधारित नवोपक्रमांसाठी पारितोषिक**

महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे यांच्या निवोपक्रम स्पर्धेत प्रसिद्ध साहित्यिक व शिक्षणतज्ज्ञ डॉ. न. म. जोशी यांच्या साहित्यावर आधारित प्रथम पारितोषिक प्राप्त प्रकल्पाला 'ज्ञानकुंभ' या शैक्षणिक वार्तापत्राच्या वतीने स्वतंत्रपणे ५०००/- रु. 'वि. स. खांडेकर' पारितोषिक देण्यात येईल.

त्याचप्रमाणे अखिल भारतीय बालकुमार साहित्य संमेलनाच्या वतीने बालसाहित्याच्या समीक्षेला पारितोषिक देण्यात येते. डॉ. न. म. जोशी यांच्या बालसाहित्य समीक्षेचा निबंध अ. भा. बालकुमार साहित्य संमेलनाने पारितोषिकार्ह ठरवला तर या निबंधालाही स्वतंत्रपणे एक हजार रुपयांचे पारितोषिक देण्यात येईल.

## स्वागत

### साकेत प्रकाशन, औरंगाबाद, यांची प्रकाशने

**वहीतलं बालपण :** बाबा भांड.
**चेडा :** सुखदेव ढाणके.
**कुस्तीवेडा राजपुत्र :** दिवाकर बापट.
**पाटीवरच्या टीपा :** चंद्रकांत पाटील.
**इंग्रजी भाषाशिक्षक स्वयंप्रशिक्षण :** व. न. इंगळे.
**एक डझन गोष्टी :** मूळ लेखक सत्यजित राय, अनुवाद-विलास गिते.
**पैशाला अनेक वाटा :** विश्वास साळुंके.
**इंग्रजी भाषेतील काळ, रूपे आणि उपयोग :** प्रा. व. न. इंगळे.
**रवींद्रनाथांच्या सहवासात :** अनुवाद-विलास गिते.
**शापित कोळी :** पद्मा मांडवगणे.
**अडीच फुटांचा राक्षस :** प्रकाश त्रिभुवन.

### प्रतिमा प्रकाशन, पुणे यांची प्रकाशने

**संगीतयात्रा :** रोचना भडकमकर.
**महाराष्ट्र-कर्नाटक सांस्कृतिक अनुबंध :** संपादक अ. रा. तोरो.
**मला उमजले :** ग. प्र. प्रधान.
**श्री शिवछत्रपतींचे चरित्र :** संपादक दत्ता भगत.
**निळी वाटचाल :** दत्ता भगत.
**भाषाकी अदालतमें समाचार पत्र :** पद्मजा घोरपडे.
**संत-संकीर्तन :** डॉ. हे. वि. इनामदार.
**माझे शैक्षणिक अनुभव व काही विचार :** प्रा. डॉ. वि. ना. ढवळे.
**पाण्यातला दिवा :** किशोर पाठक.
**नागरिक :** एस. डी. इनामदार.
**आरसपानी :** सुलभा हेर्लेकर.
**विचारमंथन :** स. रा. गाडगीळ.

**साधु लीला :** नामदेव गो. पतंगे, मराठवाडा साहित्य प्रकाशन सहकारी संस्था, नांदेड.
**प्रकाशगाथा :** कै. प्रकाश शांताराम टिकम, प्रकाशक बाबुराव टिकम, वासणा, अहमदाबाद.
**वेचियले विचारधन :** सौ. वनश्री वि. तुळजापूरकर, प्रकाशक स्वतः लेखिका
**बहादूर बल्लू :** लीला दीक्षित, मेनका प्रकाशन, पुणे.
**उसाच्या कविता :** कैलास रा. दौंड, नीळकंठ प्रकाशन, पुणे.
**साहेब म्हणू नये आपला :** सुरेश पोटे, प्रियांजली प्रकाशन, पुणे.

## नवे आजीव सभासद

पानसे दिलीप नरहर, पुणे
केळकर श्रीकांत सुधाकर, पुणे
कुलकर्णी वैजयंती रघुनंदन, पुणे
वढावकर सुधाकर गजानन, पुणे
कडेठाणकर सुचेता अनंत, पुणे
कुलकर्णी विजय बाळकृष्ण, पुणे
लिमये विमला राजाराम, पुणे
गुरव अश्विनी रमेश, पुणे
फडतरे सुरेखा श्रीरंग, भांदेवाडी
कामत सुलभा वसंत, पुणे
पुरंदरे श्रुती जयंत, पुणे
पटवर्धन नीळकंठ रघुनाथ, पुणे
केतकर अनिल शशिकांत, पुणे
कडेकर वसंत हरि, पुणे
धडफळे अमित धनंजय, पुणे
दावके शैलजा शंकर, पुणे
गुजर सीताराम तुकाराम, हडपसर
साने मानसी अविनाश, पुणे
कुलकर्णी गौरी प्रकाश, पुणे
इनामदार ज्योत्स्ना श्रीकांत, कराड
इनामदार श्रीकांत मनोहर, कराड
उमराणी दीपक शिवराम, कराड
एकांडे सुधीर गोविंद, कराड
करंवळेकर सुजाता विजय, कराड
काळे सुरेंद्र सूर्यकांत, कराड
किरपेकर उदय विष्णु, कराड
कुलकर्णी अनिल मधुसूदन, कराड
कुलकर्णी गोपाळ विठ्ठल, कराड
कुलकर्णी गोविंद दत्तात्रय, कराड
कुलकर्णी भालचंद्र मधुकर, कराड
कुलकर्णी विष्णू श्रीधर, कराड
कुलकर्णी स्मिता गोविंद, कराड
गद्रे अरविंद शिवराम, कराड
गरगटे प्रमोद गजानन, कराड
गरगटे स्मिता अविनाश, कराड
गोखले रमेश गजानन, कराड
गोडबोले शिरीष नारायण, कराड
गोडबोले सुचेता शिरीष, कराड
घळसासी मोहन नारायण, कराड
चरेगावकर गिरिजा शेखर, कराड
चिवरे संजीव विनायक, कराड
जाखलेकर राजेंद्र लक्ष्मण, कराड
जोशी मल्हार बाळकृष्ण, कराड
जोशी समीर सुभाष, कराड
ढापरे विवेक विश्वनाथ, कराड
देव विकास श्रीकांत, कराड
देशपांडे चंद्रशेखर महादेव, कराड
परांजपे आनंद सदाशिव, कराड
परांजपे मोरेश्वर नारायण, कराड
पाडळकर अभय चंद्रकांत, कराड
पालकर जयंत दिगंबर, कराड
पेंढारकर मिलींद शंकर, कराड
फुलारे सुभाष निंजाप्पा, कराड
बेलापुरे शर्वरी सारंग, कराड
बेलापुरे सारंग गुंडोपंत, कराड
ब्रह्मनाळकर अजय एम., कराड
ब्रह्मनाळकर सुलभा अजय, कराड
महाजन अंजली मकरंद, कराड
महाजन मकरंद बाळकृष्ण, कराड
म्हैसकर विद्याधर दामोदर, कराड
वाळिंबे प्रज्ञा प्रदीप, कराड
वाटेगावकर दीपक रामकृष्ण, कराड
शहा महेंद्रकुमार चंद्रकांत, कराड
शहा सुचिता महेंद्रकुमार, कराड
सप्रे ज्योती प्रकाश, कराड
हुद्दार दीपक शंकर, कराड
हुद्दार शुभांगी दीपक, कराड
कुलकर्णी (सांगवडकर) धनंजय दत्तात्रय, कराड
वाडकर धोंडीराम संभाजी, अहमदनगर
खांदवे भाऊसाहेब ठकाजी, अहमदनगर
खाकुर्डीकर अमृता अरुण, अहमदनगर
झावरे प्रकाश बाळासाहेब, अहमदनगर
खाडे किसन लक्ष्मणराव, श्रीरामपूर
सातपुते भारत मुरलीधर, लातूर





अनुक्रमणिका







अनुक्रमणिका

Maharashtra Sahitya Patrika Quarterly January-February-March 2002
Registered with the Registrar of Newspapers for India Under No. 6398/57

प्रति,

प्रेषक : प्रमुख कार्यवाह
**महाराष्ट्र साहित्य परिषद,** टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०.







अनुक्रमणिका